







नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)

महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

---

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

'तपशील' हे मराठीतील एक महत्त्वाचे नियतकालिक (द्वैमासिक) असून ते सद्यस्थितीत कार्यरत नाही. संस्थेच्या उपरोक्त प्रकल्पातंर्गत 'तपशील' ह्या नियतकालिकाच्या अंकांचे संगणकीकरण करता येणे शक्य असल्याने सदर नियतकालिकाच्या अंकांचे संगणकीकरण करून संस्थेच्या संकेतस्थळावर उपलब्ध करून देण्यासाठी राज्य मराठी विकास संस्थेद्वारे सदर नियतकालिकाचे प्रकाशक व मालक स्मृतिशेष श्री. नाना जोशी ह्यांच्या कन्या श्रीमती शर्मिला जोशी तसेच संपादकमंडळातील सदस्य ह्यांना विनंती करण्यात आली होती.

सदर विनंतीस श्रीमती शर्मिला जोशी तसेच संपादक-मंडळ ह्यांनी मान्यता दिल्यामुळे आणि सदर नियतकालिकाचे अंक उपलब्ध करून दिल्यामुळे 'तपशील' ह्या नियतकालिकाच्या (द्वैमासिक) अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देणे शक्य होत आहे.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे/ नियतकालिकांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था, मुंबई आणि तपशील संपादक-मंडळ यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे, कलावंतांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्व राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे नसतील.

अनुक्रमणिका



# तपशील

अंक ८ खंड २ १९९७

## अनुक्रमणिका



**'तपशील'चा तपशील**

* सुट्या अंकाची किंमत रुपये १००/-
* (६ अकांची) वार्षिक वर्गणी रुपये २०१/-
* प्रत्येक अंकाची पृष्ठसंख्या सुमारे १२० ते १२५
* वर्गणी मधल्या अंकापासून स्वीकारली जाणार नाही. थोडक्यात दुसऱ्या अंकाला वर्गणी पाठवली तरी पहिल्या अंकापासूनच अंक देण्यात येतील.

**संपादक**
डॉ. मीना वैशंपायन
डॉ. मंगला सरदेशपांडे
डॉ. आनंद जोशी
श्री. नाना जोशी

**रचना**
हेमचंद्र कराडकर

**अक्षरजुळणी**
अभिजित पंडित

**मुद्रण व्यवस्था**
विजय राणे
विजय एंटरप्रायझेस
कळवा, ठाणे.

**मुखपृष्ठवरील चित्र**
प्रेमपुजारी डी. एच. लॉरेन्स

**मालक, मुद्रक, प्रकाशक आणि पत्रव्यवहार**

श्री. नाना जोशी
४ अ, सोमणनगर,
क्रांतीवीर भाई बालमुकुंद मार्ग,
मुंबई – ४०० ०१२



अनुक्रमणिका

## संपादकीय

**प्रिय रसिक वाचकहो,**

'तपशील'चा हा आठवा अंक. या अंकात नोबेल पारितोषक विजेती, विस्लावा झिंबोरस्का यांनी पारितोषक स्वीकारताना केलेले भाषण, त्यांच्या काही कवितांचा- त्यातल्या काही विस्लावा झिंबोरस्का यांनीच निवडलेल्या- मुक्त अनुवाद आणि त्यांचा अल्प परिचय वाचावयास मिळेल. 'चौकस ग्रंथसूचीकार' या लेखात एका नव्या प्रकारच्या ग्रंथसूचीची माहिती करून देण्यात आलेली आहे. सामान्यपणे अशी समजूत असते की; महान साहित्य निर्माण करणाऱ्या लेखकाच्या मनात, महान व चांगलेच विचार असतात. याला अनेक अपवाद आहेत. प्रख्यात फ्रेंच लेखन सेलीन हा त्यापैकी एक. सेलीन यांचा जीवनपट, त्यांच्या तीन मुलाखती, त्यांच्या संबंधीचे दोन लेख तपशील मध्ये देण्यात येतील. त्यापैकी जीवनपट व मुलाखती हा भाग या अंकात आहेत. डि. कॅमेरॉन या पुस्तकाचे नाव अनेकानी ऐकलेले असते. काहीनी त्यातील गोष्टी वाचलेल्या असतात. पण त्या पुस्तकाच्या लेखाबद्दल लेखकाबद्दल फारच थोड्याना माहिती असते. श्री. विष्णु सदाशिव ब्रम्हे यांनी ती करून दिली आहे. प्रेमपुजारी डी. एच. लॉरेन्स या लेखमालेचा पुढचा भाग वाचावयास मिळेल. हा अंक हाती पडेपर्यंत कदाचित इ. स. १९९८ हे साल उजाडलेलेही असेल. तपशीलच्या सर्व वर्गणीदार व वाचकास १९९८ हे वर्ष सुखाचे, आनंदाचे जावो. – **संपादक**

---

केवळ जिज्ञासेपोटी –
मी दगडाच्या पुढील दारी टक्टक् केलं
"मीच आहे मी, मला आत येऊ दे.
मी केवळ जिज्ञासेपोटी आले आहे.
फक्त जीवनच ती शमवू शकेल.
मला तुझ्या राजवाड्यात फिरायचं आहे.
मग पाने, पाण्याचा थेंब ह्यांना बोलावून
घ्यायचं आहे.
वेळतर अगदी थोडकाच
माझी मरणाधीनता तुला जाणवायला हवी."
दगड म्हणाला, "मी बनलोय दगडाचा."
म्हणून मला चेहरा तरी दगडी मख्ख
ठेवायलाच हवा."
जा बघू इथून
मला तर हसण्यासाठी स्नायूच नाहीत.
– एका दगडाशी बातचीत (१९६२)

**विस्लावा झिंबोरस्का**

घडण्याची जे कधी शक्यता
घडले आहे, घडले आहे
पूर्वी घडले, घडेल नंतर
घडेल जवळी, तसे दूरवर
जे घडले ते – तुजसाठी नच

**विस्लावा झिंबोरस्का**

अग्रेसर म्हणून तू बचावलास
अंतिमस्थिती म्हणून तू बचावलास अंतिमस्थान
एकाकी तू – सवे इतरही
उजव्या डाव्या – दोन्ही दिशांना
कारण – नभ बरसत होते.
कारण – छाया होती.
कारण – दिवस सूर्यप्रकाशाचा होता.
(असेच घडले असते – १९७२)

**विस्लावा झिंबोरस्का**

अनुक्रमणिका

# साहित्य व समाज

## १) एका पोलंडच्या रहिवाशाला – विस्लावा झिंबोरस्का – नोबेल पारितोषिक

–प्रतिभा टिल्लू

१) विश्वाचा शोध घेणाऱ्या एका कवीबद्दल विस्लावा झिंबोरस्का म्हणते –

तिच्या आभाळाच्या शब्दचित्रामधून
आपल्याला जाणवते असहायता
कवयित्री हरवून गेली आहे
भोवतालच्या भयकारी पसाऱ्यात
ग्रहावरचा निर्जीवपणा पाहून
ती अगदी चक्रावूनच गेली आहे.
तिच्या मनात एक प्रश्न उभा राहिला
(अर्थात तो अप्रस्तुतच होता)
अगदी एकूण एक सूर्य
जे आत्तापर्यंत तळपत होते
त्या सूर्यांखाली आम्ही
शेवटी एकटेच उरणार का?

निवेदक म्हणतो की कवयित्रीचा हेतू असा आहे की –

'साध्या सरळ लेखणीने
हे अधिक चमकले असते
– अरे देवा, ह्या लेखणीने नव्हे !'

स्वीडिश ॲकॅडेमीने ह्या ७३ वर्षांच्या स्त्रीला नोबेल लॉरिएट म्हणून निवडताना तिचा साधा सरळपणाच विचारात घेतला असावा.

जीवन आणि मृत्यू आणि त्यांना सामोरे जाताना काव्य हा वाङ्मयप्रकार कोणता अर्थ त्याला देईल असे महान प्रश्न उपस्थित करते तेही तिच्या लाघवी, प्रवाही, कोठचाही गोंधळ नसलेल्या आणि आश्चर्यकारक शालीन भाषेत. झिंबोरस्काच्या काव्यातील संपन्न स्फूर्तिदायित्व आणि प्रवाही डौल यांचा उल्लेख ॲकॅडमीने केला असून ती काव्याच्या प्रांतातील "बीथोव्हनच्या झंझावाताचा काही भाग "असलेली" ती मोझार्ट आहे" म्हणून तिचा गौरव केला आहे. अगदीच घरगुती स्वरूपाची. प्रसिद्धी नसूनही झिम्बोरस्का गेली कैक वर्षे नोबेलच्या यादीत असलेल्या उमेदवारासारखी अगदी झटक्यात वरच्या क्रमांकावर गेली.

पोलंडमध्ये ती अर्थातच प्रसिद्ध होती. तिच्या साहित्याने अनेकांना प्रेरणा दिली होती. रॉक संगीतकार असो की आयझॅक किसलोव्हस्कीसारखा महान सिनेदिग्दर्शक असो. तिच्या 'लव्ह ॲट फर्स्ट साइट' ह्या कवितेवर किसलोव्हस्कीने 'रेड' हा सिनेमा काढला होता.

१९९६ची ही काव्यसम्राज्ञी जन्मली १९२३ मध्ये. पश्चिमेकडील बिनीन नावाच्या (BNIN) लहानशा शहरात (हे शहर आता कोर्निक परगण्यात आहे). पण आठव्या वर्षापासून ती क्राकोवमध्ये (Cracow) राहिली. महाविद्यालयात पोलिश साहित्य आणि समाजशास्त्र ह्यांचा अभ्यास करीत असतानाच १९४५ मध्ये एका वृत्तपत्राच्या पुरवणीत तिची कविता प्रसिद्ध झाली. तिच्या पहिल्या कवितेचे नाव अगदी योग्य होते – 'मी शब्द शोधते आहे (I seek the word)'

आयुष्यभर तिने हे शब्द शोधण्याचेच काम केले. कवयित्री म्हणून आणि एका मासिकाची सदर लेखिका म्हणूनही. त्या सदराचे नाव होते – 'वाचन अपरिहार्य नसलेले.' ह्या सदरात तिने १९५३ ते १९८१ च्या काळात सूपशास्त्राच्या पुस्तकापासून ते टी. एस. एलियटच्या 'कॅट' (Cat) कवितांपर्यंत सर्वांवर परीक्षणे लिहिली. काही शब्द टाकूनच द्यायचे असे तिने ठरविले. 'दॅट इज व्हाय वुई आर अलाइव्ह' (म्हणून तर आम्ही जिवंत आहोत) हा १९५२ चा आणि त्यापाठोपाठचा १९५४ चा साम्यवाद्यांनी सांगितलेली सामाजिक वास्तववादाची तत्त्वप्रणाली सांगणारा संग्रह, हे दोन्ही संग्रह तिने स्वतःच नाकारले. (स्वीडिश ॲकॅडमीने तिच्या ह्या प्रतिकात्मक नापसंतीची नोंद घेतलेली आहे) त्यामुळे त्यांनी स्पष्ट म्हटलेच की, श्रीमती झिम्बोरेस्काला हे नोबेल पारितोषिक आम्ही तिच्या १९५७ पासूनच्या कवितांसाठी 'जेव्हा बंधन सैल होतात.' (When censorship had lost its stranlehdd) ह्या संग्रहानंतरच्या काव्यनिर्मिती– साठी देत आहोत.

'कॉलिंग आऊट टु येती' ह्या १९५७च्या संग्रहात स्टालिनच्याविरुद्ध प्रतिक्रिया आहेत. असा उल्लेख स्वीडिश ॲकॅडमीने केला आहे. [ (येती, गुन्हा हेच सगळे काही नव्हे आपण तर तिथपर्यंत पोचलेलेच आहोत) ह्या संग्रहातील एका कवितेचा निवेदक नैतिक व शारीरिकदृष्ट्या अत्यंत तिरस्करणीय अशा हिमयुगातील मानवाला (Snowman) अगदी ठोसपणे सांगत आहे. ] असे आहे तरीही झिंम्बोरस्काची कविता उघडउघड तरी राजकीय स्वरूपाची नाही.

तिच्या कवितांचे तीन संग्रह नुकतेच इंग्रजीत प्रसिद्ध झाले आहेत. वाळूचा कण– एक पहाणे (View with a grain of sand) अनुवाद केला आहे, स्टॅनिस्ला बरझॉनझॅक आणि क्लेअर कावाना. ३६ वर्षांच्या कालखंडातल्या या कविता एका अनपेक्षित विषयाकडून दुसऱ्याकडे बेडूकउड्या मारीत जातात. – 'रुबेनची नग्नचित्रे', 'कवितावाचन', 'कांदा' इ. तिच्या १९६२च्या 'मीठ' या संग्रहात ती एका ऑपेरा गायकाचे –

'सर्वनाश जवळ आला तरी
ती आपली हनुवटी वरच ठेवील

आणि तिची पट्टी
वरचीच राहील'

असे वर्णन करते.

शरीरसौष्ठव स्पर्धेतल्या एका घामाने निथळत असलेल्या स्पर्धकाबद्दल ती म्हणते – 'तो त्याच्या हालचाली दाखवताना डरकाळ्या फोडतो. / त्याच्या पाठीलाच जणू शंभर चेहरे फुटलेले आहेत.'

ह्या कविता जोमदार आहेत, विनोदी आणि गमतीशीरही आहेत. पण त्यांच्या किनारपट्टीला मरणाधीनता वावरत आहे असे वाटत राहाते.

१९८६च्या संग्रहातील 'पुलावरील लोक' ह्या कवितेत झिंबोरस्काला मृत्यूपुढे काव्य करणे हा अगदी व्यर्थ प्रयत्न वाटतो. ती म्हणते –

"तातडीच्या बातम्या घेऊन जाणाऱ्या
'कुरीअर' प्रमाणे वेळ धावतोय.
— ही फक्त एक उपमा झाली.
त्याचा स्वभाव आता लक्षात आलाय.
त्याची घाई हे एक ढोंग आहे.
त्याच्या हकिगती अमानुष आहेत."

१९९३च्या 'अंत आणि आरंभ' ह्या संग्रहात ती युद्ध, एथनिक द्वेष आणि मरणाची चव ह्या विषयांना हाताळते. या सर्वांचा अनुभव तिची स्मरणशक्ती क्षीण होत असताना तिला येतच असतो. म्हणूनच ती मरणाचा थोडासा अनुभव आत्ताच घ्यायला लागली आहे. तिच्या अवती– भोवतीच्या भ्रममूलक गूढ आयुष्यक्रमात तिची काव्यप्रतिभा काळाच्या ओघात परत येतेय – एखाद्या अदृश्य लोहचुंबकाने आणावी तशी. 'गवतात शिवणकाम करणाऱ्या मुंग्या किंवा 'पांढरं फुलपाखरू...... हवेत फडफडतंय' फक्त त्याच्याच असलेल्या पंखांनी (नो टायटल रिक्वायर्ड)'

कमनशिबी कवयित्रीने 'मे बी ऑल धिस', या काव्यसंग्रहामध्ये निर्माण केलेल्या प्रश्नावर 'न लिहिल्या गेलेल्या कवितेच्या मूल्यमापनाबद्दल' या कवितेत. (कवयित्रीने निर्माण केलेल्या प्रश्नाकडे पुन्हा एकदा वळते आणि तो प्रश्न उलटा– पालटा करून टाकते) ती म्हणते –

'आम्ही एकटे नसतो तर?
विश्व आमच्याकडे डोळे लावून
पहात असेल तर?
मला तर आश्चर्यच वाटतंय,
आमची क्षणभंगुर आयुष्ये

त्याला कशासाठी हवी असतील?'
आशावादी कवयित्री म्हणते – 'हो त्यांना तुमचं महत्त्व वाटतं.'
'त्यांना क्षुल्लक गोष्टींचीच
अभिरुची आहे का?
ती पाहा एका मोठ्या पडद्यावर
एक छोटी बालिका तिच्या
बाहीवर एक बटण लावते आहे
रडारच्या किंकाळ्या येतात
सगळे लोक धावत बाहेर येतात
त्या छोटुकलीचं छोटसं हृदय
आत धडधडतंय.
तिचं शांतपणे शिवणकाम
करणं किती छानछान वाटतंय.
कोणीतरी दिङ्मूढ अवस्थेत
मनापासून ओरडला,
अरे, हाकारारे बॉसला
त्याला म्हणावं हे तर त्याने
पाह्यलाच हवं !
पाह्यलाच हवं !

२) विस्लावा एका कवितेत म्हणते की हा ग्रह (पृथ्वी) चमत्कारिक आहे आणि ह्या ग्रहावरचे सगळे चमत्कारिकच आहे. (पुलावरचे लोक). १९९६चे साहित्याचे नोबेल पारितोषिक विस्लावाला मिळाल्यानंतर हे जग खरोखरीच विक्षिप्त असल्याचा अनुभव तिला आला. तिच्या देशातल्या सगळ्यांनाच त्यांच्या लाडक्या कवयित्रीला सन्मान मिळाल्याने अत्यंत आनंद झाला. जगभरच्या सगळ्या कवींना त्यांच्यापैकी उत्तम कवीला हा पुरस्कार मिळाल्याचा आनंद झाला. बातमीदार संस्था तिच्याकडे धावल्या, ती मात्र लगेचच तिच्या झाकोपेन (Zakopane) ह्या डोंगराच्या कुशीतल्या खेड्यात निघून गेली. तिथे ती आपल्या ८ डिसेंबरच्या भाषणाचे चिंतन एकीकडे करीत होती तर दुसरीकडे ह्या जमावाचे हल्ले मोठ्या धैर्याने परतवून लावीत होती.

७३ वर्षांची विस्लावा युरोपातल्या उत्तम कवींपैकी एक आहे. तिच्या कविता जाणत्या आहेत, विनोदी आहेत आणि व्यक्तिसापेक्ष आहेत. ह्या कवितांमागे प्रचंड अनुभव उभा आहे. १९८०चा नोबेल विजेता, पोलिश साहित्य सृष्टीचा अध्वर्यू, ८५ वर्षांचा सझेस्ला मिलोझ

(CZESLAW MILOZ) म्हणतो की,'हा तिचा व्यक्तिश: विजय तर आहेच, तर ह्याचबरोबर तो पोलिश काव्याचाही गौरव आहे.

ह्याचवेळी चटकन विस्लावाची प्रतिक्रिया मात्र अशी की "झिबिजन्यू हरबर्ट, (Zbigniew Herbert) टाडूझ रोझेविक (Tadeusz Rozewicz) ह्या माझ्याबरोबरच्या दोन कवींना हा सन्मान स्वीडिश ॲकॅडमीने द्यायला हवा होता. असे अनेक कवी पोलिश काव्यप्रांतात गेली ४० वर्षं वावरत असलेले मला दिसतात. इतिहासकाळी विश्वास बसू नये इतका वेढला गेलेला हा पोलंड आज जगाला अत्यंत उत्तम कविता देतो आहे हे खरोबर अभिमानास्पद आहे."

पोलिश काव्याला आगळे वेगळे महत्त्व आहे, ते त्याच्या विसाव्या शतकाच्या अखेरीस असलेल्या तात्त्विक आणि नैतिक अधिष्ठानामुळे. गेले वीस वर्षे ह्या काव्याचे जे कौतुक होत आहे ते त्याच्या प्रचंड बौद्धिक प्रभावाचे, जुलुमांच्या उघड विरोधाचे आणि त्याच्या मानवी आणि लोकशाही मूल्यांचे ! उलटपक्षी असे दिसून येते की, फ्रेंच आणि जर्मन् काव्य शुष्क आणि उपदेशपर वाटते, इंग्रजी काव्य तोकडे आणि स्वत:पुरते वाटते, अमेरिकन काव्य स्वकेंद्रित आणि भाबडे वाटते. पोलिश कवी जगातल्या बरोबरीच्या इतर कवींप्रमाणे वाहून गेलेले नाहीत. साहित्याचे मानवी मूल्य जपण्यासाठी त्यांनी कष्ट उपसले, काव्यात्म कल्पनाशक्ती हे त्यांनी अनुकंपेचे हत्यार बनविले.

विसाव्या शतकातल्या कवींनी फक्त त्यांच्या स्वत:च्याच अनुभवांना शब्दरूप द्यायचे ठरवले, त्यांचा स्वत:चाच आवाज उठवायचे ठरवले, तरी त्यांना विसावे शतक विसरणे कठीण आहे. त्यांना ज्या गोष्टींचा साक्षीदार होण्याची अजिबात इच्छा नव्हती त्या त्यांना अनुभवाव्याच लागल्या – दुसरे महायुद्ध, ज्यूंचे शिरकाण (Holocaust), रशियाचे आक्रमण आणि त्यानंतरची रशियन गुलामगिरी, स्टॅलिनिझम, १९८१चा मार्शल लॉ हे आणि असेच. स्वत:च्या राष्ट्राला पायतळी तुडवलेले पाहूनही त्याकडे दुर्लक्ष करणे जातिवंत लेखकाला शक्यच नाही.

पोलंडचे कवी खरे म्हणजे तत्त्वज्ञानी आहेत पण त्यांना ऐतिहासिक वास्तवाचे भान ठेवावे लागले आहे. त्यांच्यावर लादला गेलेला इतिहास आपल्याला माहीतच नाही असे जरी त्यांना मानता येणार नसले तरीसुद्धा त्यांना सत्याचे स्वरूप, जीवनाचे सार ह्यामध्ये रुची वाटतेच. वास्तवात ते अनेक वर्षे हुकूमशाहीत राहात होते, त्याविरुद्ध लिहीत आहेत तरी देखील हे कवी यातना, काळ, देव ह्यांच्या मागचे तात्त्विक सत्य शोधण्याचा प्रयत्न करीतच आहेत. झिंबोरस्का तत्त्वज्ञानाने पछाडलेली कवयित्री आहे. त्यामुळे ज्यांची उत्तरे मिळणे कठीण आहे असे मोठमोठे आणि तरीही सूक्ष्म प्रश्न ती शोधून काढते. जगातील भव्य, उदात्त सौंदर्याचा भोवळ येणारा अनुभव ती असह्य अशा ऐतिहासिक वास्तवात बुडवून टाकते.



अनुक्रमणिका

सर्वसामान्य अनुभवांना झिंबारस्का तिच्या वक्रोक्तीपूर्ण विनोदाने अगदी वेगळेच परिमाण देऊ शकते. एखाद्या स्वच्छ नजरेच्या प्रियकराच्या दृष्टीने ती जगाकडे पाहाते आणि चालू शतकाबद्दलच्या मूलभूत गोष्टी समजू शकते. 'द्वेष' (Hatred) ह्या कवितेत ती म्हणते –

आमच्या ह्या विसाव्या शतकाचा द्वेष
– पाहा तरी किती ताकदीचा आहे
– अजूनही
– त्याचा आकार बदलला नाही
– अजूनही

'शतकाची अधोगती' मध्ये ती म्हणते –

आमचं विसावं शतक
– सगळ्यांवर कुरघोडी
करणारंच होतं.
काही प्रश्न तर उद्‌भवणारच नव्हते.
– यापुढे कधीही
उदाहरणार्थ सांगू – 'भूक' हो, आणि ती युद्धं, आणि.....आणि.....
दुबळ्यांच्या दुर्बलतेविषयी
वाटणार होता कळवळा,
वाटणार होता आदर,
क्वचित वाटणार होता विश्वासही
ज्यांनी योजलं होतं
जगाची मौज लुटण्याचं,
आनंद उपभोगण्याचं...
त्यांना फक्त समोर दिसतंय.
फजूल ! सगळंच फजूल !

'क्रॅकोव'मध्ये एका सामान्य इमारतीत पाचव्या मजल्यावर तीन खोल्यांच्या फ्लॅटमध्ये झिंबोरस्का राहाते. तिला सामान्य शेजारी आहेत. ते तिला शोभतातही कारण ती त्यांच्याचसारखी सामान्य वाटावी अशी राहात असते. पश्चिम पोलंडमध्ये जन्मलेली झिंबोरस्का वयाच्या आठव्या वर्षी कुटुंबाबरोबर क्रॅकोवला आली आणि आजतागायत ती तिथेच राहाते आहे. नाझींनी जेव्हा जर्मन राजवटीत पोलिश शाळा कॉलेजांवर बंदी घातली होती, तेव्हा ती शाळेत गुपचूप शिकत राहिली. युद्धानंतर ती जगेओलोनियन (Jagieollonian) विद्यापीठात शिकली. १९५२ ते १९८१ पर्यंत 'साहित्यजगत' (लिटररी

लाइफ) ह्या साप्ताहिकात तिने काम केले. ९ कवितासंग्रह तिने प्रसिद्ध केले. इंग्रजीतही त्या कवितांची भाषांतरे प्रसिद्ध झाली.

झिंबोरस्काने मुलाखती फारशा दिल्या नाहीत. पण म्हणून ती संकोची असेल किंवा बोलायला गडबडेल अशी समजूत करून घेतली तर ती चुकीची ठरेल. उलट ती अगदी मोकळीढाकळी, प्रेमळ, उत्साही आहे. 'नोबेल' मिळाल्यामुळे येणारे फोन पाहून ती अगदी चक्रावून गेली होती.

''मला नोबेल मिळेल असे मला कधी स्वप्नातदेखील वाटले नव्हते, आणि मी तसा प्रयत्नदेखील कधी केला नव्हता'' असे ती अभिमानाने सांगत होती. 'माझी कविता तुम्हाला चांगली वाटली असेल तर ती इतर चांगल्या पोलिश कवींच्याबरोबर वाढली म्हणून ! कवी कधी पोकळीत, शून्यात प्रगल्भ होऊ शकत नाही. पोलिश काव्याला एक स्वतंत्र तेज आहे.'

तिच्याच तोडीचे दहा कवी– कवयित्री पोलंडमध्ये आहेत असे ती म्हणते आणि त्यातल्या दोघांचा तिने जाहीर उल्लेखही केला आहे. – रोझेविक आणि हर्बर्ट. तिला त्या दोघांना नोबेल मिळाले नाही आणि कदाचित कधीच मिळणार नाही याची रुखरुख लागली आहे.

झिम्बोरस्का आणि तिच्या पिढीच्या सहलेखकांना एका भयाण अनुभवाला सामोरे जावे लागले. ह्या अनुभवामुळे त्यांच्यामध्ये एक तीव्र अशी समान भावना (Spirit) निर्माण झाली. दुसऱ्या महायुद्धात पोलंडची एक पंचमांश प्रजा (जवळजवळ साठ लक्ष लोक) मारली गेली. झिम्बोरस्काच्या पिढीला त्याचमुळे असे वाटत राहिले की जर्मन आक्रमणातून जे वाचू शकले नाहीत, त्यांच्यावतीने बोलणे हे आपले कर्तव्य आहे. हे भयाकारी युद्ध सगळ्याच मूल्यांना तुडवणारे ठरले.

ह्या अनुभवानंतर पूर्वीच्याच भाषेत गोड गोड लिहिणे शक्यच नव्हते. आम्हाला सगळ्यांनाच अगदी साध्या, रांगड्या भाषेची गरज वाटायला लागली. आम्हाला अकृत्रिम असे काव्य हवेसे वाटू लागले. युद्ध आणि मृत्युंकांड यातून बचावलेल्यांना प्रशस्त, ऐसपैस, नटवलेली किंवा भरदार आवाजातली भाषा वापरणे जमणारच नव्हते.

तिची पिढी एका वंशाबद्दल किंवा मतप्रणालीबद्दल अविश्वास बाळगून होती. तिच्याच एका पुस्तकात तिने कम्युनिझमबद्दल एक विधान केले आहे. क्रॅकोवमध्ये तिच्या पूर्वीच्या कम्युनिस्टधार्जिण्या कविता वाचल्या जात होत्या. ती नोबेल प्राइझ घेताना काय म्हणाली ते ह्याच लेखात अंतर्भूत केलेले आहे.

तिच्या तारुण्यात ती एकेवेळी साम्यवादावर विश्वास ठेवीत होती हे ती मान्यच करते. साम्यवादानेच जग वाचू शकेल अशी तिची तेव्हा भावना होती. मात्र लवकरच तिच्या हे ध्यानात आले की हा हेतू साम्यवादातून साध्य होणे शक्य नाही. ''कवयित्री म्हणून सुरुवात करीत असताना मी मानवतेवर प्रेम करीत होते. मला मानवी जगतासाठीच काहीतरी चांगले करायचे होते. पुन्हा लवकरच माझ्या लक्षात आले की मानवजमात वाचणे शक्य नाही.



अनुक्रमणिका

मानवतेवर प्रेम करायची गरज नाही, फक्त 'लोक' आवडायला हवेत. प्रेम नको, फक्त आवड हवी. माझ्या अवघड आयुष्यक्रमातून मी इतका बोध घेऊ शकले.'

साम्यवादावर विश्वास काही तिने एकटीनेच ठेवला नाही. जवळजवळ तिच्या सगळ्याच पिढीने साम्यवाद एकदमच स्वीकारला. बाहेर पडताना मात्र त्यांना एकेकट्यांनाच त्याचा मार्ग शोधावा लागला. एक विसाव्या दशकातला रशियन लेखक म्हणाला की, "माणसं मूर्खपणा करताना धाऊक मूर्खपणा करतात. पण ती शहाणी होत जातात ती मात्र किरकोळीने !"

झिम्बोरस्काचे हसणे सहज, निर्मळ आहे. पण दुःखावर पांघरूण घालून ती हसते आहे हेही पाहाणाऱ्याच्या लक्षात येते. १९५६ नंतर 'कॉलिंग आउट टू येती' ह्या काव्यसंग्रहाचे-वेळी साम्यवादावर विश्वास ठेवणे म्हणजे हिमालयातल्या 'यती' ह्या कल्पनेवर विश्वास ठेवणे असे तिला वाटू लागले. साम्यवादापासून मानवी 'ऊबही' मिळत नाही आणि कलावंताचे 'सौख्यही' मिळत नाही.

१९६० मध्ये मात्र झिंबोरस्का बदललीच असे वाटायला लागले. कारण स्वतःच्या कवी म्हणून असलेल्या प्रतिमेचे मुखवटे आणि डावा संशयवाद (Radical Skeplicism) तिने नाकारायला सुरुवात केली. हा कलंक नाहीसा करणे हाच तिचा उद्योग बनला. १९५५ पासूनच तिने 'आम्ही' न म्हणता 'मी' म्हणून कविता करायला सुरुवात केली. स्वतःचे विचार पारखून घेणे, कुणाच्या वतीने बोलण्यापेक्षा स्वतःच्या मनाने प्रश्न सोडविणे, त्या दृष्टीने विचार करणे तिला गरजेचे वाटू लागले आणि ती स्वतःसाठी बोलू लागला झिंबोरस्का स्वतःसाठी बोलते, स्वतःच्या नावानिशी, स्वतःच्या पद्धतीने बोलते हेच पोलंडच्या लोकांना महत्त्वाचे वाटत होते. त्यापूर्वी कवी दबलेल्या, धाकाखाली असलेल्या समाजाच्या वतीने, राष्ट्राच्या नावे बोलत असत.

तिच्या कविता व्यक्तिगत असतीलही. पण त्या खाजगीही नाहीत किंवा कबुली देणाऱ्या, झाडा देणाऱ्या देखील नाहीत. ती अगदी सहज, अकृत्रिम पद्धतीने जगाचे प्रश्न मांडते. कविता अगदी साध्या विरोधाभास वाटणाऱ्या शब्दात सुरू होते –

'चार अब्ज लोक
या जगात राहातात.
पण माझी कल्पनाशक्ती
मात्र अजून तेवढीच आहे.'

साहजिकच ती कविता फार वरच्या उंचीवर जाऊन पोहोचते. एखाद्या कल्पनेच्या मागे लागून तिचा गुंता सोडवीत बसणे आणि त्यातून काय निष्पन्न होते हे पाहाणे ही तिची पद्धतच आहे. त्यामुळे एखाद्या विषयाला पूर्ण भिडून त्याचा गर्भितार्थ बाहेर काढणे तिला सहज शक्य होते. तिच्या कवितेची तरलता, बोलण्यातली 'ओठी एक पोटी अेक' अशी राजकारणी चतुराई, सफाई आणि आदर्शवादी कल्पनांचा गोंधळ ह्यांची प्रतिक्रिया म्हणून तिची कविता नितळ झाली आहे.



अनुक्रमणिका

कवितेचे स्थान काय ह्याबद्दल तिची मते स्पष्ट आहेत.

"काव्य मानवता वाचवू शकत नाही, जगालाही वाचवू शकत नाही. फक्त वाचकाच्या व्यक्तिगत चिंतनाला ती मदत करू शकते. त्याच्या आध्यात्मिक जीवनाचे ती उन्नयन करू शकते. एखाद्याचा एकाकीपणा कमी करायला मात्र कविता उपयोगी पडू शकते."

एका पत्रकाराला पोलिश काव्याच्या प्रातिनिधिक स्वरूपाबद्दल कुतूहल होते. त्याने ॲडम झॅगझेव्हस्की ह्या तरुण कवीला हा प्रश्न विचारला. मिलोसेझ, हर्बर्ट आणि झिम्बोरस्का ह्या सगळ्या महान कवींपेक्षा तो वयाने लहान, पण त्यांच्याच इतका नोबेल मिळवायचा शक्यता, योग्यता असलेला असा कवी होता. हाच प्रश्न ह्या पत्रकाराने झिंबोरस्काला विचारला. 'एक व्यक्ती आणि समुदायं ह्यांच्यातले ताणतणाव, त्यांच्यातला संवाद हे आजच्या पोलिश काव्याचे मूलस्त्रोत का वाटतात?'

ती म्हणाली की 'ह्या द्वंद्वातूनच, ह्या विरोधातूनच काव्य जन्माला येतं असं मला वाटतं.' तो पत्रकार पुढे म्हणतो की तिला स्वत:च्या काव्याला अशी लेबले लावून नको होती. तिची कविता विनोदी होती आणि त्याचवेळी त्यात कारुण्य होते. ह्या दोन्हींमुळे तिच्या काव्याचा तोल नाजूकपणे सांभाळला गेला. ती म्हणते,'माझ्या काव्याची वैशिष्ट्यं आल्हाद आणि निराशा ही आहेत.'

त्या पत्रकाराला जोसेफ ब्रॉडस्कीच्या एका विधानाबद्दलही झिंबोरस्काचे मत जाणून घ्यायचे होते. ब्रॉडस्की म्हणाला होता,'पोलंडसारख्या ज्या देशात इतके महान कवी आहेत त्या देशाने स्वत:ला सुखी देश मानायला हवे.'

ह्यावर झिंबोरस्का म्हणाली की "मला तसं वाटत नाही."

---

जुन्या महान चित्रकारांच्या निसर्गचित्रांमध्ये
– झाडांची मुळं तैलरंगाखालीही असायची.
– रस्ते नि:संशय मुक्कामाला पोचायचेच.
– सही म्हणून निशाणीच्या जागी असायचं
डौलदार गवताचं पातं.
– भुरळ पाडणारे दुपारचे पाच वाजले आहेत.
– हळुवारपणे पण तितक्याच ठामपणेदेखील
'मे' थोपवला गेला.
– सख्या, म्हणून तर मी तशीच थांबले आहे.
– होय, ॲश ट्रीखाली
– ती स्त्री – मीच !
पाहा तर खरं मी तुला मागे टाकून
किती दूर गेले आहे.
पांढरं टोपरं आणि पिवळा स्कर्ट
मी घातलेला – पाहा तरी
माझी परडी चित्राबाहेर जाऊ नये
म्हणून मी किती पोटाशी धरल्ये ते तरी पाहा.
दुसऱ्याच्या नशिबात मी मिरवते आहे पाहा कशी
थोडे दिवस तरी गूढ गोष्टीत जगण्यातून
मी विश्रांती घेते आहे.

**– लँडस्केप – १९६७** (निसर्गचित्र?)

**विस्लावा झिंबोरस्का**



अनुक्रमणिका

## २. 'मला ठाऊक नाही' –विस्लावा झिम्बोरस्का

### –१९९६चे नोबेल पारितोषिक घेतानाचे निवेदन

माझ्या कोणत्याही भाषणातलं पहिलं वाक्य नेहमीच अत्यंत अवघड असतं असं लोक म्हणतात. अर्थात हे ते माझ्या पाठीमागे बोलतात. पण मला मात्र असं वाटते की– तिसरं, सहावं, सातवं. . . . . अगदी अखेरच्या वाक्यापर्यंत सगळीच वाक्य तितकीच अवघड असतात. ह्याचं कारण म्हणजे मी बोलत असते काव्याबद्दल ! वास्तविक ह्या विषयावर मी फारच थोडं बोलले आहे, जवळजवळ नाहीच म्हणा ना ! पण जेव्हा केव्हा मी बोलते तेव्हा माझी अंतर्यामी अगदी खात्री झालेली असते की हे भाषण काही फारसं बरं झालेलं नाही. त्याकारणानं आजचं माझं हे भाषणदेखील अगदी लहानसं होणार आहे. त्रुटीच ऐकायच्या असतील तर त्या जेवढ्या कमी शब्दात ऐकाव्या लागतील तेवढ्या अधिक सुसह्य !

माझ्या समकालीन कवींना स्वत:बद्दल अतिशय अविश्वास असतो, संशय असतो. त्यामुळे आपण कवी आहोत हेच मान्य करायला ते तयार होत नाहीत. झालेच तर इतक्या नाखुषीने ते स्वत: कवी असल्याचं कबूल करतात की, आपण कवी आहोत हे मान्य करायचीच जणू त्यांना लाज वाट असावी ! सध्याच्या धूमधमालीच्या काळात स्वत:चे दुर्गुण स्पष्ट मांडणं अधिक सोपं आहे, मात्र त्यांची मांडणी योग्य प्रकारे व योग्य शब्दात झाली असली तरच त्याच्याशी तुलना करतो. स्वत:चे गुण शोधणं त्यामानाने अवघड असतं. कारण ते अगदी आत आत असतात, सुप्त असतात. त्यामुळे ते आपल्याजवळ आहेत ह्याचा आपल्याला पत्ताही लागत नाही. कवी जेव्हा एखादी प्रश्नावली करतो किंवा त्रयस्थाशी बोलतो त्यावेळी त्यांना स्वत: कोण आहोत हे सांगावंच लागतं.

अशावेळी ते जो व्यवसाय चाकरी करीत असतील, त्याबरोबर मी कवी आहे असं न म्हणता मी लेखक आहे असं मोघम म्हणतात. जेव्हा सरकारी नोकर आणि बसमधल्या सहप्रवाशांना कळते की ते कवीबरोबर बोलत आहेत. तेव्हा ते थोड्याशा अविश्वसनीय सावधानतेनं वागतात. तत्त्वज्ञानी माणसाला ह्याच पद्धतीची वागणूक मिळत असावी असं मला वाटतं. मात्र त्याची स्थिती जरा अधिक बरी असावी. कारण तत्त्वज्ञाला कधीतरी एखादी पदवी लाभू शकते. कमीतकमी तत्त्वज्ञानाचा प्राध्यापक हे म्हणायला जरा अधिक आदरणीय वाटतं.

पण काव्याचे प्राध्यापक असा कोणी अस्तित्वात नाही. म्हणजेच खास अभ्यासक्रम नियमित परीक्षा, शब्दसूची, संदर्भसूची, तळटीपा यासह लिहिलेले तात्त्विक संशोधित लेख आणि मग विद्यार्थ्यांना त्यासाठी दिल्या जाणाऱ्या पदव्या ह्या गोष्टी काव्याच्या संदर्भात उद्‌भवत नाही. म्हणजेच ह्या पद्धतीने आपण 'कवी' आहोत हे सिद्ध करण्यासाठी कागदच्या कागद भरून लिहिलेल्या अतिशय उत्तम अशा कविता उपयोगाच्या नाहीत. सरकारी शिक्का

असलेला कागदाचा चिटोरा हाच अत्यंत निर्णायक महत्त्वाचा !

आपल्याला आठवतच असेल की अशा प्रकारचे राजपत्रित प्रमाणपत्र नसल्यामुळे रशियन कवी जोसेफ ब्रॉडस्कीला त्यांनी बंदीत टाकलं होतं. (जोसेफ ब्रॉडस्की, जन्म १९४० – हे अलिकडेच मरण पावले. रशियात जन्मलेला पण अमेरिकेत स्थायिक होऊन प्रसिद्ध पावलेला कवी. रशियन आणि इंग्रजी अशा दोन्ही भाषांत कविता. द लँड ऑफ ब्यूटीफुल इरा (१९७७) हा संग्रह विशेष प्रसिद्ध आहे. १९८७चे सहित्याचे नोबेल प्राइझ त्याला मिळालेले आहे) त्याला कवी असण्याची परवानगी राजपत्रित प्रमाणपत्राद्वारे देण्यात आलेली नव्हती. सरकारी अधिकाऱ्यांनी त्याला सामाजिक बांडगूळ ठरवून टाकलं

बऱ्याच वर्षापूर्वी ब्रॉडस्कीला भेटण्याचा मान आणि आनंद मला मिळाला होता. माझ्या लक्षात आलं की, मला आतापर्यंत ठाऊक असलेल्या कवींमध्ये हा एकच असा होता की, त्याला स्वत:ला कवी म्हणवून घेण्यात खुशी वाटत होती, भूषण वाटत होतं. तो भावविवश होऊन नव्हे तर बेदरकारपणे, अगदी मोकेळेपणाने, कोठच्याही प्रकारचं बंधन न मानता स्वत:ला कवी म्हणवून घेत होता. मला तर असं वाटतंय की त्याच्या तारुण्यात जी क्रूर, जीवघेणी कुचेष्टा त्याच्या वाट्याला आली, त्याच्यामुळेच तो असं वागत असावा.

कम्युनिस्ट देशापेक्षा अधिक नशिबवान देशात माणसांच्या अस्मितेवर, जणू तो राज्यकर्त्यांचा हक्कच आहे, अशा प्रकारचा हल्ला होऊन त्यांची मानहानी होत नाही. कवींना प्रसिद्धीसाठी वाट पाहावी लागते हे कोणीही मान्य करील. आपणास समजावून घेणारे वाचक मिळावेत, त्यांना आपली कविता समजावी. ह्यासाठी ते आसुसलेले असतात. सामान्यांच्या कळपापासून किंवा रोजच्या कटकटीपासून दूर राहावं, यासाठी मात्र कवी काहीही करताना दिसत नाहीत. गोष्ट फार लांबची नव्हे. ह्या शतकाच्या पहिल्या काही दशकात चित्रविचित्र कपडे करून आणि विक्षिप्त वागून कवी आपल्याला धक्के देत असत. ही होती फक्त दाखवेगिरी. मात्र ज्या क्षणी कवींना स्फूर्ती येत असे त्याचक्षणी सगळे दरवाजे बंद करून, बाह्य वेष उतरवून, आभूषणे काढून टाकून, इतर फाफटपसारा दूर सारून, पांढरा कागद घेऊनच बसणं बाहेर पडे. अगदी शांतपणे, धीर न सोडता, घायकुतेपणा न करता आपल्या स्वत:च्या व्यक्तिमत्त्वाची वाट पाहात त्या पांढऱ्या कागदाला सामोरं जावं लागतं. शेवटी महत्त्व फक्त त्यालाच उरतं.

मोठमोठे शास्त्रज्ञ आणि कलावंत ह्यांच्या जीवनावर आधारलेल्या चित्रपटांची संख्या चांगलीच मोठी असते. हे काही अपघातानेच घडत नाही. महत्त्वाकांक्षी दिग्दर्शक महत्त्वाचे शास्त्रीय शोध किंवा एखाद्या उत्कृष्ट ग्रंथाची निर्मिती, या दोघांच्या मागे जी नवनिर्मितीची प्रक्रिया, सर्वसामान्य जनास खात्री पटेल व ती त्यांना मान्य होईल अशा पद्धतीने पडद्यावर आणण्यासाठी प्रचंड धडपड करतात. काही विशिष्ट प्रकारचे "विज्ञानांच्या क्षेत्रातले परिश्रम" काही प्रमाणात यशस्वीपणे आविष्कृत करणं एखाद्याला जमेलही. प्रयोगशाळा, प्रयोग साधनं, मोठमोठी यंत्रसामुग्री पडद्यावर बघणं याचं आकर्षण प्रेक्षकांना काही काळ वाटेल आणि ते

अनिश्चततेचे क्षण. . . . . दरवेळी किंचितसा बदल करून, हजारो वेळा तोच तो प्रयोग करावयाचा. सरतेशेवटी हवं असलेलं फलित प्राप्त होईल का? या श्रमातून काही निष्पत्ती होईल का? ते अनिश्चततेचे क्षण अगदीच नाट्यपूर्ण. चित्रकारांबद्दलचे चित्रपट प्रेक्षणीयच असतात. एखाद्या प्रख्यात कलाकृतीची उत्क्रांती, कशी कशी होत गेली, याची पुन्हा एकदा निर्मिती या चित्रपटाच्या माध्यमातून होते. पेन्सिलीने काढलेल्या पहिल्या रेषेपासून ते ब्रशच्या शेवटच्या फटकाऱ्यापर्यंतच्या सगळ्या अवस्थांचं चित्रण त्या चित्रपटात असतं. संगीत रचनाकारांच्याबद्दल चित्रपटात संगीताला चांगलंच उधाण येतं. संगीतरचनाकाराच्या कानात प्रथम किणकिणलेले स्वरच, एखाद्या परिपक्व अशा संगीत रचनेच्या रूपाने सरतेशेवटी आविष्कृत होतात. अर्थात हे सारं विवेचन तसं चांगलेच भोळसट आहे. 'स्फूर्ती' या शब्दाने संबोधल्या जाणाऱ्या त्या अनोख्या मानसिक स्थितीचं स्पष्टीकरण त्यातून होत नाही. परंतु किमानपक्षी ज्याच्याकडे पाहाता, काहीतरी ऐकता येईल असं तिथं काहीतरी आहे.

पण कवी हे पार कुचकामाचे. त्यांच्या कारागिरीला छायाचित्रात पकडता येत नाही. त्या दृष्टीने ते सारेच निराशाजनक. टेबलापाशी बसून किंवा आढ्याकडे– समोरच्या भिंतीकडे काही हालचाल न करता, टक लावून बघत बसणारा हा प्राणी. कधीतरी तो कागदावर अनेक ओळी खरडतो, त्या सुद्धा, लगेच पंधरा मिनिटांनी खोडून टाकण्यासाठी, आणि मग आणखी एक तास जातो या वेळात काहीही घडत नाही. हे अशा प्रकारचं दृश्य आणि त्याचं चित्रण हे कोण पाहाणार आहे? त्यात पाहायचं ते काय?

मी स्फूर्तीचा उल्लेख केला. स्फूर्ती म्हणजे काय, आणि ती खरंच अस्तित्वात असते का? या अशा प्रकारच्या प्रश्नांना विद्यमान कवी उडवाउडवीची उत्तरं देतात. या आंतरिक प्रेरणेच्या वरदानाबद्दल त्यांना कधीही काहीही माहिती झाली नव्हती असं नाही. आपल्या स्वत:लाच जे समजत नाही ते दुसऱ्याला स्पष्ट करून सांगणं सोपं नाही इतकेच.

मलासुद्धा हे प्रसंगोपात्त विचारलं गेलं तेव्हा मी तशी टाळाटाळच केली. पण माझं उत्तर असं आहे. स्फूर्ती ही फक्त कवी किंवा कलावंत यांची खास मक्तेदारी नाही. स्फूर्ती ज्यांना भेटली आहे असा विशिष्ट लोकांचा गट पूर्वी होता. आजही आहे आणि नेहमीच तसा गट यापुढेही निश्चितपणे असणार आहे. आपला व्यवसाय– धंदा ज्यांनी जाणीवपूर्वक निवडला आहे, आणि जे आपलं काम जिव्हाळ्याने, प्रेमाने कल्पकतेने करतात, त्या सर्वांचाच या गटात समावेश आहे. वैद्यकीय– डॉक्टर, शिक्षक, माळी – या यादीत आणखीही शेकडो व्यवसायांचा– धंद्याचा अंतर्भाव मला करता येईल. त्यांच्या कामात ते जोपर्यंत नवीनवी आव्हानं शोधीत राहतील; तोपर्यंत त्यांचं काम सदैव अनोखा प्रयोग वा आव्हान होऊन राहील. अडचणी, अथवा पीछेहाट झाली म्हणजे मग, त्यांची जिज्ञासा, कुतूहल शमलं असं कधीही होत नाही. त्यांनी एखादी समस्या सोडवली, की त्यातूनच एक नव्या प्रश्नांचा डोंगर उभा राहील. स्फूर्ती काही का असेना, कशी का असेना, पण ती जन्माला येते ती 'मला ठाऊक नाही' ह्या जपातून.

मात्र ह्या प्रकारची माणसं फारशी नाहीतच. ह्या पृथ्वीवरचे बरेचसे लोक, आला दिवस पार पाडण्याकरिताच काम करतात. हा किंवा तो व्यवसाय / धंदा त्यांची त्याला बांधिलकी आहे, अथवा त्यासंबंधी त्यांच्या उत्कट अशा भावना आहेत, म्हणून त्यांनी निवडलेला नसतो. याउलट त्यांच्या जीवनात अवतीभोवती जी परिस्थिती असते, तीच त्यांच्यासाठी त्यांच्या व्यवसायाची / धंद्याची निवड करते. निष्प्रेम काम, कंटाळवाणं काम, हे असं काम, दुसऱ्यांना एवढंसुद्धा मिळत नाही, म्हणून ते या अशा प्रकारच्या कामाला महत्त्व देतात व स्वीकारतात. मनुष्यजीवनातील अत्यंत खडतर आपत्तींपैकी हा एक भाग येत्या शतकातदेखील, आजवर जे काही घडलं, आणि होत आहे. त्यात काही चांगला बदल निर्माण करतील, असं सूचन करतील अशा काहीही खुणा दृष्टोत्पत्तीस येत नाहीत, आणि म्हणूनच स्फूर्ती या संबंधात, कवींना 'एक स्वामित्व' बहाल करण्याचं मी नाकारलेलं असलं, तरीसुद्धा नशिबाचे लाडके असा जो निवडक व विशिष्ट गट आहे, त्यात मी त्यांना अजूनही स्थान देते.

श्रोत्यांच्या मनात आता काही शंका उभ्या राहिल्या असतील. सगळ्या प्रकारचे छळक, हुकूमशहा, धर्मांध, गावगुंड आणि आतंकवादी, हे सारे तारस्वरात उच्चारलेल्या काही घोषणांच्या मदतीने, सत्तेसाठी संघर्ष करतात. तसंच ते जे काम करीत असतात, त्यावर ते खूश असतात. हे काम ते उपक्रमशीलता प्रकट करून आणि तळमळीने करतात. होय, खरं आहे ते, पण त्यांना 'ठाऊक' असतं; आणि त्यांना जे ठाऊक असतं, ते त्यांना पुरेस असतं– अगदी कायमचं. त्यांना दुसरं काही शोधून काढायचंच नसतं.

कदाचित नव्या शोधामुळे त्यांच्या बोलण्यातला जोरच निघून जाईल. जे ज्ञान लगेच नवे प्रश्न निर्माण करीत नाही, ते मरून जातं. जिवंत राहाण्यासाठी आवश्यक असणारं तापमान टिकवून ठेवणं हे नवे प्रश्न निर्माण न करणाऱ्या ज्ञानाला जमत नाही. प्राचीन आणि आधुनिक इतिहासात आत्यंतिक टोकाला गेलेली, या प्रकारची उदाहरणं चांगलीच प्रसिद्ध आहेत. या उदाहरणातून काय दिसतं? समाजाचा विनाश करणाऱ्या धमक्या ही उदाहरणं देत आहेत असं दिसतं. म्हणूनच "मला माहीत नाही" ह्या तीन शब्दांचं मला महत्त्व वाटत. माझ्या लेखी त्यांचं 'मूल्य' प्रचंड आहे. शब्द आहेत साधेच पण त्यांची झेप फार मोठी आहे. अंतर्यामीचा पैस तसेच या महान विश्वात आपली पृथ्वी जी अधांतरी आहे, या दोघांचा अंतर्भाव व्हावा यासाठी हे तीन छोटे शब्द आपलं जीवन विस्तारित करतात. आयझॅक न्यूटन हा महान शास्त्रज्ञ जर स्वत:शी कधीच म्हणाला नसता "मला ठाऊक नाही" तर मग त्याच्या छोट्या बागेतील सफरचंदं जमिनीवर गारगोटीप्रमाणे पडतच राहिली असती. फारतर खाली वाकून त्याने ती उचलली असती आणि भराभर तोंडात टाकून फस्त केली असती एवढंच. माझी देशभगिनी मेरी स्क्लोडोवस्का – क्यूरी जर स्वत:शीच ठाऊक नाही असं म्हणाली नसती तर . . बहुधा उच्चवर्गीय मुलींच्या खाजगी शाळेत रसायनशास्त्र शिकवीत राहिली असती; ती मानाची नोकरी करीत तिने आपली कारकीर्द संपवली असती.

पण असं घडलं नाही. "मला ठाऊक नाही" असा मंत्र ती जपतच राहिली. आणि त्या तीन छोट्या शब्दांनी तिला एकदा नव्हे दोनदा स्टॉकहोम याठिकाणी आणून पोचवलं. अस्वस्थ आणि सातत्याने नवेनवे प्रश्न उभे करून व त्यांची उत्तरं शोधणाऱ्या महाभागांना मधूमधून नोबेल प्राईज दिलं जातं.

कवी, जर ते सच्चे असतील तर त्यांनी "मला ठाऊक नाही" ह्या मंत्राचा जप करीत राहिलं पाहिजं. या विधानाचं उत्तर देण्याचा प्रयत्न हा प्रत्येक कवितेत टिपलेला असतो. कवितेचा शेवट जवळ आला, की कवी काकूं करायला लागतो. त्याला जाणवायला लागतं की हे उत्तर अगदी कुचकामाचं आहे. नि:संशयपणे कमालीचं अपुरं आहे. मग तो पुन्हा पुन्हा प्रयत्न करतो, परत परत लिहितो, आणि या व्यापात लिखित कागदांचा एक गठ्ठाच तयार होतो. कवीच्या एकामागोमाग येणाऱ्या आत्म– असंतोषाचा तो परिणाम. लगेच किंवा कालांतराने हे कागद एकत्रित केले जातात. एका चांगल्या जाडजूड क्लीपने वाङ्मयीन इतिहासकार ते एका कव्हरात बंदिस्त करतात, मग त्याला नाव दिलं जातं 'लेखकाचं / कवीचं 'समग्र साहित्य.' मी कधीकधी अशा एखाद्या परिस्थितीचा विचार करते की ती वास्तवात येणं कठीण आहे. अतिशय धार्ष्ट्याची कल्पना माझ्या मनात येते ती अशी की सर्व मानवी प्रयत्नांच्या दांभिकतेबद्दल वहाता शोक ज्यांनी व्यक्त केला आहे अशा एखाद्या धार्मिक पुस्तकाच्या लेखकाबरोबर (ECCLESIASTES) – एकलेझिआस्टेस). मला गप्पा मारण्याची संधी मिळेल. मग मी त्याच्यासमोर नम्रतेने वाकेन, कारण मला तरी तो सर्वांत महान कवी वाटतो. मी त्याचा हात झटकन हाती घेईन आणि त्याला विचारीन का सूर्याखाली काहीही नवीन नाही असं तू एकलेझिआस्टेस लिहितोस, पण अरे, तू पण एकेकाळी नवीनच होतास की ! शिवाय तुझी कविताच नवीन नव्हती का? तुझ्या आधी ती कुणीच लिहिली नव्हती. ज्यांनी तुझी कविता वाचली ते वाचकही नवेच होते की. . . . ? कारण तुझ्यापूर्वी होऊन गेलेल्या लोकांना तुझी कविता वाचावयास मिळाली नसती. कारण ती अस्तित्वाच नव्हती. तू ज्या सायप्रस वृक्षाखाली बसला आहेस. तो काही काळाच्या 'आदि'पासून वाढू लागला नव्हता. दुसऱ्या एका सायप्रसपासून, तुझा सायप्रस निर्माण झाला हे खरे पण तो म्हणजे हा नव्हे. हा दुसराच ! आणि हे 'एकलेझिआस्टेस' मला तुला आणखीही काही विचारायचंय. "सूर्याखालची आणखी कोणती नवी गोष्ट तू आता लिहिण्याची योजना करीत आहेस? तू आधीच व्यक्त केलेल्या विचारांची पुरवणी? की त्यांच्याच विरोधात लिहिण्याचा मोह होत आहे? तुझ्या आधीच्या लेखनात तू आनंदाचा उल्लेख केलास – तो आनंद क्षणभगुंर असला म्हणून काय झालं? ते काहीही असो, सूर्याखालची तुझी नवी कविता आनंदाबद्दल असेलही. तुझ्या टिपणी काढून झाल्या का? कच्चा खर्डा तुझ्याकडे आहे का? मला अशी शंका येते आहे की तू म्हणशील "मी सगळं लिहून टाकलंय" आता नवीन असं काहीच उरलं नाही. माझ्याजवळ आणखी लिहिण्यासारखं ! जगातला कुठलाच कवी असं कधीही म्हणणार नाही. किमानपक्षी तुझ्यासारखा अत्यंत थोर कवी तर नाहीच नाही.

ही पृथ्वी, आपणास तिच्याबद्दल एरवी काहीही वाटो. ती तशी आश्चर्यचकित करणारी आहे. मग ते विश्व आणि या पृथ्वीचा जगड्व्याळ पसारा पाहून आपण भीतीग्रस्त होतो, आणि आपल्या नाकर्तेपणाची प्रचीती येते. माणसं आणि प्राणी ह्या सर्वांच्या व्यक्तिगत दु:खाविषयींची बेफिकिरी पाहून कडवटपणाची वृत्ती तयार होतेच. माणस आणि प्राणी यांच्याप्रमाणे यदाकदाचित् वृक्ष आणि वेली यासंबंधी असंच म्हणता येईल. (वृक्ष- वेलींना दु:ख सहन करावं लागत नाही. ती भावना त्या जीवसृष्टीत उद्भवतच नाही असा ग्रह निश्चितपणे कोणीही करून घेणं, बरोबर ठरेल का?) ग्रहांच्या (खरं म्हणजे हे केव्हाच मृत झाले आहेत, अजूनही ते त्याच अवस्थेत आहेत का?) सभोवताली असलेल्या ताऱ्यांचा नुकताच शोध लागला. त्यांच्यापासून निघालेल्या किरणांनी, या पृथ्वी भोवतालच्या अवकाशाला छेद दिला. मग आपणास, त्या अवकाशाबद्दल काहीही वाटो. खरं तर या सर्व गोष्टींबद्दल आपणास तशी काहीही माहिती नाही. खरं म्हणजे, ज्याचें मोजमाप घेता येत नाही, आणि ज्याला मोजमापच नाही, अशा एका नाट्यगृहात आपल्याला आरक्षित तिकिटं मिळालेली आहेत. ही तिकिटंही अगदी थोड्याशाच काळासाठी आहेत. फक्त, कोणताही मापदंड नसलेल्या सोडतीशी मिळता- जुळता, अशा दोन तारखांनी अधोरेखित केलेला काळ; पृथ्वी ही आश्चर्यचकित करणारी आहे. त्याची ही अल्पस्वल्प मीमांसा.

आश्चर्यकारक हे गुणात्मकता दर्शविणारं विशेषण एक छुपा तर्कशास्त्रीय सापळा आहे. जगमान्य झालेल्या आणि सर्वांना ठाऊक असलेल्या, जे मनाला आणि डोळ्यांना सहज दिसतील अशा रीतीरिवाज व प्रणालींपासून दूर जाताना, नाही म्हटलं तरी फारच आश्चर्य वाटतं. पण, मुद्दा असा की इथे मनाला आणि डोळ्यांना सहज स्पष्ट दिसेल असं जग, अशी गोष्टच अस्तित्वात नाही. आपल्याला त्याचंच आश्चर्य वाटतंय, आणि ते दुसऱ्या कोठच्या तरी गोष्टींबरोबर केलेल्या तुलनेवर आधारित नसतं.

दैनंदिन संभाषणात, आपण प्रत्येक शब्दाचा वापर करताना थबकत नाही, हे आपण मान्य करूया. संभाषणात आपण 'सामान्य जग' 'सामान्य आयुष्य' 'सामान्य घटनाक्रम' या शब्दसमूहांचा वापर करतो हे देखील मान्य. पण काव्याची जी भाषा आहे; त्यात मात्र असं चालत नाही. तिथे प्रत्येक शब्द तोलला जातो, प्रत्येक शब्द सामान्य असत नाही, प्रत्यक्ष शब्दाचा अर्थ नेहमीच्याच वापरातला असतो, तसाच असतो असंही नाही, एखादा दगड, एखादा ढग हा अर्थाच्या दृष्टीने संभाषणातील अर्थाच्या 'पुढे' असतो असं नाही तसेच एखादी रात्र; या शब्दाचा अर्थ 'मागे'ही नसतो, आणि सरतेशेवटी ते काहीही असो, या जगातील अस्तित्व, अगदी कोणाचंही अस्तित्व तसं सामान्य असत नाही.

कवींना आपलं काम हे आखून दिल्यासारखंच. अगदी तयार, अगदी नेमून दिल्यासारखं आहे, असं जे कोणी कवी नाहीत त्यांना नेहमीच भासतं.

**स्टॉकहोम** **विस्लावा झिम्बोरस्का**

**८ डिसेंबर १९९६.**

---

# साहित्य आणि संशोधन

## चौकस ग्रंथसूचीकार

**– नाना जोशी**

तपशीलचे स्नेही व हितचिंतक श्री. यशवंत श्रीपाद रास्ते – ग्रंथपाल विलिंग्डन महाविद्यालय यांनी तयार केलेली व्यंकटेश माडगूळकर समग्र वाङ्मय सूची वाचीत असताना, ही अशा प्रकारची वाङ्मय सूची तयार करीत असताना किती कष्ट पडत असतील याची अंधुकशी कल्पना आली. अंधुकशी म्हटले याचे कारण प्रत्यक्षात कष्ट किती होतात, हे आधुनिक भाषेत सांगावयाचे झाल्यास, तो एक अस्तित्ववादी अनुभव असतो. या अशा ग्रंथ-सूचीत काही 'बनावट' आवृत्त्या घुसतात. ग्रंथ-सूची तयार करणाऱ्याने कितीही काळजी घेतली तरी त्या 'बनावट' आवृत्त्या त्या सूचीत प्रवेश मिळवतातच. सुदैवाने हे आपल्या महाराष्ट्रात घडत नाही. याचे कारण दुर्मिळ ग्रंथ व पुस्तिका यांचा संग्रह करणारे लोक आपल्याकडे जवळ जवळ नाहीतच. म्हणूनच दुर्मिळ ग्रंथ विक्री हा व्यवसाय करणारा एखाद-दुसराच. युरोप, अमेरिकेत दुर्मिळ ग्रंथ-पुस्तिका विक्री हा मोठा तालेवार व्यवसाय आहे. पाश्चिमात्य जगातील नियतकालिके जे कोणी पाहात असतील, त्यांना त्याची कल्पना करता येईल. उदा. न्यूयॉर्क टाईम्स बुक रिव्ह्यू या साप्ताहिकात, कोठले दुर्मिळ ग्रंथ उपलब्ध आहेत याची जाहिरात वाचावयास मिळते. जाहिरातीत समाविष्ट करण्यात आलेला दुर्मिळ ग्रंथ केव्हा प्रसिद्ध झाला, त्याची कोठची आवृत्ती किती किमतीस उपलब्ध आहे, इत्यादी तपशील त्या जाहिरातीत देण्यात आलेला असतो. वेळप्रसंगी मुळात – म्हणजे तो ग्रंथ वा पुस्तिका प्रथम प्रसिद्ध झाली तेव्हा त्याची किंमत समजा एक डॉलर असली तर वर्तमानकाली त्याची किंमत दहा हजार डॉलर एवढी प्रचंड असते. यामुळे काही लोकांना बनावट आवृत्त्या तयार करण्याचा मोह होतो.

अर्थात हे काम वाटते तितके सोपे नाही. पण गुन्हेगार बनावट आवृत्ती तयार करण्यात यशस्वी झाला, तर मग तो खोऱ्याने पैसे ओढणार असतो. या बनावट आवृत्त्या,(दुर्मिळ ग्रंथ) बाजारात आल्या, की मग ग्रंथ सूची तयार करणाऱ्याच्या कष्टात आणखीनच भर पडते. याचे कारण प्रत्यक्षात किती अस्सल आवृत्त्या प्रसिद्ध झाल्या, याचा निर्णय त्याला घ्यावा लागतो. अशा चौकस ग्रंथसूचीकारांच्या गुप्त पोलिसी थाटाच्या संशोधनाची कथा या लेखात वाचावयास मिळेल.

ग्रंथ सूचीकारात दोन प्रकार आहेत. त्यातल्या एका प्रकारात माझे मित्र श्री. यशवंत श्रीपाद रास्ते व श्री. जया दडकर या दोन सन्माननीय ग्रंथसूचीकारांचा समावेश होईल. हे सूचीकार एखाद्या लेखकाच्या समग्र वाङ्मयाची सूची किंवा एखाद्या विषयावर केल्या गेलेल्या सर्व लिखाणाची सूची तयार करतात. ग्रंथ-सूचीकारांचा दुसरा प्रकार तांत्रिक ग्रंथसूचीकारांचा, हे सूचीकार ज्या प्रकारचे काम करतात, तसे काम करणारे सूचीकार

भारतात व महाराष्ट्रात झाले असल्याचे माझ्या वाचनात नाही व मला कोणी त्याबद्दल सांगितलेही नाही. या तांत्रिक ग्रंथ सूचीकारांचे कार्यक्षेत्रच असे आहे की सर्वसामान्य वाचकाला ज्या गोष्टीत रस असतो त्याला हे सूचीकार फार क्वचित स्पर्श करतात. इतकेच नव्हे तर साहित्यक्षेत्रात विशिष्ट विषयावर संशोधन करणारे जे संशोधक असतात त्यांच्याही खिजगणतीत ते नसतात.

तंत्र वैज्ञानिक ग्रंथ सूचीकार पाश्चिमात्य जगताबाहेर तसे फारसे कोणाच्या परिचयाचे नाहीत. हे ग्रंथ सूचीकार ग्रंथ निर्मितीच्या अगदी बारीक-सारीक तपशीलात दुर्बिण घेऊन संशोधन करणारे लोक असतात. उदा. एखादा ग्रंथ कोठच्या छापखान्यात छापला गेला, त्याची आवृत्ती किती प्रतींची होती, या ग्रंथाचा त्याच्या प्रसिद्धीनंतरचा इतिहास व त्याचा तपशील या संबंधीचे विवेचन या लेखात येईलच. वाङ्मयाचा इतिहास लिहिणाऱ्या अभ्यासकाला या तंत्र वैज्ञानिक ग्रंथ सूचीकाराने उपलब्ध करून दिलेल्या साहित्याचा काहीही उपयोग नसतो, ही वस्तुस्थिती आहे. पण दुर्मिळ ग्रंथ खरेदी- विक्रीचा व्यवहार करणारे जे ग्रंथ विक्रेते आहेत त्यांच्या दृष्टीने या तंत्र वैज्ञानिक ग्रंथ सूचीकाराचे कार्य फारच महत्त्वाचे आहे. भारतात असा दुर्मिळ ग्रंथ विक्रीचा व्यवसाय करणारे दुर्विण घेऊनच शोधावे लागतील.

म्हणून तंत्र वैज्ञानिक सूचीकारही भारतात आढळत नाहीत. ऐहिक सुखाच्या पाठीमागे धावणाऱ्या पाश्चिमात्य जगतात परिस्थिती फारच वेगळी आहे. उदा. समजा एखाद्या कोट्यधीश अमेरिकन व्यक्तीने टेनिसन या कवीने लिहिलेला प्रत्येक ग्रंथ – पुस्तिका – लेख, यांचा ते विकत घेऊन संग्रह करण्याचा चंग बांधला. मग या ठिकाणी तंत्र वैज्ञानिक ग्रंथसूचीकारांचे अत्यंत उच्च स्थरावरचे ज्ञान आणि ग्रंथ- पुस्तिका- लेख या संबंधातील त्यांचे तंत्रवैज्ञानिक ज्ञान हे नुसतेच उपयोगी नाही, तर त्यावाचून एक पाऊलही उचलता येणार नाही. याचे कारण ग्रंथातील, पुस्तिकेतील टंक वेगळे असतात. त्यांच्या रचनेत त्या प्रकाशनाचे रूप, आणि ती संहिता या सर्वात अत्यंत सूक्ष्म असे फरक असतात. ते हा तंत्रवैज्ञानिक ग्रंथ-सूचीकार टिपतो. हे सर्व फरक हा ग्रंथ सूचीकार लक्षात घेतो मग एखाद्या पुस्तकाच्या छपाईचा इतिहास तयार होतो तो तंत्रविज्ञानाच्या मदतीने. या ठिकाणी एक मुद्दा आवर्जून लक्षात ठेवला पाहिजे, त्यासाठी पूर्वी संगणक अस्तित्वात नव्हते.

तंत्रवैज्ञानिक सूचीकाराच्या ज्ञानाचा उपयोग दुर्मिळ ग्रंथ विक्रेत्याला होतो असे म्हटले आहे. एक उदाहरण घेऊन हा मुद्दा स्पष्ट करता येईल. समजा एखाद्या अमेरिकन कोट्यधिशाच्या असे मनात आले की टेनिसन या कवीचे व त्यांच्या संबधात लिहिलेले प्रत्येक पुस्तक, प्रत्येक पुस्तिका व प्रत्येक लेख आपल्याकडे असावयासच हवा. याठिकाणी तंत्रवैज्ञानिक सूचीकाराच्या ज्ञानाचा उपयोग अटळ आहे. याचे कारण छापलेल्या मजकुराची मांडणी, छपाईसाठी वापरलेले टंक, आणि मूळ संहिता, यात जे बारीक व सूक्ष्म असे फरक असतात ते तंत्रवैज्ञानिक सूचीकाराला टिपता येतात. दुसऱ्या कोणालाही ते तितक्या सफाईने करता येणार नाही. हे सर्व बारीक-सारीक फरक लक्षात घेऊन एखाद्या साहित्यकृतीच्या वेगवेगळ्या आवृत्या नेमक्या कोठच्या साली प्रसिद्ध झाल्या याचा अनुक्रम

त्याला बसविता येतो. थोडक्यात एखादे पुस्तक किती दुर्मिळ आहे हे ठरविता येते. एवंच तंत्रवैज्ञानिक हा विशिष्ट प्रकारचे ज्ञान असलेला, एका विशिष्ट क्षेत्रातील तज्ज्ञ असतो. या व्यवसायाची अशी खासियत आहे की · वेळप्रसंगी तंत्रवैज्ञानिक सूचीकाराच्या पदरात अवचितपणे एखादे पारितोषकही येऊन पडते.

एखाद्याला हौस म्हणून हा व्यवसाय करता येईल. ते समजण्यासारखे आहे. अनेकजण असे· म्हणतील की मानवाला रिझविल असे या व्यवसायात काहीही नाही. असे ते म्हणतात याचे कारण तंत्रवैज्ञानिक शास्त्रातील (त्यांच्यामते तथाकथित) नाट्याचा पुरस्कार करणारे जे कोणी आहेत, त्यांना एखाद्या छापलेल्या पानावर वापरलेले टंक, मुखपृष्ठांची विशिष्ट मांडणी किंवा एखाद्या विशिष्ट पानावर छपाईची चूक की जिच्यामुळे ती पुस्तकाची पहिली आवृत्ती होती की दुसरी हे ठरते. यापेक्षा त्यात अधिक जिवंतपणा नसतो असे त्यांचे मत असते. परंतु विद्यमान पाश्चिमात्य जगातील अत्यंत सनसनाटी असा वाङ्‌मयीन 'घोटाळा' हा या वरवर रूक्ष दिसणाऱ्या तंत्रवैज्ञानिक सूचीकारांनी उलगडून दाखविला.

या घोटाळ्याची सुरुवात इ. स. १९३२ साली झाली. लंडन शहरात दुर्मिळ पुस्तकांच्या विक्रीचा व्यवसाय करणारे दोन तरुण नॉन कार्टर आणि ग्रॅहॅम पोलार्ड हे आपण करीत असलेल्या वेगवेगळ्या पुस्तकांच्या दुर्मिळतेसंबधीच्या संशोधनाविषयी गप्पा मारीत बसले होते. गप्पा मारीत असताना त्यांच्या एकाएकी लक्षात आले की आपण करीत असलेले संशोधन हे वेगवेगळ्या पुस्तकाबद्दल असले, तरी ते परस्पराशी निगडित आहे. म्हणूनच आपण आजवर जमविलेली माहिती एकत्र केली आणि मग संशोधनाचे क्षेत्र वाटून घेतले, तर आपणास आश्चर्यकारक निष्कर्षाची प्राप्ती होईल, हेही त्यांच्या ध्यानात आले होते. कार्टर कशाबद्दल संशोधन करीत होते हा मुद्दा या ठिकाणी प्रस्तुत नाही. प्रथम ग्रॅहॅम पोलार्ड यांच्यापासून सुरुवात करूया. केंब्रिज बिब्लिऑग्रफी ऑफ इंग्लिश लिटरेचर (इंग्लिश वाङ्‌मयाची-वाङ्‌मयसूची केंब्रिज विद्यापीठासाठी तयार केलेली) या वाङ्‌मयीन कोषाकरिता, रस्कीन या लेखकासंबधीची वाङ्‌मयीन सूची तयार करण्याचे काम ते करीत होते. कूक आणि वेड्डरबर्न यांनी. रस्किन या लेखकाच्या समग्र वाङ्‌मयासंबधी एक फार मोठी व तोवर प्रमाण समजली जाणारी सूची त्या अगोदरच प्रसिद्ध केलेली होती. या ग्रंथात रस्किन यांच्या साहित्य-सूचीसंबधी जी टिपणे देण्यात आली होती, ती पोलार्ड यांना वारंवार, तो एक संदर्भ ग्रंथ असल्याकारणाने वाचावी लागत. या टिपणात अगदी बारीक अक्षरात छापलेले काही 'दुवे' पोलार्ड यांनी नेमके टिपले. दुर्मिळ ग्रंथ विक्री व्यवसायात त्यावेळी प्रचलित असलेल्या काही 'गुढांची' उकल त्या दुव्यांच्या मदतीने होईल असा पोलार्ड यांचा होरा होता. वास्तविक हे मुद्दे जाहीरपणे प्रसिद्ध झालेल्या त्या महाग्रंथाद्वारे सर्वांनाच ठाऊक होते. परंतु पोलार्ड यांच्यापूर्वी दुसऱ्या कोणालाही त्या दुव्यांचे खरेखुरे महत्त्व किती याची जाणीव झाली नव्हती; व तसा संशयही कोणाला आला नव्हता.

कूक व वेड्डरबर्न यांच्या त्या महाग्रंथातील, निर्णायक महत्त्वाच्या व अगदी बारीक अक्षरात छापलेल्या टिपणीत रस्किन या लेखकावरील ग्रंथाच्या संपादकांनी पुढील विधान

केले होते. कोणालाही फारशा माहीत नसलेल्या रस्किन या लेखकाच्या नावावर ज्या पुस्तिका आहेत त्या सर्वच बनावट आहेत; त्या रस्किन यांच्या पुस्तिकेच्या अस्सल प्रती नाहीत असे त्यांनी अगदी ठामपणे सांगितले होते. त्यांनी हा जो आरोप केला होता त्याचे कारणही फारच साधे, सोपे व सरळ होते. प्रस्तुत पुस्तिका या पहिली आवृत्ती समजल्या जात होत्या. पण त्या पुस्तिकातील संहिता मात्र, नंतरच्या सुधारून वाढविलेल्या एका आवृत्तीतील संहितेशी तंतोतंत जुळणारी होती. रस्किन यांच्या समजल्या जाणाऱ्या पुस्तिका अस्सल असत्या तर पहिल्या आवृत्तीतील संहिता, ही मागाहून प्रसिद्ध झालेल्या संहितेशी अत्यंत मिळती-जुळती असावयास हवी होती.

आता पोलार्ड यांनी कार्टर यांना असे स्मरण दिले की याच बनावट रस्किन पुस्तिका सगळेजण अस्सल आहेत असे समजतात. म्हणून दुर्मिळ पुस्तकांच्या बाजारात लोक अव्वाच्यासव्वा पैसे मोजून त्या विकत घेतात. त्यांना आणखीही एका गोष्टीचे स्मरण झाले. इ. स. १८९० नंतर व्हिक्टोरिया राणीच्या काळातील प्रख्यात लेखकांचे नाव धारण करणाऱ्या अनेक वेगवेगळ्या पुस्तिका बाजारात आलेल्या आहेत. त्यांची संख्या पन्नासहून अधिक होती. दुर्मिळ ग्रंथाचा पुस्तिकांचा संग्रह करणारे जे लोक होते, ते या पुस्तिका विकत घेण्यासाठी शर्थीचे प्रयत्न करीत. अशी एखादी पुस्तिका दुर्मिळ ग्रंथ विक्रीच्या बाजारात आली की लोक ती विकत घेण्यासाठी त्याकाळचे शेकडो पौंड मोजावयास तयार होते. (१ पौंड – सुमारे ६५ रुपये) परंतु या व्यवहारात आणखीही एक महाविलक्षण गोष्ट होती. ती म्हणजे शेक्सपिअरच्या नाटकातील राजा क्लाडियस याच्या दुःखाप्रमाणे एका गुप्तहेराच्या रूपाने नव्हे तर गुप्तहेरांच्या अनेक तुकड्यांच्या रूपात त्या पुस्तिका बाजारात येत. दुर्मिळ पुस्तकांच्या बाजारातही ही घटना चांगलीच आगळी वेगळी होती. दुर्मिळ पुस्तकांच्या बाजारपेठेत, फारच क्वचित वेळी, चांगलीच माहीत असलेली दुर्मिळ पुस्तके, कोणतेही स्पष्टीकरण असल्याविना, जेव्हा विक्रीस येतात, त्यावेळी जो चतुर व साक्षेपी ग्रंथविक्रेता असतो, त्याच्या मनात स्वाभाविकपणे एक शंका येते. अर्थात ती शंका या क्षेत्रातील बनावटगिरीशी संबंधित नसते. त्याला असे वाटते की कोणीतरी सर्वांस अज्ञात असलेला एखादा, दुर्मिळ ग्रंथाचा संग्राहक अथवा त्या ग्रंथाचा विक्रेता कदाचित आपल्या दाराशी पठाणासारख्या उभ्या असलेल्या घेणेकऱ्यांचे त्रस्त आत्मे शांत करण्यासाठी आपण जमविलेल्या ग्रंथभांडारातील काही रत्ने बाहेर काढीत असावा.

ही माहिती कार्टर व पोलार्ड यांच्या हाती होती, त्याचवेळी नुकत्याच काही अस्पष्ट अफवा पसरल्या होत्या. त्यासंबधी ते विचार करू लागले. अर्थात या अफवांना वस्तुस्थितीचा वा एखाद्या घटिताचा आधार आहे असे कधीही दिसले नाही. परंतु ह्या मागणी असलेल्या व्हिक्टोरियन पुस्तिका, व्हिक्टोरियन शब्दप्रयोग वापरून सांगावयाचे झाल्यास – No better than they should be – त्या पुस्तिका असावयास पाहिजेत त्यापेक्षा अधिक चांगल्या परिस्थितीत नव्हत्या.

काही प्रख्यात व नेकीच्या दुर्मिळ ग्रंथ विक्रेत्यांना या पुस्तिकांबद्दल एवढा संशय होता

की, त्या घेण्यासही त्यांनी नाकारले होते. हेही सगळ्यांना माहीत होते. या पुस्तिकांचा एक सबंध गठ्ठा ठराविक कालावधीनंतर विक्रीस का उपलब्ध होत असे हे गूढही कोणाला उकलले नव्हते. या सर्व भानामतीसंबधी जे ज्ञान व माहिती उपलब्ध होती, ती अजिबात समाधानकारक नव्हती. असे होते म्हणून या दोन तरुण संशोधकांनी त्यांच्याजवळ असलेली गतकाळात विक्री झालेल्या दुर्मिळ ग्रंथांची – पुस्तकांची सूची पुन्हा एकदा बारकाईने तपासण्यास सुरुवात केली. या एकंदर पुस्तिका किती होत्या व त्यांच्या प्रती प्रत्यक्षात कोणाला विकल्या गेल्या होत्या याचा त्यांनी शक्य होते तेवढ्या प्रमाणात छडा लावण्याचा प्रयत्न केला. या त्यांच्या संशोधनातून अनेक लक्षणीय व महत्त्वाच्या गोष्टी बाहेर आल्या.

आपण ज्या पुस्तिकासंबधी शोध घेत आहोत त्यांची दुर्मिळता बहुतांशाने एका गोष्टीत होती. ती म्हणजे या सर्वच पुस्तिका अगदी छोट्या आकारात काढलेल्या होत्या. या आकारातल्याच प्रती दुर्मिळ प्रती म्हणून उपलब्ध होत्या. लेखक मग तो टेनिसन, स्विनबर्न, रस्किन अगर किपलींग असेल– आपल्या मित्रांना या पुस्तक प्रकाशनाआधी भेट देण्यासाठी म्हणून अशा आकारातील प्रतीची आवृत्ती काढीत असत. काही वेळा कॉपीराईटचे हक्क सुरक्षित राहावेत यासाठीही आवृत्ती काढीत असत. ही प्रथा त्याकाळी सर्रास होती. अजूनही काही प्रमाणात ही प्रथा पाश्चिमात्य देशात चालूच आहे. परंतु कार्टर व पोलार्ड यांच्या असे लक्षात आले की या त्यावेळी ज्ञात असलेल्या पन्नासाहून अधिक संख्येच्या ज्या पुस्तिका होत्या त्यातील एकावरही लेखकाची स्वाक्षरी नव्हती. हा मुद्दा त्या दोन्हीही संशोधकांना महत्त्वाचा मुद्दा वाटला. याचे कारण म्हणजे अशा आकारातील आवृत्ती ही लेखकाच्या मित्रांना भेट देण्यासाठी काढण्यात येत असे, म्हणूनच त्याच्यावर लेखकाची स्वाक्षरी असणे हेही क्रमप्राप्तच होते. दुसरे या सर्व पुस्तिकांच्या ज्या प्रती उपलब्ध होत्या त्या सर्व 'छापखान्यातून नुकत्याच बाहेर' काढल्यासारख्या स्थितीत होत्या. या पुस्तिकांवर त्यांच्या मालकाचे नाव नव्हते, त्याची स्वाक्षरी नव्हती किंवा ती पुस्तिका कोणीतरी कधीतरी हाताळली आहे याची एकही खूण नव्हती. हा आणखी एक महत्त्वाचा मुद्दा होता.

या तथाकथित दुर्मिळ पुस्तिकांपैकी एकाही पुस्तिकेची एकही प्रत इ. स. १८९० च्या अगोदर बाजारात विक्रीस आलेली नव्हती. तसेच या पुस्तिकांविषयी त्या काळात ज्ञात असलेल्या वाङ्मयीन साहित्यात एकही उल्लेख नव्हता. लेखकांच्या पत्रात, त्यांच्या रोजनिशयांत अथवा त्यांनी मागे ठेवलेल्या कागदपत्रात, या पुस्तिकांचा उल्लेख नव्हता. इ. स. १८९० सालाअगोदर या ग्रंथकारांच्या समग्र वाङ्मयाची सूची ही प्रसिद्ध पुस्तिकेतली जुन्यातली जुनी पुस्तिका इ. स. १८४० साली छापली गेली होती असे सांगण्यात येत होते. तसेच या पुस्तिकांची मालकी इ. स. १८९० च्या अगोदर कोणाकडे होती याबद्दल काहीही माहिती कोणासही नव्हती. सर्वात कडी म्हणजे, या पुस्तिकांच्या मालकी संबधीचा जो पुरावा होता तो एकाच ठिकाणाहून प्रसृत करण्यात येत होता. याबद्दल अधिक माहिती पुढे येईलच. थोडक्यात सांगावयाचे झाल्यास कार्टर व पोलार्ड या दोघांनाही मोठ्या चमत्कारिक परिस्थितीला सामोरे जावयाचे होते. एकतर या पुस्तिकांवर छपाईची तारीख पन्नास व काही

वेळा त्याहूनही आधीच्या वर्षाची होती. परंतु या पुस्तिका इ. स. १८८० च्या अगोदर प्रत्यक्षात अस्तित्वात होत्या का? याबाबत काहीही पुरावा उपलब्ध नव्हता. या ठिकाणी या पुस्तिकांतील मजकुरासंबधी कोणी प्रश्न उपस्थित करील. पण हा प्रश्न चुकीचा आहे, याचे कारण पुस्तिकांतील मजकूर हा त्या लेखकांनी लिहिलेल्या पुस्तकातून घेतलेला होता.

प्रथम वाटले होते त्यापेक्षा हा मामला अधिक गंभीर होता. या पुस्तिका तितक्या दुर्मिळ व अस्सल आहेत असे भासविले जात होते. तशा त्या नसतील, तर त्याचा अर्थ एकच होता. अनेक महत्त्वाच्या ग्रंथ संग्राहकांच्या गटाला चक्क ठकविण्यात आले होते. परंतु वाङ्मयीन इतिहास आणि चरित्र लेखन, या दोन्ही दृष्टिकोनातून विचार करता जे काही घडले होते, ते कितीतरी अधिक अस्वस्थता निर्माण करणारे होते. याचे कारण या पुस्तिका एकदा बाजारात आल्यानंतर त्या प्रमाणित ग्रंथसूचीत समाविष्ट करण्यात आल्या होत्या आणि म्हणूनच चरित्र लेखकांनी त्याची योग्य ती दखलही घेतली होती. या पुस्तिका ज्या ज्या लेखकांच्या नावाने प्रसिद्ध झाल्या होत्या, त्या त्या लेखकांचा जो वाङ्मयीन इतिहास होता त्यात समाविष्ट करण्यात आल्या होत्या. या पुस्तिका समाविष्ट करताना जवळ जवळ कोणीही कसलेही प्रश्न उपस्थित केले नव्हते वा कसल्याही प्रकारची शंका प्रकट केली नव्हती.

या पन्नासाहून अधिक पुस्तिकांतल्या एका पुस्तिकेचे नाव होते,'सॉनेटस् बाय, ई. बी. बी.' ही पुस्तिका कोणी आपल्या खाजगी ग्रंथ संग्रहाकरिता हस्तगत केली, तर फारच मोठे घबाड आपण हस्तगत केले आहे असे अनेक ग्रंथ संग्राहकांना वाटत असे. कालांतराने (?) या पुस्तिकेत जी सुनीते होती ती मिसेस ब्राउनिंग यांची 'सॉनेटस फ्रॉम दी पोर्तुगीज' या नावाने ज्ञात असलेली सुनीते या पुस्तिकारूपी काव्यसंग्रहात होती. पुस्तिकेच्या मुखपृष्ठावर जाहीर करून अशी खात्री देण्यात आली होती की, ही पुस्तिका रिडिंग येथे इ. स. १८४७ साली छापलेली आहे आणि ती फक्त खाजगी वितरणासाठीच होती. दुर्मिळ ग्रंथाच्या खुल्या बाजारात या पुस्तिकेच्या एका प्रतीची किंमत ही त्याकाळचे वाराशेपन्नास पौंड होती. या पुस्तिकेची ही प्रचंड किंमत ऐकून त्या धंद्यातल्या लोकांनीही आपल्या भुवया उंचावल्या होत्या. या पुस्तिकेच्या अस्सलपणाबाबत काहीतरी गडबड आहे, अशा प्रकारचा अंधुकसा विचार, त्या क्षेत्रातील अनेक तज्ज्ञांच्या मनात डोकावून गेला होता.

पण आपल्याला आलेला संशय रास्त आहे हे सिद्ध करण्यासाठी त्यांना पुरावा सापडत नव्हता. जॉन कार्टर हे पहिले संशोधक, की ज्यांनी या पुस्तिकेची अगदी कसोशीने तपासणी केली. आपल्या प्राथमिक तपासणीतून कार्टर यांना जे काही माहीत झाले, ते त्यांनी पोलार्ड यांना सांगितले. कार्टर यांनी पोलार्ड यांना जे काही सांगितले ते पोलार्ड यांनी रस्किन पुस्तिकासंबधी जे काही सांगितले, तितकेच उद्बोधक आणि माहितीपूर्ण होते.

'रिडिंग १८४७' या सुनीताच्या पुस्तिकेकडे इतक्या गौरवाने पाहिले जात होते, याचे कारण ती पुस्तिका एका रोमांचकारी प्रेमकहाणीचा एक भाग होता. त्या गौरवामागचे ते एकमेव कारण नसेल, पण थोड्याबहुत प्रमाणात का होईना ते एक कारण होतेच. तत्कालीन प्रख्यात साहित्य – समीक्षक एडमंड गोस्स यांनी त्या सुनीताबद्दल प्रथम इ. स. १८९४

साली लिहिले होते. एडमंड गोस्स (Edmund Gosse) हे त्या काळातले अत्यंत लोकप्रिय आणि ज्यांची साहित्य– समीक्षा सर्वत्र वाचली जाई असे समीक्षक, त्यांनी इ. स. १८९४ साली एक लेख प्रसिद्ध केला. त्यात त्यांनी जी कथा सांगितली ती वाचल्यानंतर कवी ब्राउनिंग यांच्या चाहत्यांनी, ती आपल्या हृदयाशी धरली. एडमंड गोस्स यांनी सांगितलेली कथा थोडक्यात अशी आहे, कवी ब्राउनिंग सकाळची न्याहरी करीत असताना मिसेस ब्राउनिंग लग्न झाल्यानंतरच्या पहिल्या वर्षाच्या काळात, अगदी लाजत आपल्या नवऱ्याजवळ येऊन बसत आणि नवऱ्याच्या खिशात हस्तलिखिताचे काही कागद कोंबित असत. हे केल्यानंतर त्या लगेच आपल्या खोलीकडे धाव घेत. ही हस्तलिखिते त्यांच्या सुनीतांची होती. कवी ब्राउनिंग यांनी ती वाचल्यानंतर नाटककार विल्यम शेक्सपिअर नंतर इतकी सुंदर सुनीते कोणीही लिहिलेली नाहीत असे जाहीर केले. एडमंड गोस्स यांनी आपल्या लेखात असेही सांगितले की, ही सुनीते प्रकाशित झालीच पाहिजेत असा आग्रह कवी ब्राउनिंग यांनी धरला.

मिसेस ब्राउनिंग याना ती सुनीते प्रसिद्ध करण्याची अनिच्छा होती. याचे कारण लग्न होण्याअगोदरच्या काळात केलेली टिपणे व दिनक्रम एवढेच त्या सुनीतात होते. जगाला सहभागी करण्याच्या दृष्टीने ही सुनीते अतिशय खाजगी व फारच पवित्र असल्याकारणााने ती प्रसिद्ध करण्यास मिसेस ब्राउनिंग राजी नव्हत्या. परंतु कवी ब्राउनिंग यांच्या मनात जे होते, तेच विजयी ठरले. सरतेशेवटी त्यांची पत्नी मिसेस ब्राउनिंग यांनी हे हस्तलिखित, आपली मैत्रीण मेरी रसेल हिच्याकडे पाठविले. या मैत्रिणीने रिडिंग या शहरातील एका छोट्या छापखान्यात त्या हस्तलिखिताच्या थोड्या प्रती छापून घेतल्या. मग त्या कवी ब्राउनिंग आणि मिसेस ब्राउनिंग यांनी आपल्या निकटच्या मित्र-मैत्रिणीत त्याचे वितरण व्हावे या हेतूने इंग्लडला पाठवून दिल्या. त्याच या बाजारात आलेल्या छापखान्यातून नुकत्याच बाहेर आल्या आहेत अशा स्थितीतल्या पुस्तिका. या पुस्तिकांना गेल्या सत्तर वर्षात कोणीही स्पर्श केलेला नाही अशा अवस्थेत त्या बाजारात आल्या होत्या. इ. स. १९२० साली दुर्मिळ ग्रंथ बाजारपेठेत त्यांची किंमत बाराशे पन्नास पौंड होती.

खरे म्हणजे या अशा प्रकारच्या दुर्मिळ पुस्तिकेला त्या काळच्या इंग्लडमध्ये बाराशे पन्नास पौंड ही फारच अतिशयोक्त किंमत होती असे नाही. याचे कारण कवी ब्राउनिंग यांचा चाहता असलेल्या ग्रंथसंग्राहकाच्या दृष्टिकोनातून पाहाता, कवी ब्राउनिंग यांच्या आयुष्यातील अत्यंत जवळिकेच्या क्षणाला स्पर्श करण्याच्या प्रसंगाशी ती पुस्तिका संबंधित होती. परंतु या युक्तिवादात एक गोम आहे. ती म्हणजे, या पुस्तिकेचा उदय कसा झाला हा इतिहास प्रत्यक्ष घडला असला तरच ही पुस्तिका खरेदी करताना ब्राउनिंग यांच्या चाहत्यांनी दाखविलेली कळकळ व खर्च केलेले द्रव्य वाजवी ठरले असते, एरवी नाही. परंतु एडमंड गोस्स यांनी आपल्या वाचकाना पेश केलेल्या अहवालात दोन गफलती होत्या; आणि त्या फारच त्रासदायक होत्या. एक, एडमंड गोस्स यांनी असे सांगितले होते की, न्याहरी घेतानाची ही घटना, इटालीतील पिसा या गावी इ. स. १८४७ च्या सुमारास घडली. कवी ब्राउनिंग आणि

एलिझाबेथ ब्राउनिंग यांनी लंडनहून पलायन केल्यानंतर सुमारे सहा महिन्यानंतर.

परंतु या विधानाला छेद देणारा भरभक्कम पुरावा अस्तित्वात होता. एकतर हा पुरावा खुद्द कवी ब्राउनिंग यांच्या लिखाणातच उपलब्ध होता. कवी ब्राउनिंग यांच्याकडून ही घटना ज्यांनी ऐकली होती. त्यांच्या साहित्यातूनही या घटनेबाबत काही थोडा बहुत पुरावा उपलब्ध होता. या सर्व पुराव्यानुसार ही घटना इटालीतील पिसा या गावी घडलेली नसून ती Bagi di Lucca बागी डी. लुच्चा या गावी घडली होती. दोन, या घटनेचा काल इ. स. १८४७ अजिबात नव्हता. तो इ. स. १८४९ होता. थोडक्यात सांगावयाचे झाल्यास तथाकथित रिडिंग येथे छापून प्रसिद्ध झालेल्या, त्या सुनीतांच्या खाजगी आवृतीच्या प्रसिद्धीनंतर तब्बल दोन वर्षांनी !!

या ठिकाणी एक गोष्ट नमूद करणे महत्त्वाचे आहे. ते एवढ्याचसाठी की ब्राउनिंग यांचे कोणी चाहते असल्यास, ते वरील परिच्छेदातील मजकूर वाचून कदाचित अस्वस्थ होतील. ते काहीही असो, एडमंड गोस्स यांनी वर्णिलेला न्याहरीच्या वेळचा प्रसंग खरोखरच घडला होता, या ठिकाणी त्यांच्या वृत्तांतासंबधी विचार प्रस्तुत नाही. इतरही पुराव्याचा विचार केलेला आहे. येथे जाता जाता एक मुद्दा नमूद केला पाहिजे. एकतर न्याहरीच्या वेळी घडलेली घटना ही खरेच घडली होती. परंतु ही घटना नेमकी कोठच्या गावी, आणि कोठच्या तारखेला (वर्ष नक्की आहे) घडली याबद्दल एकवाक्यता नव्हती. गोस्स यांच्या मते– त्यासाठी ते कवी ब्राउनिंग यांचीच साक्ष काढतात – साल इ. स. १८४७ च होते. दुसरे अनेक जण यात खुद्द कवी ब्राउनिंग आणि त्यांचे मित्र यांचा समावेश आहे– त्यांच्या मते वर्ष इ. स. १८४९ हे नक्की आहे. त्यातले खरे कोणाला मानायचे, कवी ब्राउनिंग की गोस्स? ब्राउनिंग यांनी सांगितलेले इ. स. १८४९ हे साल बरोबर मानले, तर इ. स. १८४७ साली प्रसिद्ध झालेल्या पुस्तिकेचे समर्थन कसे करता येईल?

आता कार्टर आणि पोलार्ड यांच्यापुढे एकच उघड व स्पष्ट असा मार्ग होता. ही पुस्तिका प्रथम बाजारात कोठच्या परिस्थितीत आली याचा शोध घ्यायचा. हे शोधून काढणे तितकेसे कठीण नव्हते. विसाव्या शतकाच्या सुरुवातीच्या काळात ग्रंथसूचीकार आणि ग्रंथसंग्राहक या दोन्ही क्षेत्रात मि. थॉमस जे वाईज हे सम्राट समजले जात. हे त्यांचे स्थान वादातीत होते. वाईज यांनी Bibliography of the writings in prose and verse of Elizabeth Barret Browing (एलिझाबेथ बॅरट ब्राउनिंग यांच्या समग्र गद्य व पद्य वाङ्मयाची सूची) इ. स. १९१८ सालातील ग्रंथात मि. वाईज यांनी या पुस्तिकेचा त्रोटक उल्लेख केला होता. परंतु A Brownig library (ब्राउनिंग ग्रंथसंग्रह) या इ. स. १९२० च्या ग्रंथात यांनी सांगितलेली कथा आणि त्यानंतर रिडिंग येथे त्या सुनीतांच्या झालेल्या छपाईबद्दल गोस्स यांनी दिलेली माहिती, या दोन्ही गोष्टींचा वाईज यांनी पुनरुच्चार केलेला आहे.

त्यानंतर मिस मिटफोर्ड (Mitford) या बाईंनी आपले स्नेही डॉ. डब्ल्यू. सी. बेन्नेट यांना या पुस्तिकेच्या काही प्रती दिल्या असेही त्यांनी नमूद केले होते. मि. वाईज यांना आणखी असेही आठवले की इ. स. १८८५ च्या आसपास त्यांच्याशी डॉ. बेन्नेट यांची ओळख झाली.

त्यांनी मि. वाईज यांना एक प्रत २५ पौंडाला विकली आणि त्यानंतर काही दिवसांनी या पुस्तिकेच्या राहिलेल्या प्रतींपैकी १०-१२ प्रतीही विकल्या. इतके करूनही डॉ. बेंत्रेट यांच्या मते ज्या प्रती शिल्लक होत्या, त्या त्यांनी ब्राउनिंग प्रेमी लोकांना विकून टाकल्या होत्या. या अशा रीतीने ती पुस्तिका व तिच्या प्रती दुर्मिळ ग्रंथबाजारात आल्या होत्या.

सकृतदर्शनी पाहाता आणि साकल्याने विचार करता गोस्स – वाईज कथा ही तशी विश्वसनीय कथा वाटत होती. अर्थात या कथेच्या विश्वसनीयतेला, मि. वाईज यांची जी प्रचंड प्रतिष्ठा होती तिच्यामुळे फारच जोरदार पाठिंबा प्राप्त झाला होता. परंतु कार्टर आणि पोलार्ड या संशोधकांचे यातल्या कोठल्याही युक्तिवादाने, समाधान झाले नव्हते. सुरुवातीचा भाग घेऊया. मि. वाईज यांनी गोस्स यांची साक्ष काढली होती. परंतु या साक्षीसाठी ज्या एका ठिकाणाहून गोस्स यांनी माहिती मिळविली होती त्या ठिकाणाचा उल्लेखच त्या साक्षीत नव्हता. ते तसे अनिश्चितच राहिले होते.

गोस्स यांनी जी माहिती दिली होती, त्याचे दोन भाग होतात. एक पहिला भाग त्या दिवशीच्या न्याहरीच्या समयी जे काही घडले, त्या संबधातला. त्या घटनेची तारीख, ती घटना घडली ती जागा, गावाचे नाव इत्यादी हे कवी ब्राउनिंग यांचा दारी गोस्स नेऊन ठेवीत होते हे एकवेळ ठीक आहे. त्यातही किरकोळ त्रुटी आहेत. परंतु ही पुस्तिका रिडिंग या ठिकाणी छापली गेली. यासंबंधीच्या पुराव्याबाबात गोस्स असे सांगतात की तो पुरावा त्यांना एका मित्राकडून मिळाला होता. पण त्याचे नाव मात्र ते सांगत नव्हते. आजवर या मित्राचा ठावठिकाणा शोधून काढणेही संशोधकाला जमलेले नाही. लक्षणीय मुद्दा असा आहे की, हे असे अनामिक मित्र साहित्यजगतात अवतरले की मग कमालीच्या सद्सदविवेकबुद्धीला साक्ष ठेवून संशोधन करणाऱ्या जाणकार संशोधकांना नेहमीच त्रस्त करतात. या अशा संशोधकांना साहित्यजगतातील कोणत्याही घटनेसाठी पुरावा हवा असतो. त्याचे असे आहे गोस्स – वाईज यांनी सांगितलेली कथा – सत्यकथा नव्हे – ही तात्पुरती स्वीकारार्ह असे मानले तरी स्वतंत्र पुराव्याची आवश्यकता असतेच. स्वतंत्र पुरावा याचा अर्थ या घटनेपासून ज्या कोणा व्यक्तीला फायदा होणार असेल, त्या व्यक्तिरिक्त आणखी दुसऱ्या कोणी तरी सादर केलेला पुरावा.

या प्रस्तुत प्रकरणी असा कोणताही स्वतंत्र पुरावा उपलब्ध नव्हता. एवढ्यावरच हे थांबत नाही. या प्रकरणात जो पुरावा सादर केलेला होता, त्यानेच अधिक गंभीर स्वरूप धारण केले. या पुराव्यातून अनेक 'गैरसोईचे' आणि ज्यांची उत्तरे जोवर मिळालेली नव्हती असे प्रश्न उपस्थित होत होते. मिसेस ब्राउनिंग यांना इटालीत ती पुस्तिका छापून घेणे सहज शक्य होते. पण तसे न करता त्यांनी आपल्या सुनीतांचे हस्तलिखित इंग्लंडला पाठविण्याचा द्राविडीप्राणायाम का केला? मिस मिटफोर्ड यांची अनेक पत्रे पूर्वीच प्रसिद्ध झाली होती. त्यातल्या एकाही पत्रात, या पुस्तिकेच्या छपाईत त्यांचा जो वाटा त्याबद्दल त्या कधीही का लिहीत नाहीत?

मिस मिटफोर्ड यांनी छापून घेतलेल्या त्या पुस्तिकेच्या सर्व प्रती मिसेस ब्राउनिंगकडे का

पाठविल्या नाहीत? फक्त दहा ते बारा प्रतीच आपल्याकडे का ठेवून घेतल्या? कवी ब्राउनिंग आणि त्यांच्या पत्नी मिसेस ब्राउनिंग यांनी आपल्या पत्रांतून आणि संभाषणातून या प्रकाशन-पूर्व पुस्तिकेचा उल्लेख कधीही का केला नाही? या पुस्तिकेची एकही प्रत कवी ब्राउनिंग यांच्या खाजगी ग्रंथसंग्रहात का आढळली नाही? हा संग्रह इ. स. १९१३ साली विकण्यात आला होता, त्यात या पुस्तिकेची नोंद नाही. मिसेस ब्राउनिंगनी या पुस्तिकेवर आपण ती कोणास देत आहोत इत्यादी गोष्टी सूचित करणारा मजकूर कोणीही, कधीही, एकाही प्रतीवर पाहिला नव्हता हे कसे? हे एकवेळ सोडून दिले तरी ज्या अगदी घनिष्टांना मिसेस ब्राउनिंग यानी ही प्रत पाठविली असेल, त्यांनीही त्या प्रतीवर एकही नोंद का केली नाही?

हे सर्व प्रश्न वाजवी होते. सादर केलेल्या पुराव्यांतूनच ते उपस्थित झाले होते. या पुस्तिकेचा तोवरचा जो कथित इतिहास होता. तो इ. स. १८८५ सालाशी जाऊन भिडत होता. याच सालाशी फक्त गोस्स यांनी सांगितलेली कथा हा त्याला अपवाद– तो इतिहास अगदी मुद्दामपणे आणि काहीतरी नवे हाती येईल अशी अपेक्षा करून थांबला होता. डॉ. वेत्रेट यांच्या 'ब्राउनिंग खजिन्या'चा वाईज यांनी सांगितलेली जी कथा होती, त्यानुसार त्या खजिन्यात फक्त बाराच प्रती होत्या. परंतु इ. स. १९३२ साली दुसऱ्या निदान सतरा प्रती अस्तित्वात असल्याचे ज्ञात झालेले होते. परंतु या प्रतीचा इ. स. १८९० च्या अगोदरचा इतिहास हा सर्वस्वी अज्ञात होता.

इ. स. १८९५ च्या सुमारास या पुस्तिकेच्या प्रती प्रथम ग्रंथप्रेमींच्या ग्रंथसंग्रहातून दिसू लागल्या. कवी ब्राउनिंग यांच्या चरित्रलेखकांचे, ही सुनीते मिसेस ब्राउनिंग यांच्या समग्र कवितासंग्रहाच्या बाजारात आलेल्या पुस्तकांच्या प्रतीत इ. स. १८५० साली प्रथम अवतरली याबद्दल एकमत होते.

आता कार्टर व पोलार्ड यांच्यापुढे एकच मार्ग होता, तो म्हणजे इ. स. १८४७ ची पुस्तिका ज्या ज्या काही तंत्रवैज्ञानिक स्वरूपाच्या कसोट्या आहेत, त्यांचा आधार घेऊन, तपासायच्या. असे केल्याने या पुस्तिका अस्सल आहेत किंवा नाहीत हे सिद्ध होईल. या सर्व खटाटोपात त्यांनी एक नवी ज्ञानशाखा प्रस्थापित केली. पुस्तक नेमके केव्हा, कुठे, कसे व कोठच्या साली प्रसिद्ध झाले हे शोधून काढण्याचे तंत्रवैज्ञानिक सूचीशास्त्र असे त्या नव्या ज्ञानशाखेला नाव देता येईल. विद्यमानकाली जे कोणी दुर्मिळ ग्रंथविक्रेते लोकांना फसविण्यासाठी ज्या क्लृप्ता योजतात, त्यांच्या मार्गात या नव्या ज्ञानशाखेने जवळ जवळ अनुल्लंघनीय असे अडथळे निर्माण केले आहेत.

पहिला मुद्दा या तंत्रवैज्ञानिक सूचीशास्त्रात, त्यांनी रसायनशास्त्र या ज्ञानशाखेचा अगदी अभिनव असा उपयोग केला होता असे आढळून येते. एकोणिसाव्या शतकात प्रकाशित झालेल्या पुस्तिकांनी संशोधकांचे लक्ष आपणाकडे वेधून घेण्याअगोदरच, इंग्लंड आणि पाश्चिमात्य देशात एखाद्या ऐतिहासिक कागदपत्राचा वा दस्तऐवजाचा काळ साधारणपण नक्की करण्यासाठी तो संशयित दस्तऐवज वा कागदपत्र लिहिण्यासाठी वापरलेल्या शाईची

रासायनिक तपासणी करण्याची पद्धत रूढ झालेली होती. परंतु कार्टर आणि पोलार्ड यांचे वेगळेपण दुसऱ्याच एका गोष्टीत आहे. त्यांनी पुस्तिकेचा प्रकाशन काळ ठरविण्यासाठी त्या पुस्तिकेत वापरण्यात आलेल्या शाईची रासायनिक तपासणी केली नाही. त्यांनी रिडिंग या गावी छापलेल्या (रिडिंग १८४७) या पुस्तिकेत वापरलेल्या कागदाची रासायनिक तपासणी केली. या शास्त्रातील तंत्रवैज्ञानिक ज्ञानश्रेष्ठांच्या मदतीने त्यांना असे आढळून आले की त्या रिडिंग १८४७ या पुस्तिकेत वापरण्यात आलेला कागद, रासायनिक लाकूड, लगद्यापासून बनविलेला होता. कागद निर्मितीच्या उद्योगात या घटकाला इ. स. १८८५ च्या सुमारास प्रवेश मिळाला. याचे कारण कागद शुभ्र सफेद करण्याची रासायनिक प्रक्रिया यशस्वी होऊन, ती त्या सुमारास चांगलीच विकसित झाली होती. तथापि मिसेस ब्राउनिंग लिखित 'रिडिंग १८४७' या पुस्तिकेत हाच कागद वापरण्यात आला होता. त्या पुस्तिकेचा प्रकाशन काळ इ. स. १८८५ नंतरचा नसून तो इ. स. १८४७ हा आहे असे सांगण्यात आले होते !

आणखी एका वेगळ्याच क्षेत्रातील निकष या गुप्तपोलिसी थाटाच्या संशोधनात वापरण्यात आले. या रिडिंग १८४७ या पुस्तिकेत ज्या पद्धतीचे टंक वापरण्यात आले होते त्यासंबंधी अगदी खोलात जाऊन, सर्व तपशील जमेला धरून हा तपास करण्यात आला. 'रिडिंग १८४७' या पुस्तिकेत वापरलेल्या टंकाचे वैशिष्ट्य होते– त्या टंकांला कर्नलेस फॉंट (Kernless Font) म्हणत (या शब्दाचे मराठी भाषांतर सोडूनच घ्या, पण गोळाबेरजेनेही अर्थ सांगता येणार नाही) कर्नलेस फॉंट हा टंकाचा एक विशिष्ट प्रकारच होता असे समजा. या टंकात मुळाक्षरातले कोठचेही अक्षर या टंकाची जी आखलेली चौकट होती, त्याबाहेर जात नसे उदा. रोमन लिपीतली F (एफ) आणि J (जे) हे टंक. त्याच कर्नलेस टंकात छापलेली ती मिसेस ब्राउनिंग यांची रिडिंग १८४७ ही पुस्तिका होती.

परंतु महत्त्वाचा मुद्दा हा आहे की, हे कर्नलेस छापायचे जे टंक होते ते मुळातच इंग्लंड आणि पाश्चिमात्य देशात इ. स. १८८० पासून उपयोगात आले. चांगला तेहतीस वर्षांचा फरक. आणखीही अनेक वैशिष्ट्यांची या दोन गुप्त पोलिसांनी दखल घेतली. सर्वसामान्य वाचकाला याची कल्पनाही करता येणार नाही. प्रश्नचिन्हांसाठी जो टंक वापरण्यात येतो, त्यातील फरक ! या पुस्तिकेत जी प्रश्नचिन्हे वापरण्यात आली होती, ती इ. स. १८४७ नंतरच्या काळातली वापरण्यात आली होती; त्या प्रश्नचिन्हांपेक्षा अधिक शेलाटी होती. त्याचवरोबर, ह्या प्रश्नचिन्हाखाली, जो ठिपका छापण्यात येत असे, तो मध्यापेक्षा जरा बाजूलाच काढलेला असे.

ही तथाकथित इ. स. १८४७ ची पुस्तिका इ. स. १८८० च्या अगोदर छापली जाणेच शक्य नव्हते हे अशा प्रकारे सिद्ध झाले होते. अगदी संशयातीतपणे सिद्ध झाले होते. या पुस्तिकेसाठी वापरण्यात आलेला कागद आणि त्यात वापरण्यात आलेले टंक हा अगदी बिनतोड पुरावा होता. थोडक्यात कार्टर आणि पोलार्ड हे आपल्या गुप्तपोलिसी थाटाच्या संशोधनाच्या पहिल्या फेरीत चांगलेच यशस्वी झाले होते. परंतु आता यापुढे त्यांच्यासमोर फारच मोठे आव्हान देणारा प्रश्न खडा होता. 'रिडिंग १९४७' ही पुस्तिका बनावट होती हे

निश्चितपणे सिद्ध झाले हे खरे. परंतु ती कोणी छापली? ती कोणी छापली याचा उल्लेख या पुस्तिकेत नव्हता. या दोघांना या संशोधनाबाबत नशिबाने पुन्हा एकदा हात दिला. त्यांनी त्यासाठी नशिबाला दुवाच दिला असणार. याचे कारण एकोणिसाव्या शतकात इंग्लंडमधील टाईप – फाऊंड्रीची संख्या फारच मर्यादित होती. त्यांना शक्य होते तेवढे एकोणिसाव्या शतकात तयार होणारे टंक जमविले, आणि त्यातले कर्नलेस ढंगाचे J आणि F या अक्षरांचे टंक होते त्यांची कसून तपासणी केली. त्यावर त्या दोघांना असे आढळून आले की, इ. स. १८९५ च्या अगोदर संख्येने चाळीसच्या आसपास या कर्नलेस ढंगांच्या टंकाची निर्मिती झाली होती. कार्टर आणि पोलार्ड यांनी या सर्व टंक उत्पादकांपैकी प्रत्येकाचा तपास लावण्याचे ठरविले; आणि त्या कामाला ते लागले. हे टंक त्या उत्पादकांनी ते कोणत्या छापखान्याला विकले होते, हा त्या तपासाचा भाग होता. आता सर्वच छापखान्यांच्या मालकांबद्दल संशय होता. म्हणूनच त्यांनी या छापखान्यांच्या मालकांची फारच काटेकोरपणे छाननी करण्यास सुरुवात केली.

परंतु या प्रकरणातील गुंतागुंत एकसारखी वाढतच होती. या सत्तावीस टंकांपैकी एकाही टंकात, तो प्रश्नचिन्हाचा विक्षिप्त टंक नव्हता. या सर्वांवरून एकच निष्कर्ष निघत होता, ही बनावट पुस्तिका ज्या कोणी छापली होती, त्यांनी दोन ठिकाणी तयार झालेले टंक वापरले होते. या वापरलेल्या टंकातला काही भाग एका फाऊंड्रीतून आला होता, दुसरा आणखी एका वेगळ्या ठिकाणाहून. मग हे असे दोन ठिकाणचे टंक वापरणाऱ्या छापखान्याच्या मालकाचा शोध कसा लावायचा? या शोधात लहान–मोठे सर्वच छापखाने आणि त्यांचे मालक या सर्वांचा तपास करावयाचा होता. हे काम, जवळ जवळ अशक्य होते. हताश होऊन, कार्टर आणि पोलार्ड यांनी अगदी अनिच्छेने असा निष्कर्ष काढला की, या प्रकारचा सर्वसमावेशक शोध हा अगदी स्पष्टपणे आपल्या ताकदीबाहेरचा आहे. आणि याच ठिकाणी या गुप्त पोलिसी थाटाच्या संशोधनाने कायमची विश्रांती घेतली आहे, असे त्याक्षणी तरी भासत होते.

नशिबाने पुन्हा एकदा हात दिला. गुप्तपोलिसी ढंगाचे संशोधन करणारे तंत्र वैज्ञानिक ग्रंथ सूचीकार जेव्हा निष्ठेने आणि चांगल्या प्रकारे काम करतात, तेव्हा नशीब त्यांना असा हात सर्वसामान्यपणे नेहमीच देते. कार्टर आणि पोलार्ड हे आपल्या संशोधनाचा एक भाग म्हणून, मॅथ्यू अर्नाल्ड या इंग्रज कवी आणि साहित्य समीक्षकाच्या रग्बी पारितोषिक प्राप्त झालेल्या कवितेची अलारीक ॲट रोम (अलारीक रोमच्या दारात) – मूळ टंक प्रत तपाशीत होते. थॉमस जे वाईज यांचा परिचय याअगोदर करून देण्यात आलेला आहे. त्यांनी इ. स. १८९३ साली ग्रंथ संग्राहकांच्या खाजगी ग्रंथसंग्रहासाठी या कवितेची एक आवृत्ती लंडन येथे छापून घेतली होती. कार्टर व पोलार्ड यांना असे आढळून आले की बनावट 'रिडिंग १८४७' च्या पुस्तिकेत जे कर्नलेस टंक, विक्षिप्त प्रश्नचिन्हे, आणि इतरही ज्या अनेक गोष्टी होत्या त्या जशाच्या तशा या मॅथ्यू अर्नाल्ड रचित अलारीक ॲट रोम – या काव्यांच्या मूळ टंक प्रतीत होत्या. मॅथ्यू अर्नाल्ड रचित या काव्य-पुस्तिकेच्या अखेरीस ती

पुस्तिका कोठे छापली गेली होती याचा उल्लेख होता. तो वाचून या 'गुप्तपोलिसांना' किती आनंद झाला असेल याची फक्त कल्पनाच आपणास करता येईल. हा जो छापखान्याचा उल्लेख होता, तो 'रिचर्ड क्ले अ‍ॅन्ड सन्स' या छापखान्याचा. त्या काळातला अत्यंत आदरणीय, विश्वसनीय, आणि मशहूर असा लंडन शहरातील हा छापखाना.

या शोधाने या दोन्ही गुप्त पोलिसांना नवे स्फुरण आले. 'रिडिंग १८४७' च्या संशोधनासाठी तोवर ते जो पाठलाग करीत होते, तो त्यांनी पुन्हा एकदा नव्याने करण्यास सुरुवात केली. कार्टर आणि पोलार्ड यांनी लंडनमधील त्या छापखान्यात विचारणा केली. या दोघांनी असे विचारले होते की हे असे संमिश्र टंक वापरण्यास केव्हापासून सुरुवात झाली. या प्रश्नाचे उत्तर देताना त्या छापखान्याच्या मालकाने असे सांगितले की इ. स. १८८० नंतर हे असे संमिश्र टंक आपल्या छापखान्यात वापरात आले. त्याचबरोबर त्यांनी असे कळविले की, इ. स. १९११ च्या अगोदरचे जे कागदपत्र होते, ते संपूर्णपणे नष्ट करण्यात आलेले आहेत. म्हणूनच त्यांनी 'रिडिंग १८४७' ही पुस्तिका छापून घेण्यास जे कोणी वा जो कोणी जबाबदार होता त्याबद्दल काहीही माहिती देण्यास आपण असमर्थ आहोत; अशी कबुली दिली होती.

आपण त्या पुस्तिकेच्या निर्मिती संबंधाबाबतच्या घटनांचा विचार करता, या दोन गुप्त पोलिसांच्या तपासाने, या ठिकाणी खरे म्हणजे विराम घ्यावयास हवा. कार्टर आणि पोलार्ड या दोघांनी असे संशयातीतपणे सिद्ध करून दाखविले होते की, 'रिडिंग १८४७' म्हणजे एलिझाबेथ बॅरट ब्राउनिंग यांनी लिहिलेली सुनीते, ही जी रिडिंग येथे १८४७ साली छापून प्रसिद्ध झाली असा जो समज होता तो साफ चुकीचा होता. ती वस्तुत: लंडन येथील रिचर्ड क्ले अ‍ॅन्ड सन्स यांनी इ. स. १८८५ ते इ. स. १८९५ च्या दरम्यान केव्हातरी छापून प्रसिद्ध केली होती.

कार्टर व पोलार्ड यांच्या या संशोधन प्रक्रियेत त्यांनी ग्रंथसूचीबाबत आश्चर्यकारक अनेक बदमाशी कृत्यांच्या मालिकेचा शोध लावला होता. वरील परिच्छेदात उल्लेखिलेला असंबद्धता ही त्याची केवळ एक झलक होती. या सर्वच संशोधन प्रक्रियेतील गुंतागुंतीत न शिरता आपण आपले लक्ष उपरोक्त पुस्तिकेवरच केंद्रित करूया. या लेखाच्या सुरुवातीच्या भागात पन्नासाहून अधिक दुर्मिळ पुस्तिकांचा उल्लेख येऊन गेला आहे. त्यातील अत्यंत गाजलेली आणि सर्वांनाच अत्यंत हवी हवीशी वाटणारी 'रिडिंग १८४७' ही पुस्तिका घेऊन या दोघांनी या प्रकरणी संशोधनास सुरुवात केली. तेव्हाच त्यांच्या असे लक्षात आले होते की, त्यांना 'रिडिंग १८४७' या पुस्तिकेबाबत जे जे काही सापडेल ते ते इतर पुस्तिकांबाबतही उपयोगी पडेल. विशेषत: या पुस्तिकेबरोबर ज्या दुसऱ्या अनेक पुस्तिका बाजारात आल्या होत्या, त्या सर्वांवरच 'रिडिंग १८४७' या पुस्तिकेबाबत त्यांनी केलेल्या संशोधनाचा परिणाम होणार होता. ज्या आजवर दुर्मिळ समजल्या जात होत्या, आता यापुढे त्या 'बनावट' ठरणार होत्या.

म्हणून ज्यांच्याबद्दल संशय होता त्यातील प्रत्येक पुस्तिकेची त्यांनी तपशीलात जाऊन

तपासणी केली. या अगदी 'सूक्ष्मात जाऊन केलेल्या तपासणीमुळे अनेक लक्षवेधी ठरतील अशा गोष्टी उघड झाल्या. मिसेस ब्राउनिंग यांनी रचलेल्या सुनीतांच्या तथाकथित पहिल्या आवृत्तीच्या संशोधनासाठीही ते संशोधन उपयुक्त ठरले. त्यांनी या संशोधनासाठी अपार कष्ट घेतले होते ते तर खरेच आहे. सुदैवाने कल्पना नव्हती एवढ्या प्रमाणात त्यांना त्यापासून फलप्राप्ती झाली. मिसेस ब्राउनिंग यांच्या सुनीतांच्या पुस्तिकेच्या गटात, किमान एकावन्न वेगवेगळ्या पुस्तिका होत्या. त्यातील सत्तावीस पुस्तिका ज्यात Esparto एसपार्टो नावाचा घटक ज्या कागदात होता, त्या कागदावर छापलेल्या होत्या. हा घटक, स्पेन आणि उत्तर आफ्रिका या दोन ठिकाणी उगविणाऱ्या खूप उंचीच्या जाड्या करड्या गवतापासून तयार केला जात असे. एसपार्टो हा घटक, कागद तयार करण्याच्या धंद्यात इ. स. १८६१ सालापासून प्रथम वापरात आला.

पण या सत्तावीस पुस्तिकांपैकी दहा पुस्तिकांवर त्यांच्या छपाईची तारीख इ. स. १८६१ च्या अगोदरची होती. त्यावरून त्या दहाही पुस्तिका दुर्मिळ नसून, तद्दन बनावट होत्या हे सिद्ध झाले. दुसऱ्याही अनेक पुस्तिकांबाबत संशय निर्माण झाला याचे कारण एसपार्टो या घटकाचा उपयोग सर्वसामान्यपणे होऊ लागला. त्या अगोदरच्या काळात त्या छापल्या गेल्या आहेत असे सांगण्यात आले होते. दुसऱ्याही आणखी तेरा पुस्तिका अशा होत्या की त्यांची छपाई ज्या कागदावर झाली होती, त्या कागदात रासायनिक लाकडाचा लगदा वापरलेला होता. परंतु हा लगदा, कागदाच्या उत्पादनात येण्यापूर्वीची तारीख, या पुस्तिकेवर छपाईची तारीख म्हणून होती !

पुस्तक छपाईत वापरलेले टंक कोणत्या प्रकारचे होते व ते नेमके केव्हा प्रचलित झाले हे परिमाण वापरून, या पुस्तिकांत वापरण्यात आलेल्या टंकाची तपासणी, कार्टर व पोलार्ड यांनी केली. या दोघांना असे आढळून आले की, सोळा पुस्तिकांत, त्यांचा काळ व वैशिष्ट्य सिद्ध करणारे कर्नलेस टंक वापरण्यात आली होती. याचा अर्थ एकच होता. तो म्हणजे या सोळाही पुस्तिका त्यांच्यावर छापण्यात आली होती. त्या तारखेच्या अगोदर किमान सातपासून अडतीस वर्षानंतरच्या सालात छापल्या गेल्या होत्या. आणखी एक गमतीदार व उद्बोधक मुद्दा – पुस्तिकेत वापरलेला कागद हा कोठच्या साली प्रथम तयार झाला या कसोटीत, या पुस्तिकांपैकी अनेक पुस्तिका अगोदरच नापास झाल्या होत्या. या सूक्ष्म तपासणीच्या चाळणीतूनही काही पुस्तिका निसटल्याच, त्यांनी फार मोठ्या नाही पण थोड्या अडचणी निर्माण केल्या.

या पुस्तिकांसाठी वापरण्यात आलेले टंक होते, ते वेगवेगळ्या प्रकारचे होते. त्यात ज्या टंकाचा उगम क्ले कंपनीशी जाऊन भिडविण्यात आला होता, त्यांच्या कर्नलेस टंकासारखे ते टंक नव्हते. याचा अर्थ एकच होता. जो कोणी या बनावट दुर्मिळ पुस्तिका तयार करून, ग्राहकाला फसवीत होता त्यांनी क्ले यांच्या छपाई व्यवस्थेचा उपयोग केलेला नसावा, परंतु हा जो संशय कार्टर व पोलार्ड यांना आला होता, त्याचे निराकरणही लगेच झाले. 'क्ले' या छापखान्याच्या इतिहासात अधिक खोलवर जाऊन, या दोघांनी संशोधन केले. मग त्यांना

असे आढळून आले की, क्ले यांच्या छापखान्यात छापलेल्या, पुस्तिकांत वापरलेल्या टंकाबद्दल सूक्ष्म तपासणी केल्यानंतर, त्यात वापरलेल्या सर्व प्रकारच्या टंकाचा उपयोग कधीना कधी कोठच्या ना कोठच्या पुस्तिकेत झालेला आहे. या सर्वांचा अर्थ एकच होता. एकतर दोन किंवा त्याहून अधिक संख्येच्या एकमेकाशी संबंध नसलेल्या स्वतंत्रपणे व्यवहार करणाऱ्या लोकांशी या पुस्तिकांचा संबंध होता. थोडक्यात बनावट पुस्तिका तयार करणाऱ्या एका व्यक्तीशी, अगर त्या तयार करणारी जी एक टोळी होती. यापैकी एकाला त्यांना सामोरे, जावयाचे होते.

ही तंत्र वैज्ञानिक स्वरूपाची तपासणी येथवर झाली. पण आणखीही एक तपासणी शिल्लक होती. या पुस्तिकेतून छापला गेलेला जो मजकूर होता, त्याची तपासणी केली तर काय आढळले असते? रस्किन या लेखकाच्या समग्र लेखनाचे संपादन करताना, त्या संपादकांनी एक गोष्ट सिद्ध केली होती. ती ही की, प्रसिद्धीपूर्व समजल्या जाणाऱ्या अनेक पुस्तिकांत जो मजकूर समाविष्ट झाला होता तो वस्तुत: त्या पुस्तिका प्रसिद्ध झाल्यानंतर अनेक वर्षांनी झालेल्या आवृत्यांतील मजकूर होता. एवंच काटेकोरपणे बोलता, कार्टर आणि पोलार्ड यांनी ग्रंथसूचीचे जे काम हाती घेतले होते, त्या संबंधात त्यांनी जे संशोधन केले त्याचा मथितार्थ काय आहे, हे त्यांना आता सांगता आले असते. या दोघांनी जे संशोधन केले त्याचा ताळेबंद लक्षणीय होता.

पन्नासाहून अधिक बनावट दुर्मिळ पुस्तिकांची छाननी करून त्यांनी असे सिद्ध केले होते की, या पुस्तिकात वापरलेला कागद, त्या पुस्तिकांच्या छपाईसाठी वापरलेले टंक, त्या पुस्तिकांत समाविष्ट करण्यात आलेला मजकूर यांच्या आधारावर, त्या पुस्तिकातील सत्तावीस पुस्तिका या सरळ सरळ बनावट होत्या. दुसऱ्या तेरा फारच संशयास्पद होत्या. याचा अर्थ ज्या पुस्तिका सर्वस्वी बनावट होत्या आणि त्यांच्याविरुद्ध असलेला पुरावा जितका बळकट होता, तेवढा तो या संशयास्पद पुस्तिकाबाबत नव्हता एवढेच. हे संशोधन एवढ्यावरच थांबले नाही. या दोन संशोधकांनी अगदी सूक्ष्मात जाऊन तपासणी केली. त्यात शंभराहून अधिक पुस्तिकांचा, ग्रंथाचा समावेश होता. हे सर्वच ग्रंथ वा पुस्तिका 'दुर्मिळ' होत्या.

या ग्रंथात, पुस्तिकात राणी व्हिक्टोरियाच्या काळातील चिपळूणकरांच्या ढंगाने लेखन करणाऱ्या अनेक निबंधकारांचा समावेश होता. त्यात ब्राउनिंग पती-पत्नी, कादंबरीकार जॉर्ज इलिएट, कवी टेनीसन, कवी-समीक्षक मॅथ्यू अर्नाल्ड, कवी स्वीनबर्न, आणि कादंबरीकार थॅकरे यासारख्या अनेक महान साहित्यिकांच्या साहित्यकृतींचा समावेश होता. या सर्वांच्या साहित्याच्या ज्या ज्या धादांत बनावट आवृत्त्या होत्या त्यांचे खरे स्वरूप उघड्यावर आले होते. या ठिकाणी एका मुद्दा विषेश करून लक्षात घेतला पाहिजे. या सर्वच पुस्तिका / ग्रंथ यांच्या अनेक आवृत्त्या दुर्मिळ पुस्तकांच्या बाजारात राजरोसपणे विकल्या गेल्या होत्या. काही काही साहित्यकृतींच्या या बनावट दुर्मिळ आवृत्त्यांना त्या काळातले शंभर पौंड एवढी प्रचंड रक्कम ग्रंथसंग्रहकांनी मोजली होती. या सर्वांवरून एक गोष्ट लक्षात येईल, ती म्हणजे या दोन चौकस संशोधकांनी जी फसवेगिरी उघड्यावर आणली होती, ती केवळ विद्यापीठीय

(Academic) हित लक्षात घेऊन केलेली नव्हती, हे स्पष्टच आहे.

त्यांनी आजवर जो पुरावा गोळा केला होता, त्याचा त्यांनी आढावा घेतला. हा पुरावा वेगवेगळ्या प्रकारचा होता. काही ठिकाणी तो फारच विस्तृत होता. हा आढावा घेतल्यानंतर कार्टर व पोलार्ड यांना त्या गुन्हेगाराच्या व्यक्तित्वासंबधी चांगली अटकळ आली. हा गुन्हेगार कोठच्या पद्धती वापरून काम करतो? त्याला कोठच्या क्षेत्रात गती आहे? त्याची बुद्धिमत्ता, त्याच्या आवडीचे विषय, इतकेच नव्हे तर हा गुन्हेगार ज्ञानाच्या बाबतीत क्वचित्‌च चुका करी. हे त्याना चांगलेच ज्ञात झाले होते. परंतु या सर्व गोष्टींचे त्याने केलेल्या गुन्ह्यात प्रतिबिंब पडले होतेच. चरित्र ग्रंथ आणि त्यांची साधने याबाबतचे त्याचे ज्ञान व त्यावरची पकड विलक्षण होती याबद्दल शंकाच नव्हती. तो कवी टेनिसन, रुडयार्ड किपलींग, विल्यम मॉरिस यांच्या समग्र वाङ्‌मयातून अथवा एखाद्या जुन्या नियतकालिकातला लेख वा कविता निवडून काढीत असे; आणि मग त्याची तो पुस्तिका तयार करी. या पुस्तिकेच्या मलपृष्ठावर तो प्रसिद्ध करीत असलेला लेख वा कविता कोठच्या परिस्थितीत तथाकथितपणे प्रसिद्ध झाली होती, हे सारे समजावून सांगे. तसेच हा लेख वा कविता जेव्हा प्रथम प्रसिद्ध झाली, याबद्दल सर्वसामान्यपणे जी मान्य झालेली तारीख होती, त्याच्या अगोदरच्या तारखेला ही पुस्तिका प्रसिद्ध झालेली आहे, हे नमूद करण्यात येई.

आता हे सारे वर्णन, ती साहित्यकृती कशी प्रसिद्ध झाली, इत्यादी गोष्टी त्या लेखकाची वाङ्‌मयीन कारकिर्द आणि त्याचे जीवन यासंबंधात तोवर माहीत असलेल्या घटनांत नेहमीच अगदी चपखलपणे बसवे. ही तथाकथित पहिली आवृत्ती छापखान्यातून बाहेर पडून जेव्हा ग्रंथ बाजारात अवतरे, तेव्हा ही आवृत्ती बनावट नसून अस्सल आहे याबाबतचा सर्व पुरावा घेऊनच अवतरे, आणखी एक महत्त्वाचा मुद्दा हा गुन्हेगार मान्यवर लेखकांच्या साहित्यकृतींच्या ज्या सर्व परिचित आवृत्त्या होत्या, त्याची नक्कल न करण्याची चतुराई दाखवी. जो कोणी ही दुर्मिळ पुस्तिका विकत घेई, त्याला ती दुसऱ्या एखाद्या अस्सल प्रतीबरोबर पडताळून पाहाताच येत नसे.

अशा रीतीने हा जो एक धोका होता, त्याचीही काळजी घेतली गेली होती. थोडक्यात त्या पुस्तिकेच्या अस्सल प्रती कुठेच अस्तित्वात नव्हत्या. याचे कारण, या गुन्हेगाराने त्या पुस्तिका प्रकाशनासाठी कामास लागण्याअगोदर त्या पुस्तिकेची एकही आवृत्ती कधीही अस्तित्वातच नव्हती. परंतु या गुन्हेगाराला या सर्व घालमेलीत एक धोका कधीही टाळता आला नाही. या बनावट पुस्तिकेला स्पर्धेला सामोरे जावेच लागणार होते. एकदा हा तथाकथित दुर्मिळ पुस्तिका, दुर्मिळ ग्रंथाच्या बाजारात आली की या बनावट आवृत्तींची नक्कल लगेच होणे हे क्रमप्राप्तच होते. याचे कारण या गुन्हेगाराने आपण बाजारात आणलेली पुस्तिका ही अत्यंत दुर्मिळ चीज आहे असे ठासून सांगितल्यानंतर, त्या बनावटगिरीची नक्कल झालेली पाहाणे त्याच्या नशिबी होतेच.

कार्टर व पोलार्ड ज्या गुन्हेगाराच्या शोधात होते, त्याला एकोणिसाव्या शतकातील ग्रंथसूचीबद्दल कमालीची चांगली माहिती होती. आपली 'बनावट' पुस्तिका अस्सल आहे हे



अनुक्रमणिका

सिद्ध करून दाखविण्यासाठी त्याने केलेल्या व्यूहरचनेवरून त्याची प्रचिती येते. ज्या कोणा लेखकाचा लेख वा कविता या बनावट पुस्तिकेच्या रूपाने प्रसिद्ध केली जात होती. त्या लेखकासंबधी अगदी बारीकसारीक तपशील, या गुन्हेगाराला ज्ञात होता. त्या लेखकाचा जीवनपट, त्याचा लेखनकाल, यांचा ज्याने खास करून अभ्यास केला असेल अशा व्युत्पन्न विद्वानालाच ते शक्य झाले असते. दुर्मिळ ग्रंथाची जी बाजारपेठ होती, त्याबद्दलही त्या गुन्हेगाराला चांगलीच माहिती होती. आपले समकालीन दुर्मिळ पुस्तकांचे जे संग्राहक होते, त्यांना कोठच्या प्रकारची 'पहिली आवृत्ती' फारच आकर्षित करीत याबद्दल अटकळ बांधण्यात तो गुन्हेगार चांगलाच पटाईत होता.

या सर्वांबरोबर आणखी एक गोष्ट होती. प्रचलित वाङ्मयीन साहित्यविषयक ज्या गावगप्पा होत्या, त्यांच्याशीही त्याचा चांगलाच परिचय होता; असे दिसून आले होते. समजा एखाद्या त्यावेळी हयात असलेल्या एखाद्या लेखकाच्या साहित्यकृतीची त्या गुन्हेगाराने तथाकथित पहिली आवृती काढायचे ठरविले, तर मग तो दोन प्रकारची काळजी घेई. या लेखकाला समजा तथाकथित पहिल्या आवृत्तीबद्दल कोणी प्रश्न विचारले, तर तो या ना त्या कारणामुळे, या आवृत्तीसंबधीचे पेचप्रसंग उत्पन्न करणाऱ्या प्रश्नांची उत्तरे देण्यासाठी लेखक उपलब्ध नसेल याची खात्री तो गुन्हेगार करून घेई. अथवा या अशा प्रश्नांची उत्तरे देण्याची तात्पुरती का होईना, या लेखकाची वा लेखकांची अनिच्छा आहे, हे त्याला माहीत होते. उदा. या गुन्हेगाराने रस्किन हा लेखक निवडला. याचे एक कारण, रस्किन यांचे साहित्य जमविण्याची त्याकाळी जबरदस्त फॅशन होती. पण याही पेक्षा महत्वाचे कारण त्यावेळी पुन्हा एकदा रस्किन महाशय अगदी कायमच्या भ्रमिष्टावस्थेत गेले होते. थोडक्यात ग्रंथसूचीकारानी विचारलेल्या प्रश्नांची उत्तरे देण्यापलिकडे ते गेलेले होते.

या अशा प्रकारची सार्वत्रिक फसवणूक करण्याचा गुन्हा कोणी केला असेल, याबद्दल कार्टर आणि पोलार्ड या दोघांनी विचार करण्यास सुरुवात केली. याच प्रकारच्या संशयास्पद अशा दोन पुस्तिका काही वर्षापूर्वी प्रसिद्ध झाल्या होत्या. या संबधात रिचर्ड हेर्न शेफर्ड आणि जॉन कॅमडेन होट्टेन यांचे नाव घेतले जात होते. हे दोघेही व्हिक्टोरिया राणीच्या काळातील प्रख्यात 'दुर्मिळ ग्रंथ' विक्रेते. त्यांच्या प्रामाणिकपणाबद्दल कोणीही शंका घेतली नसती. मग हा संशय घेतला कोणी? हा संशय फक्त एका माणसाच्या शब्दावर विसंबून घेण्यात आला होता.

परंतु तो मनुष्यच असा होता की दुर्मिळ ग्रंथांचे जे जग होते, त्यांतले ते अनभिषिक्त सम्राट होते. म्हणूनच या व्यक्तीने केलेल्या विधानाला आव्हान जवळ जवळ कोणीच दिले नसते. या माणसाचे नाव होते थॉमस जेम्स वाईज. हे गृहस्थ काही काळ बिब्लिओग्रॅफिकल सोसायटीचे (ग्रंथसूचीकारांच्या संस्थेचे) अध्यक्ष होते. ऑक्सफर्ड विद्यापीठाचे मानद मास्टर ऑफ आर्टस होते. ग्रंथसंग्रह करणाऱ्यांनी स्थापलेल्या अत्यंत उच्चभ्रू रॉक्सबर्ग क्लबचे (Roxburghe Club) सभासद होते. इतकेच नव्हे तर सर्व इंग्लडमधील सर्व ग्रंथ सूचीकारांत ते एकमेव असे व्युत्पन्न पंडित होते.

परंतु हा सर्व पुरावा लक्षात घेऊन शेफर्ड अथवा होट्टेन यांनी स्वतंत्रपणे अथवा दोघांनी मिळून त्या तथाकथित गुन्हेगारानी ही 'नवी गुन्हेगारी' केली असावी हा संशय कार्टर व पोलार्ड यांनी सर्वस्वी त्याज्य ठरविला. त्या दोघांचे म्हणणे असे होते की होट्टेन शेफर्ड या दुक्कलीने, असे गृहित धरूया की कदाचित दुसरे अनेक गुन्हे वा पापे केली असतीलही परंतु प्रस्तुत विषयात बनावट पुस्तिकांची प्रसिद्धी यात त्यांचा अजिबात सहभाग नव्हता, हे सूर्यप्रकाशाइतके स्पष्ट होते. कार्टर आणि पोलार्ड यांनी जो पुरावा जमविला होता, त्यावरून त्यांच्या मते गुन्हेगार ही दुक्कल नसून, तो दुसराच कोणी आहे, याकडे तो पुरावा, अधिक ठाम निर्धाराने बोट दाखवित होता.

कार्टर आणि पोलार्ड यांच्या संशोधनात त्यांना असे आढळून आले की, त्यांनी जमविलेली माहिती, त्यातून उपलब्ध झालेले दुवे एकाच महान व्यक्तीकडे बोट दाखवित होते. ही व्यक्ती लोकांना सदाचाराचे धडे नेहमी देई. दुर्मिळ ग्रंथ पुस्तिकांच्या खरेदी-विक्रीच्या क्षेत्रात त्याकाळी जी जी काही फसवणूक होत असे, त्या सर्व प्रकाराच्या फसवणुकीबद्दल अत्यंत तारस्वरात, आपण त्या सर्वांचे पहिल्या क्रमांकाचे शत्रू आहोत असा दावा करणारे खुद्द थॉमस जेम्स वाईज !

इ. स. १८८५ च्या सुमारास इंग्लिश भाषिक कवी शेले, आणि कवी ब्राउनिंग यांच्या स्मरणार्थ स्थापन झालेल्या संस्थाच्या कारभारात मि. वाईज हे नेहमीच पुढाकार घेत. या आपल्या कार्याच्या मदतीने, ते वाङ्मयीन साहित्य जगतात चांगलेच प्रस्थापित झाले होते. याचा एक परिणाम असाही झाला होता की, साहित्यसूचीच्या क्षेत्रात काहीही प्रश्न उपस्थित होवोत, त्या संबंधात अखेरचा निर्णय हवा असेल, तर मि. वाईज यांच्या न्यायालयात दावा दाखल करून, ते न्यायालय जो काही निर्णय देईल तो अखेरचा निर्णय मानायचा. (Roma Locuta causa Finita या थाटात) आजवर चाळीस वर्षे हे असेच चालले होते. हे सारेच गमतीदार आणि उद्‌बोधक आहे. सुगंधी अत्तरे आणि सुगंधी साबण यांचे उत्पादन करून विकणाऱ्या एका दुकानाचे मि. वाईज हे भागीदार.

थोडक्यात सांगावयाचे झाल्यास त्यांना आत्मियता असलेल्या दुर्मिळ ग्रंथाचा संग्रह करणे, त्यांचा शोध घेणे, या विषयाशी ते मालकी हक्काने करीत असलेल्या व्यवसायाचा अर्थाअर्थी काहीही संबध नव्हता. पण मोजक्याच शब्दात वर्णन करावयाचे झाल्यास मि. वाईज हे दुर्मिळ ग्रंथसंग्राहकलाही आदर्शभूत ठरतील असे होते. त्यांच्या राहत्या घरात ज्याची स्पर्धा कोणत्याही ग्रंथसंग्राहकाला करता आली नसती असा एकमेव ॲशले ग्रंथसंग्रह होता. या नावाने ओळखला जाणारा हा तत्कालीन इंग्लडमध्ये दुर्मिळ व ॲशले ग्रंथसंग्रह आधुनिक वाङ्मयीन साहित्य व हस्तलिखित यांचा एक अत्यंत महत्त्वाचा संग्रह समजला जात असे.

थोडक्यात मि. वाईज यांचा अतिशय खास अशा दुर्मिळ ग्रंथसंग्रहाकांच्या वर्तुळात राबता होता. मेरेडिथ यांचे कोठचे पुस्तक अगोदर प्रकाशित झाले? समजा शेले यांच्या काव्यसंग्रहाच्या दोन प्रती बाजारात आल्या, तर मग दोन प्रतीतला अगदी सूक्ष्म फरक टिपून

त्यातली एकीची किंमत हजार पौंड ठरविली जाई. पण त्या पुस्तिकेचे जुळे भावंड वाटणाऱ्या पुस्तिकेला कोणी पाच पौंड मोजले तर ती पुस्तिका फारच महागात पडली. या अशा प्रकारच्या निर्णयात मि. वाईज यांचा शब्द नेहमीच प्रमाण व अखेरचा समजला जाई. त्यांचे मित्र गोस्स यांनी असे म्हटल्याचे सांगितले जाते की 'न्याय निवाड्याच्या दिवशी आकाशातल्या प्रेमळ बापाला असे सांगितले की नेमासिस या नावाच जे पुस्तक आहे ती खरी खुरी पहिली आवृती नाही. मि. वाईज हे सांगतील याबद्दल मॅला खात्री आहे.'

एकोणिसाव्या शतकातील वाङ्मयाचे जे तज्ज्ञ व अभ्यासक होते, त्या साऱ्यांच्या दृष्टीने मि. वाईज यांचा ॲशले ग्रंथसंग्रह हे भेट देणे हे आपल्या संशोधनाच्या दृष्टीने पूरक व अत्यावश्यक स्थान होते. शेकडो विद्वताप्रचुर ग्रंथात, ग्रंथसूचीत, चरित्रात मि. वाईज यांचे मोठ्या प्रमाणावर आणि इतमानाने आभार मानण्यात आलेले होते. ग्रंथसूची आणि वाङ्मय या विषयांचे आपले प्रचंड व विस्तृत तंत्रवैज्ञानिक ज्ञान, तत्कालीन सर्व विद्वानांच्या सेवेशी, त्यांनी अगदी नम्रपणे सदैव देऊ केले होते. त्यांच्या या बाबतच्या औदार्याला सीमा नव्हती. तसेच तत्कालीन सर्व विद्वानांना त्यांचा अतुलनीय अशा ॲशले ग्रंथसग्रंहातील साधन सामुग्रीचा नेहमीच उपयोग करून घेता येत असे. थोडक्यात तत्कालीन वाङ्मयीन विद्वत्जगतात मि. वाईज हा एक अत्यावश्यक व अटळ असा घटक होता.

ग्रंथसंग्रह या ज्ञानशाखेतील हा मोगल बादशहा त्या क्षेत्रात बदमाशांना शिक्षा फर्मावित असे. ही त्यांचा भूमिका मोठीच रुबाबदार होती. ग्रंथसूची तयार करताना कोणी निष्काळजीपणा केला, तर हे बादशहा वारंवार अत्यंत तीव्र शब्दात त्याविषयीचा आपला राग व द्वेष व्यक्त करीत. दुर्मिळ ग्रंथविक्रीच्या बाजारपेठेत कोणी खोटेपणा केला. उदा. दुर्मिळ पुस्तकांच्या बनावट आवृत्या या अस्सल आहेत सांगितले आणि त्या विकण्याचा प्रयत्न केला असे या क्षेत्रातील या मोगल बादशाहाला आढळून आले तर त्या बदमाशावरही प्रखर शाब्दिक टीकेचा भडीमार होत असे.

ते काहीही असो, लोकमताच्या दृष्टीने शेफर्ड किंवा हॉट्टन या दोन्हीही व्यक्ती चुकीच्या व अप्रिय व्यक्ती होत्या. तसे होते तरीही कार्टर व पोलार्ड या दोघांच्याही मते या बनावट पुस्तिकांबाबत कोण दोषी असेल तर ते मि. वाईज हेच होते. मि. वाईज हे संशय घेण्या पलीकडचे आहेत. अशी नुसती कल्पना करण्यासाठीही या दोघांच्या कल्पनाशक्तीला फारच प्रयत्न करावा लागत होता. मि. वाईज यांच्याबद्दल गेल्या चाळीस वर्षात कोणीही, कसलाही प्रश्न कधीही उपस्थित केला नाही, अशी त्या व्यवसायात त्याना प्रतिष्ठा प्राप्त झालेली होती, हेही त्यांना चांगले माहीत होते. मि. वाईज यांची या क्षेत्रातील प्रतिष्ठा किती प्रचंड होती, या संबधातले एक उदाहरण इ. स. १९२२ साली एक अमेरिकन विद्वान जॉन. डब्ल्यू ड्रेपर यांनी मि. वाईज हे ग्रंथसूचीबाबत किती निष्काळजी आहेत याविषयी चांगलेच खारट मत व्यक्त केले व ते छापूनही आले. रेन ग्रंथसंग्रहातील ग्रंथांची जी ग्रंथसूची मि. वाईज यांनी तयार केली होती. त्याविषयी ड्रेपर यांनी चांगलाच प्रदीर्घ परीक्षणवजा लेख लिहिला होता. त्या लेखात ड्रॅपर यांनी असे म्हटले होते की मि. वाईज यांनी तयार केलेल्या ग्रंथसूचीत

अनेक महाभयानक चुका केलेल्या आहेत. यावर मि. वाईज यांनी त्या चुकांना ते स्वत:च जबाबदार आहेत असे जाहीर केले होते.

यावर ड्रेपर यांनी असे म्हटले की, "चुकीचे मार्गदर्शन बुद्धीपुरस्सरपणे करण्याच्या हेतूचे या गफलतीद्वारा सूचन होते" परंतु त्याचबरोबर त्यांनी आपल्या या विधानाला घाईघाईने पुस्ती जोडली की, मि. वाईज यांच्यावर अशा प्रकारचा आरोप करण्याचे कोणाच्याही मनात येणार नाही "गंमत अशी आहे की ड्रेपर यांच्यानंतर बारा वर्षांनी कार्टर व पोलार्ड या दोघांनीही मि. वाईज यांच्याबद्दल लिहिताना अगदी याच शब्दप्रयोगाचा वापर केला होता. कार्टर व पोलार्ड यांनी या शब्दप्रयोगाचा वापर करताना उपरोधिकपणे लिहिले होते. कदाचित मि. ड्रेपर यांनीही त्याच हेतूने ती पुस्ती जोडली असावी. मुद्दा एकच बारा वर्षांचा काळ लोटल्यानंतर,दोन ब्रिटिश संशोधक, एका अमेरिकन संशोधकासारखेच उद्‌गार काढतात हे आश्चर्यचकित करणारे आहे. ते काहीही असो, कार्टर व पोलार्ड हे दोघेही तरुण संशोधक तरुण वडिलधाऱ्यांना मान देत नाहीत ही परंपरागत समजूत आहे. या दोघा तरुण ग्रंथसुचीकारानी ही परंपरागत समजुत बरोबर आहे हे आपल्या वागण्यातून दाखवून दिले होते. पण ते करताना एक मुद्दा त्यांनी ठासून मांडला. संशोधक हा वडिलधाऱ्यांना संशोधनाच्या क्षेत्रात ते केवळ वडिलधारे आहेत म्हणून मान देत नाहीत. आपल्यासमोर आलेल्या प्रत्येक गोष्टीची मग ते सन्माननीय पूर्वसूरींनी केलेले लिखाण का असेना याची अगदी तपशीलात जाऊन छाननी करणे हेच संशोधकाचे काम आहे. आपल्या हाती घेतलेले काम हे बरोबर, या श्रद्धेचा तो मूळ स्रोत आहे.

या सर्वच प्रकरणाने प्राप्त करून दिलेल्या रोषणाईत, मागे वळून पाहिल्यानंतर, एकोणिसाव्या शतकात इंग्लडमध्ये ज्या बनावट पुस्तिका छापल्या जात होत्या, त्यांच्याशी मि. वाईज यांचे संबध चकित करतील इतक्या नाना प्रकारचे होते. एखाद्या सर्वसाधारण ग्रंथसंग्राहाकाला पुस्तकांच्या जगात जेवढा रस असावयास हवा, त्यापेक्षा मि. वाईज यांची त्या क्षेत्रातील गुंतवणूक फारच वेगळ्या प्रकारची होती. 'रिडिंग १८४७' ही पुस्तिका दुर्मिळ ग्रंथ बाजारात कशी आली याबद्दलचे जे स्पष्टीकरण उपलब्ध होते ते फक्त मि. वाईज यांनी जे लिहिले होते, तेवढेच होते. याची नोंद यापूर्वीच आपण घेतली आहे. कार्टर आणि पोलार्ड यांना आणखी एका मुद्याची जाणीव झाली, तोवर पन्नासहून अधिक बनावट पुस्तिका दुर्मिळ पुस्तकांच्या बाजारात आलेल्या होत्या. परंतु त्यातल्या फारच थोड्या पुस्तिकांबाबत त्या दुर्मिळ पुस्तकांच्या बाजारात कशा व केव्हा आल्या याविषयी स्पष्टीकरण दिले गेले होते. काही थोड्या पुस्तिकांबद्दल जी काही स्पष्टीकरणे देण्याचे प्रयत्न झाले होते, त्यात 'रिडिंग १८४७' ही एक होती. जे स्पष्टीकरण देण्यात आले होते, ते या पुस्तिका डॉ. बेन्रेट यांच्या हाती कशा आल्या याची तपासणी केल्यानंतर, ते आणखीनच चक्रावून टाकणारे होते. त्या पुस्तिका त्यांच्या हाती येण्याचा इतिहास असा आहे.

डॉ. बेन्नेट तुसस्कूलम विद्यापीठाचे (Tusculum) १८६९ सालचे एल. एम. डी. मिस मिटफोर्ड यांच्याकडून डॉ. बेन्रेट यांना 'रिडिंग १८४७' च्या पुस्तिकेच्या 'छापखाना ताजी'

(Print Fresh) अशा दहा ते बारा प्रती मिळाल्या. मि. वाईज यांनी ही कथा, इ. स. १९१८ साली प्रसिद्ध केली, त्यावेळी डॉ. बेन्रेट हे मरण पावल्याला चांगली तेवीस वर्षे होऊन गेली होती. डॉ. बेन्रेट यांचा मिस मिटफोर्ड यांच्याबरोबर परिचय होता हे वादातीत आहे. पण हा परिचय फारच जुजबी होता. मिसेस ब्राउनिंग यांच्या वतीने मिस मिटफोर्ड यांनी ही पुस्तिका छापून घेतली. त्याचवेळी ही गोष्ट आपण गुप्त ठेवू असे वचनही त्यांनी दिले. मिस मिटफोर्ड या इ. स. १८५५ साली मृत्यू पावल्या. आपल्या मरणाअगोदर त्यांनी या दुर्मिळ प्रती डा बेन्रेट यांच्या हवाली करण्याइतका त्या दोघांचा दाट परिचय नक्कीच नव्हता. शिवाय डॉ. बेन्रेट व मिस मिटफोर्ड या दोघांचा एकमेकांशी परिचय होता याचा पुरावा खुद्द मि. वाईज यांनी तसे सांगणे हाच होता.

मि. वाईज यांनी 'रिडिंग १८४७' ही पुस्तिका कशी खरेदी केली याबद्दल सांगितलेली कथा संशयास्पद होती. परंतु बनावट पुस्तिकांच्या इतिहासातील तो वस्तुतः सगळ्यात कमी महत्त्व असलेला मुद्दा आहे. याचे कारण त्या मुद्याच्या आधाराने फक्त एकाच बनावट पुस्तिकेबरोबर मि. वाईज यांचा संबंध प्रस्थापित करता येत होता. परंतु कार्टर आणि पोलार्ड यांनी आणखी पुरावा जमवून असे सिद्ध केले की मि. वाईज यांनी बनावट दुर्मिळ पुस्तिका छापून काढण्याचा कारखानाच चालू केला होता. त्यांचा एकाच बनावट दुर्मिळ पुस्तिकेशी संबंध नसून, चाळीस वर्षांहून अधिक वर्षे या बनावट पुस्तिका बाजारात आणून ते टाकीत होते. कार्टर आणि पोलार्ड यांनी जमा केलेल्या पुराव्यांतील काही महत्त्वाच्या गोष्टी –

(१) क्ले कंपनीच्या अधिकाऱ्यांना आपल्या छापखान्यातील टंक आणि आपला छापखाना कोणत्या कुमार्गासाठी वापरला जातो आहे हे ठाऊक होते, याबद्दल काहीही पुरावा उपलब्ध नव्हता. याचा अर्थ हा गुन्हेगार त्यांच्या चांगल्याच परिचयाचा होता आणि ते त्याच्यावर विश्वास टाकून होते. कवी ब्राऊनिंग आणि कवी शेले यांच्या नावाने ज्या संस्था स्थापन झाल्या होत्या, त्या संस्थाच्या छपाईचे काम, क्ले यांची कंपनी करीत असे. या दोन्ही संस्थांनी त्या दोन कवींचे जे काव्यसंग्रह प्रसिद्ध झालेले होते, त्यांची जशीच्या तशी नक्कल करून, ते क्ले यांच्या छापखान्यातून छापून घेतले होते. हे तसे कौशल्याचे काम होते व ते करण्याकरता त्यांची खास प्रसिद्धी होती. या अशा पुस्तकांच्या ज्या अशा आवृत्त्या निघत, त्यांच्या प्रतींची संख्याही मर्यादित असे. त्या दोन विश्वविख्यात कवींच्या नावाने स्थापन झालेल्या त्या दोन संस्था त्यावेळी दुर्मिळ झालेल्या त्या काव्यसंग्रहाच्या 'नक्कल' आवृत्त्या प्रसिद्ध करीत. हा सर्व व्यवहार फायदेशीर होता. फक्त एका अटीवर. ही आवृत्ती ही नक्कल आहे व ती अमूक छापखान्यात छापली गेली आहे.

असे त्या नक्कल आवृत्तीतील प्रतीच्या मुखपृष्ठावर जाहीर करावे लागत होते. अर्थात ही 'नक्कल' छापून तयार करण्यासाठी खास टंक पाडून घ्यावे लागत व मूळ आवृत्तीची प्रत जशी प्रसिद्ध झाली असेल त्यानुसार रचना करावी लागे. कार्टर व पोलार्ड या दोघांच्या खास करून असे लक्षात आले की, ब्राउनिंग आणि शेले सोसायटीने केलेल्या 'नक्कल' पुस्तकात वापरलेले टंक आणि बनावट दुर्मिळ पुस्तिकात वापरलेले टंक हे जवळ जवळ सारखे होते.

त्या दोघांच्या दृष्टीने ही फारच लक्षणीय बाब होती. त्यांना दुसरे असे आढळून आले की ब्राउनिंग आणि शेले सोसायटीने प्रसिद्ध केलेल्या 'नक्कल' आवृत्त्यांच्या प्रतीत आणि त्या बनावट पुस्तिकांत वापरण्यात आलेला कागदही एकाच प्रकारचा व पद्धतीचा होता. आणखी एक महत्त्वाची गोष्ट म्हणजे, ब्राउनिंग शेले या प्रकाशन संस्थांमार्फत त्या 'नक्कल' आवृत्त्यांचे छपाईने काम ज्या एका व्यक्तीने पुढाकार घेऊन केल्याचे ज्ञात होते, त्या व्यक्तीचे नाव होते, थॉमस जे वाईज.

(२) ब्राउनिंग शेले यांच्या नावाच्या त्या दोन्ही संस्थांसाठी काम करताना दुर्मिळ पुस्तकांच्या नक्कल आवृत्त्या तयार करण्याच्या कामात मि. वाईज यांनी चांगलाच अनुभव प्राप्त करून घेतला होता. त्याशिवाय आणखी एका कलेत तरबेज होते. ती म्हणजे, दुर्मिळ ग्रंथांची नक्कल प्रत छापण्याअगोदर जी पूर्वतयारी करावी लागते, तीही कला मि. वाईज यांनी हस्तगत केली होती, अशा रीतीने ग्रंथ सूचीकारांनी जे ग्रंथ दुर्मिळ ठरविले होते, ते छापून तयार करण्याच्या कामात एकमेव असे ते तज्ज्ञ आहेत ही गोष्ट आता सर्वमान्य झाली होती. ग्रंथसंग्राहकामध्ये असा एक वर्ग असतो, की एखाद्या ग्रंथाची त्यातील अगदी बारीक तपशीलांसह जर कोणी नक्कल प्रत छापून तयार केली, तर त्यासाठी तो भरपूर किंमत मोजावयास तयार असतो. ही जबर किंमत मोजण्यासाठी हे ग्रंथसंग्राहक दोन अटींवर तयार असतात. एकतर तो ग्रंथ फारच दुर्मिळ असला पाहिजे.

दोन, त्याची खुल्या बाजारातली किंमत फक्त फारच धनवानांना मोजणे शक्य होईल, एवढी जबरदस्त असावयास हवी. या ग्रंथसंग्राहाकांच्या मते अत्यंत नशिबवान व धनवान ग्रंथसंग्राहकाच्या संग्रहातच या दुर्मिळ पुस्तकाची खरी प्रत आढळली असती. अर्नाल्ड यांचा अलारीक इन रोम (Alaric in Rome) या ग्रंथाची प्रत फारच दुर्मिळ समजली जात होती. आणि ग्रंथ संग्रहकाकडून या ग्रंथाला मागणीही चांगली होती. मि. वाईज यांनी या ग्रंथाच्या नक्कल आवृत्तीचे उत्पादन करून ही मागणी पुरी केली होती. कार्टर व पोलार्ड यांना हा दुवा मिळाल्याकारणाने ते क्ले कंपनीत पुन्हा एकदा दाखल झाले. अत्यंत दुर्मिळ पुस्तकांचा खजिना समजल्या जाणाऱ्या ॲशले लायब्ररीचे मि. वाईज हे मालक होते.

या ग्रंथसंग्रहातील अनेक पुस्तके फारच दुर्मिळ असल्याकारणाने त्यांना बाजारात फार जोरदार मागणी होती. थोडक्यात दुर्मिळ पुस्तकांच्या 'नक्कल' आवृत्त्यांचे उत्पादन करून, मि. वाईज यांना वैध मार्गांनी पैसे मिळविण्याच्या दृष्टीने परिस्थिती फारच अनुकूल होती. एवंच दुर्मिळ पुस्तकांच्या 'नक्कल' आवृत्त्यांच्या उत्पादनाचा किफायतशीर धंदा मि. वाईज यांना आपल्या आयुष्यभर करता आला असता, याबद्दल प्रश्नच नव्हता. प्रत्यक्षात त्यांनी तो धंदा केलाच. त्याशिवाय त्यांच्याकडे असलेल्या हस्तलिखितांची छपाई आणि दुर्मिळ पुस्तकांच्या नक्कल आवृत्त्या, अशी शेकडो पुस्तके त्यांनी प्रसिद्ध केली. अर्थात अत्यंत मर्यादित प्रतींच्या आवृत्त्यात.

(३) इ. स. १८९० च्या आसपास ग्रंथसंग्राहकांच्या हातात त्या पन्नासाहून अधिक बनावट पुस्तिकांच्या प्रती एकामागून एक येऊन थडकू लागल्या. त्यावेळेपासून ज्या ज्या

वेळी संधी मिळेल तेव्हा मि. वाईज या पुस्तिकांची मोठ्या तत्परतेने भलावण करू लागले. या कामाकरता, त्यांना चांगलीच प्रसिद्धी त्यांच्या विशिष्ट स्थानामुळे मिळाली होती. मि. वाईज यांनी दुर्मिळ पुस्तकांच्या नक्कल आवृत्त्या आणि बनावट पुस्तिका यांची दुर्मिळ पुस्तकांच्या बाजारात पेरणी फार मोठ्या प्रमाणावर केली होती. असे असल्याकारणाने त्यांच्या सल्ल्यास वारंवार मागणी येऊ लागली. याचे कारण ते या विषयातले एकमेव तज्ज्ञ होते.

मि. वाईजही आपण अगदी नि:पक्षपातीपणे सल्ला देत आहोत असा आव आणीत. तसे असले तरी मि. वाईज आपल्या ज्ञानासह सर्वांच्या सेवेस हजर असत. ते सर्वांना उपकृत करीत. ग्रंथांच्या पहिल्या आवृत्ती जमविण्याच्या धंद्याला तेव्हा नुकतीच सुरुवात झाली होती. या नव्या धंद्याच्या सुरुवातीपासूनच्या उपासकांतल्या अनेकांनी या नव्या धंद्यात मि. वाईज यांचे अनुयायित्व पत्करलेले होते. हे असे असल्याकारणाने या अनुयायांतल्या जवळ जवळ प्रत्येक व्यक्तीच्या विचारावर मि. वाईज यांना प्रभाव टाकता आला.

याचे कारण त्यांच्या त्या नेतृत्वापुढे प्रभाव टाकण्याच्या दृष्टीने, ते कमालीच्या अनुकूल स्थानावर होते. मागे वळून पाहाता असे दिसते की, एकोणिसाव्या शतकात एखादी नवी ग्रंथसूची प्रसिद्ध झाली की त्या ग्रंथसूचीत त्या ग्रंथसूचीकाराने, मि. थॉमस जे वाईज यांनी काहीही हातचे न राखता, उदारतेने केलेल्या मदतीच्या उल्लेख मोठ्या कृतज्ञतेने केलेला दिसतो. हे असे करणे हा जवळ जवळ एकही अपवाद नाही असा नियम आहे हे ठरूनच गेले होते. हे सर्व कृतज्ञ ग्रंथसूचीकार असेही नमूद करीत की, त्यांच्या अगोदरच्या ग्रंथसूचीकारांनी काही कारणानी अश्याच दुर्लक्षिलेल्या काही दुर्मिळ पुस्तिका मि. वाईज यांच्या औदार्यामुळे त्यांना उपलब्ध झाल्याकारणाने, त्यांचा अंतर्भाव त्यांना आपल्या ग्रंथसूचीत करता आला.

येथवर मि. वाईज यांचा या क्षेत्रातील प्रभाव चांगलाच शक्तिशाली होता. तथापि त्यांनी आपले स्वत:चेच प्रकाशन चालू केल्यानंतर तो प्रभाव अधिकच शक्तिशाली झाला. याचे कारण आता त्यांचे स्वत:चेच प्रकाशन असल्याकारणाने दुसऱ्याच्या मेहेरबानीवर अवलंबून न राहाता, त्यांना या साधनाकरवी प्रत्यक्षच प्रभाव टाकता येणार होता. इ. स. १८९५-९६ साली त्यांनी आणि विल्यम रॉबर्टसन – हे लंडन येथून प्रसिद्ध होणाऱ्या 'बुकमन' या नियतकालिकाचे संपादक होते – या दोघांनी मिळून 'लिटररी ॲनकडोटस् ऑफ नाईटीन्थ सेंचुरी ('एकोणिसाव्या शतकातील वाङ्मयीन चुटकेवजा कथा / गजाली' हा ग्रंथ दोन खंडात प्रसिद्ध केला)

ग्रंथसूची या विषयावर या ग्रंथात जे शोधनिबंध होते. त्यात या बनावट पुस्तिकांचा सिंहाचा वाटा होता. या प्रकाशनानंतर मि. वाईज यांना मृत्यू येईपर्यंत, ते ग्रंथसूची तयार करण्याचे काम अगदी अथकपणे करीत असत, त्यांच्यासारखे जे ग्रंथसंग्रह करणारे समछंदी होते, त्यांनी त्या सूचीचा उपयोग करावा या हेतूनेच त्या सूची तयार केलेल्या असत. या ग्रंथसूचींचा परमोच्च बिंदू त्यांनी आपल्या मालकीच्या ॲशले लायब्ररीतील, ग्रंथ, पुस्तिका, हस्तलिखिते यांची सूची करून गाठला. या सर्वच ग्रंथसूची वाङ्मयीन संशोधन क्षेत्रात उच्च

पातळीवर काम करणाऱ्या तज्ज्ञांना ते ज्या लेखकासंबंधी संशोधन करीत असतात त्या दृष्टीने फारच मार्गदर्शन अजूनही करतात हे खरे. परंतु त्यांना एकेकाळी जी प्रचंड प्रतिष्ठा होती, ती आता फारच कमी झाली आहे.

याचे कारण कार्टर व पोलार्ड यांनी असे निरपवादपणे सिद्ध केले आहे की, मि. वाईज यांनी तयार केलेल्या या सर्वच ग्रंथसूचीत, प्रतिष्ठा असलेल्या अनेक अस्सल वाङ्मयीन साहित्य प्रकाशनांबरोबर, त्यांच्या मांडीला मांडी लावून अनेक बनावट साहित्य प्रकाशनेही अगदी दाटीवाटीने बसलेली आढळतात. कार्टर व पोलार्ड यांनी एकदा मि. वाईज यांच्या संबधातले संशयाचे दरवाजे सताड उघडे केल्यानंतर, अनेक संशोधकांनी मि. वाईज यांच्या सर्वच कारकीर्दीची अगदी तपशीलात जाऊन तपासणी केली. या संशोधकांच्या मते, या कार्टर व पोलार्ड यांच्या पुराव्यानुसार सिद्ध झालेल्या बनावट दुर्मिळ पुस्तिकांपासून शेकडो योजने दूर असलेल्या ग्रंथसूचींच्या संदर्भातही मि. वाईज यांनी केलेली वक्तव्ये ही अजिबात विश्वसनीय नाहीत.

(४) एखाद्या ग्रंथकारावद्दलच्या ग्रंथसूचीत आणि एखाद्या ग्रंथसंग्रहातील ग्रंथाची व पुस्तिकांची सूची या दोन्ही ठिकाणी या बनावट दुर्मिळ पुस्तिकांचा अंतर्भाव होत असे. परंतु एवढ्याच मर्यादित हेतूने मि. वाईज आपली प्रचंड प्रतिष्ठा या बनावट दुर्मिळ पुस्तिकांमागे उभी करण्याचा उद्योग करीत नव्हते. या बनावट दुर्मिळ पुस्तिकांचे भले व्हावे, त्यांना उर्जितावस्था प्राप्त व्हावी यासाठी खटपट करण्यामागचे त्यांचे हेतू त्या मर्यादित उद्दिष्टा-पलीकडे जाणारे होते. ग्रंथप्रेमींना ज्या प्रकारच्या औदार्याबद्दल प्रेम वाटते, तशाच प्रकारचे औदार्य मि. वाईज यांनी दाखविले होते, हे कार्टर व पोलार्ड यांच्या लक्षात आले. मि. वाईज यांनी छापून घेतलेल्या बनावट दुर्मिळ पुस्तिकांच्या अनेक प्रती त्यांनी काही वाचनालयास भेट दिल्या. यात ब्रिटिश म्युझियम आणि केंब्रिज युनिव्हर्सिटी या दोन्हीही विश्वविख्यात संस्थांच्या वाचनालयांचा समावेश होता. हे औदार्य प्रकट करून, मि. वाईज एक मुद्दा सिद्ध करीत होते. तो म्हणजे या बनावट दुर्मिळ पुस्तिका बनावट नसून, त्या विद्वत जगतात अस्सल प्रती म्हणून मान्यता प्राप्त झालेल्या पुस्तिका आहेत. परंतु हे औदार्य ते नेहमीच दाखवीत नसत. या संबधात त्यांनीच लिहून ठेवले आहे. समजा त्यांच्याकडे जी दुर्मिळ पुस्तिका होती तिची एखादी प्रत त्यांना कधीतरी आढळली, तर त्यावेळी त्यांचे हे औदार्य गुप्त होत असे. दुर्मिळ पुस्तकांच्या बाजारात व्यवसाय करणाऱ्यांचा एक मोठा दुर्गण म्हणजे ते आपल्याला दुर्मिळ पुस्तक कोठे वा कोणाकडून मिळाले या संबधात तोंड घट्ट मिटून ठेवतात.

याबाबत त्या व्यावसायिकांची मोठीच दुष्कीर्ती होती. परंतु व्यावसायिकाच्या या अनिच्छेवर कार्टर व पोलार्ड यांनी मात करून पुढील माहिती मिळविली. त्यांना असे समजले की मि. वाईज यांना 'सापडलेल्या' दुर्मिळ पुस्तिकांच्या अनेक प्रती त्यांनी आपल्या मित्रांना दिल्या होत्या. या व्यवहारात मि. वाईज यांना चांगलीच द्रव्यप्राप्ती होत असे. याबावत मि. वाईज सतत इतके नाशिबवान होते की, त्यांना नेहमीच अशा दुर्मिळ पुस्तिका सापडत.

जॉन हेन्स रेन या अमेरिकन करोडपतीला त्यांनी अशा बनावट दुर्मिळ पुस्तिकांचा संचच पुरविला. या करोडपतीला तो मिळावा यासाठी त्यांनी फ़ार परिश्रम घेतले असेही त्यांनी सांगितले.

अर्थात असा एक संच त्यांच्या संग्रहात होताच. दुसराही एखादा असला तर कार्टर व पोलार्ड यांनी या पुस्तिकांचा बनावटपणा सिद्ध केल्यानंतर हा संच आपल्याकडे आहे, हे त्या संचाच्या मालकास कबूल करणे चांगलेच अवघड जात असेल. कालांतराने असे माहीत झाले की कॅलिफोर्नियातील हटींगटन वाचनालयात एक संपूर्ण संच आहे. त्यात फक्त एकच पुस्तिका नाही. पण कार्टर व पोलार्ड यांच्या नजरेतून सटकलेल्या आणखी दोन बनावट दुर्मिळ पुस्तिका त्या संचात आहेत हे विशेष.

(५) दुर्मिळ बनावट पुस्तिकेच्या एकाहून अधिक प्रती अस्तित्वात होत्या. तसेच अशा काही प्रतींचे वितरण मि. वाईज यांनी केल्याचे सर्वांना माहीत होते. परंतु ज्या पुस्तिकांबद्दल स्पष्ट व चांगल्या नोंदी होत्या अशा बनावट दुर्मिळ पुस्तिका एवढ्या मोठ्या संख्येने दुर्मिळ पुस्तकांच्या बाजारपेठेत कशा आल्या या गूढ वस्तुस्थितीला कार्टर व पोलार्ड यांना सामोरे जावयाचे होते. या दोघांनी आपल्या साहसास आणि गुप्त पोलिस थाटाच्या संशोधनास सुरुवात केली तेव्हा त्यांना एका चमत्कारिक गोष्टीचा शोध लागला.

तो म्हणजे या दुर्मिळ बनावट पुस्तिका बाजारात कशा आल्या हे समजून घेण्यासाठी त्यांना दुर्मिळ ग्रंथ खरेदी-विक्रीची जी सूची होती, ती फारच बारकाईने तपासावी लागली होती. तपासाअंती त्यांना असे आढळून आले की, या दुर्मिळ बनावट पुस्तिकांपैकी अनेक पुस्तिका नेहमीच्याच परिचित मार्गाने बाजारात विक्रीसाठी आल्या होत्या. पण त्यातल्या एकाही पुस्तिकेवर या दुर्मिळ बनावट पुस्तिकांवर ती बाजारपेठेत विक्रीस येण्याअगोदरचा मालक कोण होता, याचा उल्लेख मात्र त्या सूचीत नव्हता. दुर्मिळ बनावट पुस्तिका या दुर्मिळ पुस्तकांच्या बाजारात चांगल्या आखीव व रेखीव संचात विकावयास येत असत. याचा उल्लेख यापूर्वी येऊन गेलाच आहे. याचा अर्थ कोणीतरी अगदी पद्धतशीरपणे या बनावट दुर्मिळ पुस्तिकांचा पुरवठा बाजारपेठेस करीत होता. या दुर्मिळ बनावट पुस्तिकांच्या मूळ उगमस्थानाचा शोध लावणे अशक्य नव्हते. दक्षिण लंडन मध्ये इ. स. १९१२ सालापासून दुर्मिळ ग्रंथ – पुस्तिका यांची खरेदी विक्री करणारे एक दुकान होते. त्या दुकानाच्या मालकाचे नाव होते हर्बट गोरफिन. आता कार्टर व पोलार्ड यांना आणखी एक शक्यता तपासून पाहावी लागणार होती. हर्बट गोरफिन हाच या बनावट दुर्मिळ पुस्तिकांचा उत्पादक आहे का? ही शक्यता विचारात घ्यावीच लागणार होती. परंतु या संशयाचा निचरा लवकरच झाला.

कार्टर व पोलार्ड यांना असे समजले की, गोरफिन हा मि. वाईज यांच्या कचेरीत प्यून (शिपाई) म्हणून काम करीत असे. तो कचेरीत काम करीत होता म्हणून मि. वाईज या बनावट दुर्मिळ पुस्तिका त्याच्याकडे विकण्यासाठी देत. गोरफिन अधून मधून त्या विकण्यात यशस्वी होत असे व या खटपटीसाठी गोरफिनला कमिशन मिळत असे. हे कळल्यानंतर

कार्टर व पोलार्ड यांनी गोरफिन यांचे नाव बाद केले. या दोघांच्या मनात अजूनही जो काही अंधुकसा संशय रेंगाळत होता, तोही त्यांना गोरफिन हा फारच प्रामाणिक गृहस्थ आहे, असे आढळून आल्यानंतर पार निकालात निघाला. त्याचे असे झाले, हे दोघे गोरफिन यांच्या दुकानात त्यांची मुलाखत घेण्यासाठी गेले. दुर्मिळ पुस्तिकांबाबत जी प्रचंड फसवेगिरी झाली होती, यात गोरफिन यांची भूमिका काय होती, हे त्यांनी त्यांना समजावून सांगितले.

आपल्या आयुष्यात अजाणतेपणाने केलेल्या गुन्हेगारीची माहिती त्याला प्रथमच मिळाली होती. गोरफिन यांनी व्यापारविषयक नोंदी असलेल्या सर्व वह्या, या दोन तपासनिसांपुढे ठेवल्या आणि काय पाहिजे असेल त्याचा तपास घ्या अशी विनंती केली, इतकेच नव्हे तर इ. स. १९०९ ते १९१२ या वर्षांच्या दरम्यान व्यवहार झालेल्या व्यवहाराचे जे कागदपत्र होते ते त्याने आपण होऊन या तपासनिसांना काढून दिले. त्या कागदपत्रावरून असे दिसून आले की अक्षरश: शेकडो बनावट दुर्मिळ पुस्तिका गोरफिन यांनी या कालखंडात खरेदी केल्या होत्या. या सर्वच पुस्तिका त्याने मि. थॉमस वाईज यांच्याकडूनच विकत घेतल्या होत्या. या बनावट दुर्मिळ पुस्तिका, दुर्मिळ ग्रंथपेठेत कशा आल्या हे गूढ अशा प्रकारे उकलले होते.

या दुर्मिळ बनावट पुस्तिकाचा बनाव असा होता – गोरफिन थोड्याशा कालावधीनंतर या बनावट दुर्मिळ पुस्तिकांच्या संचांचा दुर्मिळ पुस्तकांच्या बाजारपेठेत पुरवठा करीत. हे असे केल्याने, त्या बनावट पुस्तिका दुर्मिळ आहेत हा समज दृढ होत असे, निदान टिकून राहात होता, हे जाणण्याइतके गोरफिन निश्चितच चतुर व धोरणी होते. परंतु या बनावट पुस्तिकांची विक्री मि. वाईज यांनी घालून दिलेल्या अटीनुसारच होई. या बनावट पुस्तिका कोठून आल्या म्हणजे त्यांनी कोठे खरेदी केल्या हे सांगायचे नाही ही त्यांची एकमेव अट होती. गोरफिन आणि या दोन तपासनिसांची भेट, वाईज यांची गुन्हेगारी सिद्ध करण्याच्या दृष्टीने या प्रकरणात सर्वात महत्त्वाची होती. या अशा प्रदीर्घ व आशा-निराशेने भरलेल्या तपासानंतर, ॲशले लायब्ररी (ॲशले ग्रंथसंग्रह) याचे जगद्विख्यात मालक हेच या बनावट दुर्मिळ पुस्तिकांच्या व्यवहारातले मुख्य गुन्हेगार आहेत. हे कार्टर व पोलार्ड या दोघांनी सिद्ध केले होते.

इ. स. १९३३ च्या ऑक्टोबर महिन्यात पोलार्ड यांनी मि. वाईज यांची भेट घेतली. त्यावेळी मि. वाईज हे चौऱ्याहत्तर वर्षांचे होते. ते त्यावेळी तसे सतत आजारीच असत. पोलार्ड यांनी अगदी शांतपणे, आपल्याकडे मि. वाईज यांच्या विरुद्धचा असलेला पुरावा त्यांना पेश केला. मि. वाईज यांनी अर्थातच आपण आश्चर्यचकित झालो आहोत असा बहाणा केला. असल्या काही गोष्टीची आपण कधीही कल्पना केली नव्हती, असे त्यांनी सांगितले कोठेतरी काहीतरी भयानक चूक झाली असली पाहिजे असेही त्यांनी बजाविले. त्यांनी कार्टर व पोलार्ड यांना असेही विचारले की, त्यांनी हा जो कोणासही विस्मयचकित करणारा पुरावा गोळा केला आहे, त्याचे ते काय करणार आहेत.

त्यासंबधी कार्टर व पोलार्ड यांची काय योजना आहे? पोलार्ड यांनी असे उत्तर दिले की, आम्ही तो प्रसिद्ध करणार आहोत. परंतु ते काहीही असो मि. वाईज यांना त्याबाबत

काय सांगावयाचे आहे, ते जाणून घेण्याची त्यांची इच्छा होती. मि. वाईज यांच्यावर अन्याय होऊ नये हा त्यामागचा हेतू होता. याचे कारण आरंभापासूनच या तथाकथित दुर्मिळ पुस्तिकांच्या व्यवहाराबरोबर ते अगदी एकरूप झाल्यासारखे होते. म्हणूनच त्यांनी या बनावट दुर्मिळ पुस्तिका कोठून, कोणाकडून, व कशा मिळविल्या त्याबाबतचे मि. वाईज यांचे स्पष्टीकरण नक्कीच अत्यंत मौल्यवान असेच आहे...... वृद्धापकाळामुळे आपल्या अधुऱ्या होत चाललेल्या स्मरणशक्तीला चालना देऊन याविषयी जे काही आठवेल ते सांगण्याचे त्यांनी वचन दिले. शिवाय आपणाकडे या प्रकरणाबाबत,जे काही कागदपत्र असतील, जो काही दस्तऐवज असेल त्या सर्वांची पुन्हा एकदां तपासणी करतो असे आश्वासनही दिले.

त्यानंतर या बनावट दुर्मिळ पुस्तिकासंबधीचा जो वृत्तांत त्याना माहीत होईल तो कार्टर व पोलार्ड यांच्याकडे धाडून देतो असेही सांगितले. ही आश्वासने जरी मि. वाईज यांनी भरल्या तोंडाने दिली होती, तरी कार्टर व पोलार्ड या दोघानांही मि. वाईज यांच्याकडून काहीही कळले नाही. सरतेशेवटी २ जुलै १९३४ रोजी कार्टर व पोलार्ड या दोघांनी आपला अहवाल जनतेस सादर केला. गंमत अशी आहे की दुसरे अनेक छापखाने उपलब्ध असतानाही हा अहवाल रिर्चड क्ले अँन्ड सन्स या छापखान्यातच छापून तो प्रसिद्ध झाला होता. ही फसवेगिरी जनतेसमोर आणण्यासाठी कार्टर व पोलार्ड यांना दोन मार्ग उपलब्ध होते. त्यातील एकाची निवड त्यांना करावयाची होती. (१) त्यांनी परिस्थितीजन्य असा (Circumstantial) भरपूर पुरावा जमा केला होता. त्याचा आधार घेऊन किमान पन्नासहून अधिक बनावट दुर्मिळ पुस्तिका तयार करून मग अस्सल आहेत असे सांगून त्या दुर्मिळ पुस्तकांच्या बाजारात विक्रीसाठी आणण्याचे कृष्णकृत्य मि. वाईज यांनी केले होते, हे जनतेस सांगायचे .(२) ही फसवेगिरी करणारी व्यक्ती कोण आहे याबद्दल आपणास काहीही ज्ञात नाही, अशी बतावणी करायची. ही बतावणी करीत असताना मि. वाईज यांच्यासारखा ग्रंथसूची क्षेत्रातला महामानव, हा कोणासही कल्पना येणार नाही असा, कोणीही फसवावे असा मूर्ख मनुष्य आहे. आपणास कोणीही ठकवावे यासाठी स्वत:हून तयार असलेली आणि म्हणूनच भक्ष्य ठरलेली व्यक्ती असे मि. वाईज यांचे वर्णन करायचे. असे केल्याने या वर्णनातील उपरोधामुळे ते आम जनतेच्या चेष्टेचा विषय अपरिहार्यपणे होणार होते.

याविषयी ह्या दोघांनाही शंका नव्हती. तसेच ज्या गुन्हेगाराचे नावही आपणास ठाऊक नाही अशा गुन्हेगाराने, मि. वाईज यांच्यासारख्या ग्रंथसूची क्षेत्रातील महामानवास चाली चाली मामा बनविले होते हे दाखवून द्यायचे. कार्टर व पोलार्ड यांनी हा दुसरा मार्ग पत्करला, याचे एक कारण असे होते की त्यांनी तो प्रचंड परिस्थितीजन्य पुरावा जमा केला होता, व जो पुरावा त्यांच्याकडेच होता, त्या पुराव्यावरून मि. वाईज हे निर्विवादपणे गुन्हेगार आहेत असे सिद्ध होणार नाही याबद्दल त्या दोघांची खात्री पटलेली होती. त्यांच्याकडे असलेला पुरावा प्रसिद्ध करून, त्यांनी मि. वाईज यांना दोषी ठरविले असते तर त्यांच्या विरुद्ध न्यायालयात मि. वाईज जाण्याची शक्यता कोणालाही नाकारता आली नसती. अशा परिस्थितीत काही झाले तरी या खटल्याचा निकाल आपल्या विरुद्ध जाणारच नाही, असा चिरेबंदी पुरावा

आपणाकडे नाही, याचे ज्ञान त्यांना असण्याइतके ते दोघे चतुर व बुद्धिवानही होते.

कार्टर व पोलार्ड यांनी या विषयावर एक पुस्तक प्रसिद्ध केले. या पुस्तकाचे नाव बुद्धीपुरस्कर अशा नम्रतेने त्यांनी 'ॲन इनक्वायरी इन टू दि नेचर ऑफ सरटन नाईनटिना सेंचुरी पॅमप्लेटस्' (एकोणिसाव्या शतकात प्रसिद्ध झालेल्या काही पुस्तिकांच्या प्रकृतीचा तपास) हे नाव दिले. हे दोघे या ग्रंथात आपण फार मोठी कामगिरी केली आहे असा बडेजाव मारीत नव्हते. आपण फक्त तपास करीत आहोत असे ते नम्रपणे सांगत होते. आज हे पुस्तक दुर्मिळ ग्रंथ व्यवहाराच्या क्षेत्रातील वाङ्मयात एक अक्षर ग्रंथ मानला जातो. असे होण्याची दोन कारणे आहेत. एक, त्या प्रचंड फसवेगिरीची उकल क्रमाक्रमाने कशी केली गेली याचा विस्मयचकित करणारा वृत्तांत या ग्रंथात आहे. दोन, पराकोटीच्या थंडपणे, अत्यंत नम्र शब्दात, आविष्कृत झालेला उपरोध, कोठच्याही प्रकारची दयामाया न दाखविता या पुस्तकात वापरलेला आहे.

प्रत्यक्षात घडलेल्या गुन्ह्याचे स्वरूप खरे म्हणजे प्रचंड होते, पण ते तितकेसे मोठे नाही असे वाचकास सांगण्यात येते. (उदा. कोकणात हाताचे हाड मोडले असे कोणी म्हणत नाही, हात दुखावलेला असतो !) तो गुन्हा तितकासा मोठा कसा नव्हता याचा आविष्कार या दोन लेखकांच्या निवेदनाकरवी पानापानावर आढळत होता. उदा. या दोन लेखकांनी असे कबूल केले की त्या बनावट दुर्मिळ पुस्तिका तयार करून त्या प्रसिद्ध करणारी व्यक्ती कोण आहे हे आम्हास ज्ञात नाही. या फसव्या नम्रतेच्या सहाय्याने कार्टर व पोलार्ड यांनी फारच परिणामकारकपणे मि. वाईज हेच ते गुन्हेगार आहेत असे पाश्चिमात्य जगाला सांगितले होते.

'इनक्वायरी' हे पुस्तक अजून प्रसिद्ध व्हायचे होते. पण पोलार्ड यांनी मि. वाईज यांची भेट घेतल्यानंतर, मि. वाईज यांना भयसूचक घंटेने इशारा दिला होता. पोलार्ड, मि. वाईज ही भेट 'इनक्वायरी' प्रसिद्ध होण्यापूर्वी सहा महिने अगोदर झाली होती. थोडक्यात मि. वाईज यांना बचावाची तयारी करण्यासाठी भरपूर अवधी उपलब्ध होता. या मध्यंतरीच्या काळात, अनेक भयावह अफवा मि. वाईज यांच्या कानावर येऊन आदळत होत्या. म्हणूनच या सर्व आरिष्टातून सुटका करून घेण्याच्या दृष्टीने, मि. वाईज यांनी अगदी आगतिकपणे साक्षीदार 'निर्माण' करण्यास आरंभ केला. हे करण्यास त्यांनी सुरुवात केली, त्यावेळी ते एका गोष्टीबाबत अज्ञानी होते. ती गोष्ट म्हणजे त्यांच्या कचेरीत एकेकाळी काम करणारा प्यून आणि वेळप्रसंगी त्या बनावट दुर्मिळ पुस्तिका विकून, कमिशन कमाविणाऱ्या गोरफीन यांनी, त्याला जे काही माहीत होते, ते सारे कार्टर व पोलार्ड यांना सांगितलेले आहे.

मि. वाईज यांनी गोरफीन यांना ताबडतोब आपल्या घरी बोलावून घेतले; आणि त्यांच्याकडे ज्या बनावट दुर्मिळ पुस्तिकांपैकी ज्या काही शिल्लक राहिल्या होत्या, त्या सर्व पुस्तिका चारशे पौंडासाठी विकत घेण्याची तयारी दर्शविली. यासाठी त्यांनी फक्त एकच अट घातली. मि. वाईज यांना या सर्व बनावट दुर्मिळ पुस्तिकांचा गठ्ठा कै. हॅरी बक्स्टन फोरमन यांच्याकडून मिळाला, असे जे स्पष्टीकरण, मि. वाईज देणार होते त्याला गोरफीन यांनी पाठिंबा द्यावयाचा होता. येथे एक गोष्ट नमूद केली पाहिजे. कै. मि. फोरमन हेही एक प्रख्यात





अनुक्रमणिका

ग्रंथसूचीकार आणि ग्रंथसंग्राहक होते. कार्टर व पोलार्ड यांनी दिलेल्या सल्ल्यानुसार गोरफीन यांना त्या बनावट पुस्तिकांसंबंधी जे पैसे देऊ करण्यात आले होते, ते त्यांनी खिशात टाकले. पण फोरमन संबंधात जी "मिथ" तयार केली जात होती, तिचा स्पष्ट शब्दात त्यांनी इन्कार केला. मि. वाईज यांनी गोरफीन यांना चारशे पौंड दिल्यानंतर आपल्या वकिलाच्या साक्षीने त्या शिल्लक राहिलेल्या बनावट दुर्मिळ पुस्तिका जाळून टाकल्या.

इनक्वायरी हा ग्रंथ प्रसिद्ध झाला. तो प्रसिद्ध झाल्यानंतर लंडनमधील वृत्तपत्रांनी आपल्या वार्ताहारांना मि. वाईज यांची मुलाखत घेण्यासाठी पाठविले. मि. वाईज यांनी सर्वसाधारण स्वरूपाची भाषा वापरून, आपला बचाव करण्याचा प्रयत्न केला पण ज्या घटना व वस्तुस्थिती लोकांना ज्ञात झाली होती, त्यात त्यांना भर घालता आली नाही. आपला बचाव करण्यासाठी त्यांना आणखी जे काही म्हणावयाचे होते, ते त्यांनी टाईम्स लिटररी सप्लीमेंट या विश्वविख्यात साप्ताहिकाला दोन पत्रे लिहून सांगण्याचा प्रयत्न केला. परंतु या दोन पत्रात त्यांनी कोणालाही अविश्वसनीय वाटाव्यात अशा दोन महान चुका केल्या होत्या. या चुका कोणालाही अविश्वसनीय वाटोत वा न वाटोत, पण त्या त्यांनी केल्या होत्या ही वस्तुस्थिती. या पत्रातून बक्सटन फोरमन 'कथा' सांगून आपण कसे निर्दोषी आहोत हे सांगण्याचा त्यांनी प्रयत्न केला होता. मि. फोरमन यांचा मुलगा – तोही एक नामांकित पंडित होता, त्याने या मि. वाईज प्रणित फोरमन 'मिथ'ला आपला काही प्रमाणात पाठिंबा आहे असे सांगितले.

या दोन्ही पत्रातल्या मजकुरांचा इन्कार करणारे एक अत्यंत चावरे पत्र गोरफीन यांनी उत्तरादाखल लिहिले. त्यात पुढील गोष्टींचा उल्लेख केलेला होता. या बनावट दुर्मिळ पुस्तिका संबंधात मि. फोरमन यांचा उल्लेख मि. वाईज यांनी एकदाही गोरफीन यांच्याकडे केला नव्हता. त्यांनी प्रथम उल्लेख केला तो इ. स. १९३३ च्या उत्तरार्धात, गोरफीन यांच्याकडे शिल्लक राहिलेल्या बनावट दुर्मिळ पुस्तिकांचा संच मि. वाईज यांनी विकत घेण्याची तयारी दर्शविली होती, त्यावेळी.

हे बाहेरच्या जगात घडत होते. पण पडद्यामागेही चांगल्याच जोरदार हालचाली चालू होत्या. एका बाजूला मि. वाईज, यांच्या विरुद्ध पक्षात कार्टर व पोलार्ड. एका तिसऱ्याच व्यक्तीने या प्रकरणात मध्यस्थ म्हणून काम करण्याची तयारी दर्शविली. मि. वाईज आपल्या खाजगी पत्रव्यवहारात कार्टर व पोलार्ड यांचा उल्लेख 'गटारातले उंदीर' असा करीत. या दोन बाजूत चांगलाच खरमरीत पत्रव्यवहारही झाला. ग्रंथसूचीकारांनी मि. वाईज यांना असा इशारा दिला की, त्यांनी कैलासवासी फोरमन यांना या प्रकरणात विनाकारण दोषी ठरवून गुंतविण्याचा प्रयत्न केला आणि त्याचे समर्थन करण्याकरिता, जर पुरावा सादर केला नाही तर पुढच्या परिणामास तोंड देण्याची त्यांनी तयारी ठेवावी. कार्टर व पोलार्ड या दोघांजवळ आणखीही मि. वाईज यांची ज्यामुळे बदनामी होईल असा भरपूर पुरावा होता. उदा. साक्षीदार गोरफीन यांना लाच देण्याचा मि. वाईज यांचा प्रयत्न. या दोन संशोधकांच्या मते, मि. वाईज यांचे वागणे मूर्खपणाचे होते. मध्यस्थ व्यक्तीने कार्टर व पोलार्ड यांच्याकडे असलेला पुरावा पाहिला. त्यानंतर त्या मध्यस्थ व्यक्तीने मि. वाईज यांच्यावतीने काम करण्याचे बंद केले.

त्यांच्या मते, मि. वाईज हे या प्रकरणात दोषीच होते. स्वत:चा बचाव करण्यासाठी त्यांच्याजवळ एकही मुद्दा उपलब्ध नव्हता. हे प्रकरण तात्पुरते तरी या ठिकाणीच थांबून राहिले. वृत्तपत्रात येणाऱ्या जाड ठशातील सात स्तंभी बातम्या, मुलाखती हे सारे पहिल्या आठवड्यानंतर बंद झाले. थोडक्याच काळात दैनिकांच्या वाचकांना या प्रकरणाचा सर्वस्वी विसर पडला. परंतु मोरोको बांधणीची पुस्तके व त्या ग्रंथाचे विक्रेते, इतर ग्रंथ विकणारे, ग्रंथ संग्राहक आणि संशोधक यांच्यात मात्र या प्रकरणाची चर्चा कधीही थांबली नाही.

अटलांटिक महासागराच्या दोन्ही बाजूच्या शेकडो ग्रंथ-विक्रेत्यांना, कार्टर-पोलार्ड यांनी जाहीर केलेली माहिती वाचून धक्काच बसला. टॉम वाईज हा एक अट्टल गुन्हेगार, या वस्तुस्थितीवर त्यांचा प्रथम विश्वास न बसण्याइतकी ही बातमी धक्कादायक होती. एक पुस्तक विक्रेता म्हणाला, "आपल्या घरात व आजूबाजूला निष्काळजीपणे शिळ घालीत दुधाचा पुरवठा करणाऱ्या दूधवाल्यांने प्रत्येक शंभर दुधाच्या बाटलीमागे, एक दुधाची भेसळ बाटली देण्याची सवय होती हे उघड झालं, की प्रथम आपला त्यावर विश्वासच बसणार नाही. तसेच मि. वाईज यांच्याबद्दलच्या बातमीबाबत होते," मि. वाईज यांचे काही जुने सहकारी व मित्र हे त्यांना या घटनेनंतरही भेटावयास जात. यदाकदाचित कोणी हा बनावट दुर्मिळ पुस्तिकांचा विषय काढलाच तर त्यावेळी हस्तक्षेप करण्याच्या उद्देशाने मिसेस वाईज किंवा बक्सटन फोरमन यांचे चिरंजिव नेहमीच हजर असत. मि. वाईज यांनी नंतर टाईम्स लिटररी सप्लिमेंटला दोन अत्यंत केविलवाणी पत्रे लिहिली. त्या पत्रांचा वाचकाच्या मनावर काहीही परिणाम झाला नाही. तीच गोष्ट त्यांनी अनेक दैनिके आणि वृत्तपत्रे यांत दिलेल्या मुलाखतींची होती. यानंतर मात्र मि. वाईज हे निवृत्त झाले आणि या प्रकरणाबद्दल त्यांनी कायमचे मौन धरले. इ. स. १९३७ साली मि. वाईज यांना मृत्यू आला. त्यांच्या मृत्युबरोबर त्यांच्याबरोबर असलेली त्यांची गुपितेही गेली.

(३)

शिगाको येथील कोटयधीश मि. रेन (Wren) यांच्या दुर्मिळ ग्रंथाचा संग्रह इ. स. १९१८ साली टेक्सास विद्यापीठाच्या वाचनालयास भेट म्हणून प्राप्त झाला. मि. रेन यांच्या या ग्रंथसंग्रहातील बहुतेक पुस्तके मि. वाईज यांच्या सल्ल्यावरून व सहाय्याने विकत घेण्यात आली होती. मि. वाईज हे मि. रेन यांचे लंडनमधील प्रतिनिधी या नात्याने, अनेक वर्षे काम करीत होते. इ. स. १९३४ साली मि. वाईज प्रकरणाला जेव्हा प्रथम वाचा फुटली, तेव्हा त्या क्षेत्रातील संशोधकांचे विचार रेन ग्रंथ संग्रहाकडे वळले. याची दोन कारणे होती. एकतर रेन ग्रंथसंग्रहात मि. वाईज यांनी प्रसिद्ध केलेल्या सर्व बनावट दुर्मिळ पुस्तिकांचा संच उपलब्ध होता. तसेच मि. रेन. – मि. वाईज यांचा अनेक वर्षांचा पत्रव्यवहारही रेन ग्रंथसंग्रहात होता. रेन ग्रंथ संग्रहाच्या तत्कालीन ग्रंथपाल मिस फॅनी रॅचफोर्ड यांना अशी खात्री होती की या पत्रव्यवहारातून मि. वाईज यांच्या गुन्हेगारीवर अधिक प्रकाश पडेल. तो सर्वच पत्रव्यवहार इतका माहितीपूर्ण व उद्‌बोधक होता की सरतेशेवटी आल्फ्रेड स्नॉफ या प्रकाशन संस्थेने तो

पुस्तक रूपाने प्रसिद्ध केला. या पुस्तकाला मिस रॅंचफोर्ड यांचे प्रदीर्घ विवेचन व प्रस्तावना आहे. मिस रॅंचफोर्ड यांचा हा लेख, या ग्रंथाचे आणखी एक आकर्षण आहे.

मि. वाईज आणि यांच्या चलाखीला बळी पडलेले कोटयधीश मि. रेन, या दोघांच्यातील परस्पर संबंधावर या पत्रव्यवहाराने खूपच प्रकाश पडतो. शिवाय त्यात वाचकाला विस्मय-चकित करील अशी एक कथाही आढळते. मि. वाईज आणि मि. रेन यांची ही पत्रे मैत्रीच्या भावनेने ओसंडून वाहताना आढळतात. वर्षे गेली तसतशी ही भावनाही वरच्या पट्टीत गेली. आपले प्रतिनिधी मि. वाईज यांच्यावर मि. रेन यांचा पूर्ण विश्वास होता. लंडनमध्ये जेव्हा दुर्मिळ-ग्रंथ-पुस्तिका-हस्तलिखिते, यांचा खाजगी व जाहीर लिलाव होत असे तेव्हा मि. रेन यांचे प्रतिनिधी म्हणून मि. वाईज त्या ठिकाणी हजर राहात. मि. रेन यांना ज्या प्रकारचा ग्रंथ संग्रह उभारण्याची इच्छा होती ते लक्षात घेऊन मि. वाईज अनेक ग्रंथांची खरेदी करीत असत.

मि. रेन यांचे प्रतिनिधी या नात्याने मि. वाईज यांचे एका बाबतीतले वर्तन हे उद्वेगजनक व चीड आणणारे होते. हा प्रतिनिधी आपले या क्षेत्रातले ज्ञान व पांडित्य मि. रेन यांच्यासाठी वापरत होता हे खरे. त्या ज्ञानाचा पडदा वापरून आपण प्रसिद्ध केलेल्या बनावट दुर्मिळ पुस्तिकाही ते मि. रेन यांना विकत असत. फसवेगिरीचा धंदा करणारे जे कोणी बदमाश असतील, त्यांना मि. वाइज – मि. रेन पत्रव्यवहार हा आदर्श मार्गदर्शक आहे. त्याजरोबर अशा ठकांचे जे बळी ठरणारे साधे व सरळ बुद्धीचे लोक असतील त्यांना उपयुक्त असा धोक्याचा इशाराही त्या पत्रव्यवहाराकरवी मिळेल. मिस रॅंचफोर्ड यांनी संपादन केलेल्या पुस्तकातील पत्रव्यवहारातून मि. वाईज वापरत असलेल्या मार्गाचे ज्ञान आपणास होते. पद्धतशीरपणे हिशेब करून, केलेल्या चलाखीचा तो उत्तम नमुना आहे.

धंद्यासंबंधी लिहिलेल्या पत्रात मि. रेन यांना हवे असलेले एक विशिष्ट पुस्तक एरवी त्याला द्यावी लागली असती, त्यापेक्षा कमी किंमत देऊन खरेदी केल्याची बातमी मि. वाईज मि. रेनना कळवितात. हे लिहिल्यानंतर ते जणू जाता जाता आणखी एका गोष्टीचा उल्लेख करतात. एकोणिसाव्या शतकातील अतिशय दुर्मिळ अशा एका पुस्तिकेबद्दल आपण ऐकले आहे असे सांगतात. त्यानंतर लगेच ते लिहितात, त्या पुस्तिकेचा जो लेखक होता, त्याच्या एका वडिलधाऱ्या वारसाकडे त्या पुस्तिकेची प्रत असल्याचे आपणास कळले आहे. मि. रेन यांच्याकडे ही पुस्तिका नाही हे मि. वाईज यांना 'चांगले माहीत' असते. ते पुढे जाऊन असे लिहितात की आपण त्या पुस्तिकेबाबत लक्ष ठेवून राहू; व तसे वचनही देतात.

या पत्रानंतर काही महिने किंवा काही प्रसंगी अनेक वर्षे या पुस्तिकेबद्दल मि. वाईज पत्रात साधा उल्लेखही करीत नाहीत, मग पुन्हा एकदा धंद्यासंबंधी लिहिलेल्या पत्रात जाता जाता तो वडिलधारा नातेवाईक नुकताच मृत्यू पावला आहे हे जाहीर करतात. वर असेही कळवितात की त्या नातेवाईकांच्याकडे या ग्रंथसंग्रहाची व्यवस्था काय करण्यात येणार आहे याची चौकशी ते करतील. त्यानंतर पुन्हा काही महिने जातात. मग मि. वाईज आणखी काही माहिती देतात. कालांतराने मि. वाईज जाहीर करतात की मि. वाईज यांना महत्प्रयासाने त्या मृताचा ग्रंथसंग्रह पाहण्याची परवानगी मिळालेली असते. मि. रेन यांना हवी असलेली ती

अत्यंत दुर्मिळ पुस्तिका त्या ग्रंथसंग्रहात अजून तरी आहे. छापखान्यातून ती पुस्तिका नुकतीच बाहेर आली आहे अशा परिस्थितीत आहे. खरेदी करण्याच्या दृष्टीने अगदी उत्तम. ते पुढे असे लिहितात की ते रेन यांना वेळोवेळी त्या संबंधात खबर देत राहतील.

त्यानंतर आणखी काही दिवस जातात, हा ग्रंथ सूचीकारांचा राजपुत्र मग अशी घोषणा करतो की मि. रेन यांनी हवी असलेली पुस्तिका मिळविण्यात ते विजयी झाले आहेत. महत्प्रयासाने ही मिळविलेली पुस्तिका शिकागोकडे निघाली सुद्धा ! मि. रेनना या गोष्टीची कल्पना असते. मि. वाईज यांची ही जी पद्धत आहे, तिचा उपयोग त्यांनी वेळोवेळी केला होता. असे त्या पत्रव्यवहारावरून दिसून येते. या बाबतीत तरी भोळा असलेला हा अमेरिकन कोटयधीश या बनावट दुर्मिळ पुस्तिकेकरिता धनादेश पाठवितच असे. आपणा सर्वांनाच आता हे माहीत झाले आहे की मि. वाईज यांच्या कारखान्यात नुकताच तयार झालेला तो माल असे.

मि. वाईज मि. रेन पत्रव्यवहाराने कार्टर – पोलार्ड यांनी मि. वाईज यांच्या विरुद्ध जनतेच्या न्यायमंदिरात जो खटला उभा केला होता, त्याला अधिक बळकटी आली. एका मागून एक पुस्तिका मि. वाईज हे कशा विकून काढीत असत, हे या पत्रव्यवहारावरून सिद्ध होत होते; असे कार्टर व पोलार्ड यांचे म्हणणे होते. या बनावट दुर्मिळ पुस्तिका तयार करण्याची त्यांची जी पद्धत होती, त्याचा सर्वसाधारण आकृतीबंधही त्या पत्रव्यवहारावरून स्पष्ट झाला होता. एकतर रिचर्ड क्ले यांच्या छापखान्याबरोबर आपले जे घनिष्ट संबंध होते, त्याचा पुरेपूर फायदा मि. वाईज यांनी उठविला होता. हे करण्यास त्यांनी इ. स. १९०० च्या अगोदर किमान दहा वर्षे तरी सुरुवात केली असावी. या कालखंडात त्यांनी पन्नासहून अधिक वेगवेगळ्या पुस्तिका तयार करून घेण्यासाठी देखरेख केली होती. त्यांनी जाहीर केले होते त्याप्रमाणे प्रत्येक पुस्तिकेच्या वीस एवढ्या मर्यादित प्रती नव्हत्या.

प्रत्यक्षात या प्रतींचा आकडा चांगलाच मोठा होता. यानंतर, मि. वाईज यांनी जे संदर्भ ग्रंथ प्रमाण समजले जात असत, त्यात या तथाकथित दुर्मिळ पुस्तिकांच्या अस्तित्वाबद्दल पुरावा घुसवून देण्यास सुरुवात केली होती. काही वेळा, उदा. 'रिडिंग १८४७' ही पुस्तिकाही बनावट – दुर्मिळ पुस्तिका कोठच्या परिस्थितीत प्रकाशित झाली याबद्दलचा वृत्तांतही त्यांनी स्वत:च पेश केला होता. त्याचवेळी ग्रंथसंग्राहक आणि ग्रंथसूचीकार या दोन्हीही क्षेत्रात त्यांची जी संशयातीत अशी कीर्ती होती, त्याचाही लाभ त्यांनी उठविला. हे करीत असताना त्यांनी आपल्या समकालीन काही ग्रंथसंग्राहकांना काही प्रती भेट दिल्या, त्याजबरोबर काही विकतही दिल्या होत्या. असे करून या बनावट – दुर्मिळ पुस्तिका या अस्सल दुर्मिळ पुस्तिका आहेत या समजुतीस दुजोरा मिळेल अशी व्यवस्था केली.

ग्रंथ संग्राहकांना या पुस्तिका भेट मिळाल्या, त्या सुद्धा मि. वाईज सारख्या विख्यात व्यक्तीकडून. या कारणाने या पुस्तिकांचा चांगलाच बोलबाला व्हावा, यासाठी, हे सारेच ग्रंथ संग्राहक खास लक्ष घालीत असत. अशा प्रकारे या बनावट दुर्मिळ पुस्तिका संशयातीपणे, अस्सल दुर्मिळ पुस्तिका आहेत, अशी त्या पुस्तिकांची कीर्ती सुस्थापित झाल्यानंतर, मि.

वाईज यांनी या बनावट पुस्तिका, हळूहळू दुर्मिळ ग्रंथ बाजारपेठेत सोडण्यास सुरुवात केली, हे करण्यासाठी त्यांचे जे ग्रंथ संग्राहकांशी मैत्रीचे संबंध होते त्याचा उपयोग जरूर झाला. काहीवेळा त्यांच्या कचेरीत एकेकाळी प्यून म्हणून काम करणाऱ्या गोरफीनची मदत त्यांनी घेतली. मि. वाईज यांनी गोरफीनना, अनेक वेगवेगळ्या पुस्तिकांच्या अनेक प्रती हा शिल्लक राहिलेला माल आहे असे सांगून विकल्या होत्या.

असे जरी होते तरी मि. वाईज यांनी स्वतःच्या वेळप्रसंगी वापरण्यासाठी आपल्याकडे, त्या सर्वच पुस्तिकांच्या काही प्रती ठेवून घेतल्या होत्या. कार्टर – पोलार्ड यांच्या सनसनाटी वृत्तांतानंतर, एका अमेरिकन पुस्तक विक्रेत्याने, मि. वाईज, यांच्या ग्रंथसंग्रहास भेट दिली. ह्या भेटीचा वृत्तांत त्यांनी पुढीलप्रमाणे सादर केला होता. हा अमेरिकन पुस्तक विक्रेता, आणि मि. वाईज यांच्या संभाषणात, एका ग्रंथाचा उल्लेख आला. हा ग्रंथ प्रत्यक्षच चाळून पाहण्यासाठी मि. वाईज यांनी एक विशिष्ट खण उघडून त्यातून तो ग्रंथ बाहेर काढण्याची विनंती केली. या अमेरिकन पुस्तक विक्रेत्याने, चुकून दुसराच खण उघडला. त्यात त्याला, त्या बनावट 'रिडिंग १८४७' या पुस्तिकेच्या छापलेल्या पानांची थप्पीच आढळली होती.

मि. वाईज हे दोषी होते, हे सिद्ध झालेले आहे. आजकाल त्याबद्दल कोणी संशयहा व्यक्त करीत नाही. परंतु एक प्रश्न तो तसा फारच महत्त्वाचा प्रश्न आहे आजवर अनुत्तरित राहिलेला आहे. मि. वाईज हे सर्वस्वी एकट्यानेच ही गुन्हेगारी करीत होते यावर आपण विश्वास ठेवावयाचा का? मि. वाईज अनेक ग्रंथसंग्राहकांचे मित्र होते. ते सारेच दुर्मिळ ग्रंथ व्यवहाराच्या क्षेत्रातले तज्ज्ञ होते. या ग्रंथसंग्राहकांना मि. वाईज यांनी दिलेल्या त्या बनावट दुर्मिळ पुस्तिका हव्याहव्याशा वाटत होत्या. त्यातल्या एकाही ग्रंथसंग्राहकाला मि. वाईज यांचा डाव काय आहे हे जाणता आले नाही का? मि. वाईज हा साराच बनाव इतक्या कौशल्याने हाताळीत होते अथवा त्यांचा त्या क्षेत्रातील दबदबा एवढा प्रचंड होता की, कोणाच्याही मनात बारीकसा संशय आला तर तो तेथल्या तेथेच दाबला जात असे का? किंवा अगदी दुसऱ्या टोकाची शक्यता तपासून पाहूया. या मित्रांपैकी अनेकजण या बनावात मि. वाईज यांच्याबरोबर सामिल झाले होते का?

कार्टर आणि पोलार्ड यांच्या ग्रंथातल्या दोन परिच्छेदांनी मोठी खळबळ उडवून दिली होती. मि. वाईज यांच्या दोन प्रख्यात समकालिनांचा – सर एडमंड गोस्स आणि हॅरा बक्सअन फोरमन – त्यात उल्लेख होता. म्हणून या दोघांबद्दल संशय घेतला जाऊ लागला. इ. स. १९३४ पासून हे दोघे दोषी आहेत की निर्दोषी आहेत याबद्दल वादविवाद चालू झाला होता. इ. स. १९४४ साली मि. वाईज – मि. रेन हा पत्रव्यवहार प्रसिद्ध झाल्यानंतर त्या पत्रव्यवहाराने नव्या इंधनाचा पुरवठा करून त्याची प्रखरता वाढवली.

आपण सर एडमंड गोस्स हे प्रथम विचारात घेऊ या. 'रिडिंग १८४७' या पुस्तिकेतली सुनीते छापण्यासंबधीची जी कथा आहे ती सर गोस्स यांनी प्रथम सांगितली हे आपण पाहिले आहेच. ती एका मित्राने आपणास सांगितली असे त्यांनी लिहिले पण त्या मित्राने नाव मात्र घेतले नाही. कार्टर व पोलार्ड यांच्या वृतांतानुसार हा मित्र जवळ जवळ निश्चितपणे

मि. वाईजच होते. ही कथा प्रचलित करण्यामागे मि. वाईज यांचा एकच हेतू होता. मि. वाईज यांना आपली बनावट ब्राउनिंग पुस्तिका ही अस्सल आहे यासाठी कोणा अधिकारी व्यक्तीचे लेखी शिफारसपत्र हवे होते. मि. वाईज यांचा हा जो हेतू होता, तो सर गोस्स यांना अजिबात माहीत नव्हता असे मानता येईल का? तसे जर असेल, तर त्यांनी प्रख्यात न्याहरीच्या प्रसंगाची तारीख अगदी गुपचुपपणे चांगली दोन वर्षे मागे नेऊन का ठेवली होती? हे असे त्यांनी करणेही मि. वाईज यांना हवेच होते याचे कारण मग त्यांची बनावट दुर्मिळ पुस्तिका ही अस्सल ठरणार होती.

सर गोस्स हे इ. स. १९२८ साली मृत्यू पावले. त्यांच्या मरणाअगोदर तो प्रख्यात न्याहरीच्या वेळचा प्रसंग, त्या दिवशी व त्या ठिकाणी घडलाच नव्हता, असा ज्याबद्दल कसलाही संशय नव्हता असा पुरावा उपलब्ध आहे याजकडे सर गोस्स यांचे लक्ष वेधण्यात आले होते. त्यावेळीही आपण सांगितलेली घटना त्याच ठिकाणी त्याच दिवशी त्याच वेळी घडली हे पुन्हा एकदा त्यांनी ठासून सांगितले ते म्हणाले, "मी त्या गोष्टीबद्दल खुद्द कवी ब्राउनिंग यांच्याकडूनच खात्री करून घेतली होती. मी त्यांच्याजवळ या गोष्टीसंबधात बोलत होतो, तेव्हा मी टिपणं घेत आहे हे कवी ब्राउनिंग यांनी पाहिलं होतं" परंतु येथे लक्षात घेण्याजोगी एक गोष्ट आहे. ती म्हणजे हे संभाषण नक्की कोठच्या वर्षी झाले हे ते सांगतच नाहीत.

साधारण अमुक वर्षाच्या आसपास हे झाले असावे असे सर गोस्स सांगतात. 'लक्षात घेण्याजोगी गोष्ट' हा शब्दप्रयोग जाणून-बुजून करण्यात आलेला आहे. सर गोस्स हे ढिसाळ संशोधनासाठी चांगलेच कुप्रसिद्ध होते. परंतु या प्रकारचे संशोधक म्हणून मिळालेल्या कीर्तीमुळेच त्यांना या गुन्ह्यातून मुक्ती मिळणार होती. त्यांचे चरित्र याबाबतीत तरी स्वच्छ आहे असे शिफारसपत्र त्यांना मिळेल. तूर्त मि. वाईज प्रकरण क्षणभर नजरेआड करूया. दुसऱ्या अनेक प्रकरणी सर गोस्स तपशीलात जाऊन काळजीपूर्वक संशोधन करणारे गृहस्थ नाहीत हे सर्वास ज्ञात होते. त्यांनी अनेक वाङ्मयीन इतिहास व चरित्रे लिहिलेली आहेत. ते ग्रंथ वाचनीय आहेत. कुशाग्रतेने केलेल्या साहित्य समीक्षेची चमकही त्यात मधून मधून आढळते. हे सारे जरी खरे असले तरी त्या ग्रंथात नोंदविलेल्या घटनांबाबत ते कमालीचे निष्काळजी असत. त्या घटनांची सत्यता पडताळून पाहाण्याचे त्यांच्या गावीही नसे. मि. वाईज यांच्या बनावट दुर्मिळ पुस्तिकांतली अत्यंत महत्त्वाची पुस्तिका 'रिडिंग १८४७' या पुस्तिकेशी सर गोस्स यांचा संबध आला म्हणून लोक त्यांच्याकडे संशयाने पाहातात. एरवी या न्याहरीच्या प्रसंगाच्या बाबतीत जागा व वर्ष याबद्दल झालेली चूक, त्यांच्या सर्वच ग्रंथातल्या अशाच प्रकारच्या शेकडो चुकातली एक चूक आहे असे समजले गेले असते. याशिवाय सर गोस्स यांच्या बाजूचा पुरावा म्हणून आणखी एक गोष्ट आहे. सर गोस्स यांनी ही गोष्ट सांगण्याअगोदर निदान एका पुस्तकात तरी ही गोष्ट तशीच ग्रथित केलेली होती.

थोडक्यात मि. वाईज यांनी फसवेगिरीचा उद्योग चालू करण्याअगोदर अनेक वर्षे पुस्तक प्रसिद्ध झालेले असल्याकारणाने, या गोष्टीचा व फसवेगिरीचा संबंध असलाच पाहिजे असे

म्हणता येणार नाही. म्हणूनच सर गोस्स यांना झुकते माप देऊन असे म्हणता येईल की सर गोस्स जुन्याच चुकीच्या माहितीचा पुनरुच्चार करीत होते. ही चुकीची माहिती आणि तिचा 'रिडिंग १८४७' या पुस्तिकेशी असलेला संबंध हा केवळ एक अपघात होता. काही वर्षापूर्वी असेही सुचविण्यात आले होते की, मि. वाईज यांनी आपल्या मित्राची ही निष्पाप चूक, आपल्या कृतीला पाठिंबा देण्यासाठी ईश्वरी इच्छेने सर गोस्स यांनी केली असे मि. वाईज यांना वाटत होते.

सर गोस्स यांच्या विरुद्धचा 'खटला' मिस रॅचफोर्ड बाईंनी फार जोरदारपणे चालविला होता. त्यांनी वरील छेदकातील पुराव्याव्यतिरिक्त फक्त एकच गोष्ट पुरावा म्हणून दाखल केली होती. मि. रेन यांच्या ग्रंथसंग्रहात दाखल करण्यासाठी मि. वाईज यांनी, कवी ब्राउनिंग यांच्या 'दि रनअवे स्लेव' या साहित्यकृतीची मुद्रित संशोधकाकडे गेलेली छापील प्रत मिळविली होती. या बनावट प्रतीत एका पानावर एक दुरुस्ती होती. MANGOES हा एकच शब्द, त्या शब्दाचे स्पेलिंग चुकले होते, म्हणून समासात तो दुरुस्त करून लिहिलेला होता.

मिस रॅचफोर्ड यांची खात्री होती की तो शब्द सर गोस्स यांच्या हस्ताक्षरात होता. तज्ज्ञाकडून आपल्या या मतास दुजोरा मिळेल या हेतूने ते पान त्यांनी टेक्सास डिपार्टमेंट ऑफ पब्लिक सेफ्टी या खात्याकडे तपासणीसाठी पाठविले. या संस्थेत काम करणाऱ्या पदाधिकाऱ्यांनी एकच शब्द तपासणीकरता आला आहे, हा पुरावा मत देण्याच्या दृष्टीने पुरेसा नाही, हे कारण सांगून मत देण्यास नकार दिला. त्याचबरोबर हेही नमूद केले पाहिजे की एकंदर हस्ताक्षर तज्ज्ञांपैकी फारच थोड्या तज्ज्ञांचे मिस रॅचफोर्ड यांच्याइतके ठाम मत होते. त्यांच्या मते मि. वाईज यांच्या गुन्ह्यात सर गोस्स सहभागी नव्हते. असलेच तर फारतर आपण करीत असलेल्या गुन्ह्याची अजिबात कल्पना नसलेला भोळसट साथीदार, एवढाच त्यांचा त्यात सहभाग होता.

मिस रॅचफोर्ड यांनी हॅरी बुक्सटन फोरमन यांच्याबद्दलही संशय व्यक्त केलेला आहे. मि. वाईज यांच्या बनावट दुर्मिळ पुस्तिकांची ज्यांनी तपासणी केली होती, ते सर्वजण मिस रॅचफोर्ड यांच्या या मताशी सहमत होते. कार्टर व पोलार्ड यांना फोरमन यांच्याविषयी एक गोष्ट लक्षात आली होती 'रिडिंग १८४७' या पुस्तिकेबद्दल. सर गोस्स यांची 'ब्राउनिंग' कथा छापून आल्यानंतर दोन वर्षांनी मि. फोरमन यांनी त्या कथेबद्दलचा संशय अगदी हळुवारपणे व्यक्त केला होता, "मनोहारी चित्रण करणाऱ्या लिखाणाच्या तीन मोहक पानात, एका घटनेच्या तरंगत असलेल्या परंपरा आपणास एकत्रितपणे वाचावयास मिळतात, आणि त्यात कवी ब्राउनिंग त्यांच्या दैनंदिन आयुष्याची नोंद ठेवणारा तल्लख तवारिखकार या दोघांच्या घनिष्ट मैत्रीचा झगमगाट त्यात झोकून दिलेला आहे याची प्रचितीही येते. अर्थात मि. गोस्स यांची अशी अपेक्षा नाही की आपण हे सारेच गंभीरपणे अथवा अगदी शब्दशः घ्यावे. मि. फोरमन यांनी 'परंपरा' हा शब्द तसा दुष्टाव्यानेच निवडला असला पाहिजे. याचे कारण त्यांनी आपल्या लेखाचा समारोप करताना अशी आशा व्यक्त केली होती की मि. गोस्स हे आपल्या त्या गूढ मित्राचे नाव जाहीर करतील. या मित्राकडून सर गोस्स यांना मिस मिटफोर्ड

आणि रिडिंग येथे छापून केलेली 'रिडिंग १८४७' ही पुस्तिका यांसंबधीची कथा कळली होती !

या वरील छेदकातले मि. फोरमन यांचे लिहिणे हे तसे बुचकळ्यात टाकणारे आहे. याचे कारण 'रिडिंग १८४७' या पुस्तिकेविषयी त्यांना जर संशय होता तर त्यानी सत्य शोधून काढण्याचे प्रयत्न का बरे चालू ठेवले नाहीत? मि. फोरमन यांच्या या लेखानंतर, प्रसिद्ध झालेल्या त्यांच्या लिखाणात 'रिडिंग १८४७' या पुस्तिकेचा उल्लेख पुन्हा कधीही आलेला नाही. परंतु त्यांच्याकडे या बनावट दुर्मिळ पुस्तिकांच्यापैकी एका पुस्तिकेची एकच प्रत नव्हती. उलट या बनावट दुर्मिळ पुस्तिकेच्या ज्या बहिणी शोभतील अशा दुसऱ्या तिसाहून अधिक वेगवेगळ्या बनावट दुर्मिळ पुस्तिका त्यांच्या संग्रही होत्या. इ. स. १९३४ साली कार्टर व पोलार्ड यांनी, डॉ. बेन्रेट यांच्याकडे असलेली ब्राउनिंग सुनीताच्या खजिन्याची मि. वाईज यांनी सांगितलेली कथा किती तद्दन खोटी आहे हे सिद्ध केले होते.

यानंतर लगेच बुक्सटन फोरमन यांना मध्यवर्ती व्यक्ती करून, त्यांच्याभोवती एक नवी बनावट कथा मि. वाईज यांनी अगदी घाईघाईने तयार केली होती. मि. फोरमन यांच्या मुलाने या प्रसंगी एक पत्रक काढून मि. वाईज याना पाठिंबा व्यक्त केला होता. परंतु हा पाठिंबा भक्कम नव्हता तसा बोटचेपाच होता. त्यात अनेक तथापि, पण, परंतु यदाकदाचित् होते. आपण काय करीत आहोत याची मि. फोरमन यांच्या चिरंजीवास चांगलीच कल्पना होती. मि. वाईज यांनी आपला खोटेपणा झाकण्यासाठी तीर्थरूप फोरमन हे त्या खोटेपणाचे व बदमाशीचे स्वामी आहेत हे सांगण्यासाठी घाईघाईने का धडपड केली? तीर्थरूप फोरमन हे इ. स. १९१७ सालीच मृत्यू पावले होते !

थोडक्यात तीर्थरूप फोरमन यांच्याकडून मि. वाईज यांच्या विधानांचा प्रतिवाद केला जाणार नाही, वा त्याला प्रत्युत्तरही मिळणार नाही याची अगदी पक्की खात्री होती, म्हणून मि. वाईज यांनी ही नवी कथा प्रसृत केली असेल का? अथवा तीर्थरूप फोरमन यांचे हातही स्वच्छ नाहीत हे मि. वाईज यांना ठाऊक होते; म्हणून त्यानी चिरंजीव फोरमन यांच्यावर दबाब टाकला होता का? 'रिडिंग १८४७' या बनावट दुर्मिळ पुस्तिकेसंबधी लिहिताना तीर्थरूप फोरमन, उपरोधाने लिहीत होते हे उघड आहे. 'रिडिंग १८४७' या पुस्तिके–संदर्भात त्यांनी अनेक टोमणेही मारले आहेत. त्यावरून असे सूचित होते की, मि. वाईज यांची इच्छा होती, त्यापेक्षा मि. वाईज यांच्या गुन्हेगारी कृत्यांबद्दल निदान तीर्थरूप फोरमन यांना खूपच अधिक माहिती होती.

एखादा गैरलागू असा भलताच मुद्दा उपस्थित करून मि. वाईज आपणास हुलकावणी देतील अशी कार्टर व पोलार्ड यांना धास्ती वाटत होती. असे होते म्हणूनच त्यांना या गुन्हेगारीत तीर्थरूप फोरमन यांचा अंतर्भाव किती होता याची अटकळ असली, तरी त्यांनी त्याचा पाठपुरावा केला नसावा. ते काहीही असो, या दोघांनाही अधिक संशोधनासाठी एक मुद्दा उपलब्ध होता. त्याकडे दुर्लक्ष करण्याची चूक त्यांच्याकडून झाली. पण ते ज्याचा शोध घेत होते ते लक्षात घेता, ही चूक त्यांना सर्वस्वी माफ आहे. कार्टर व पोलार्ड या दोघांनी

आपल्या 'इनक्वायरी' या ग्रंथात, निकोल आणि वाईज यांच्या लिटररी ॲनेकडोटस् ऑफ दि नाईटीन्थ सेंचुरी (एकोणिसाच्या शतकातील वाङ्मय, साहित्यातील गजाली) या पुस्तकात जो एक लेख होता त्याचा उल्लेख केलेला आहे. या लेखाचे नाव आहे, 'दि बिल्डिंग ऑफ दी आयरिश 'Idylls' या लेखात अशी काही विधाने होती की त्यामुळे राजकवी टेनिसन यांच्या ज्या काही बनावट दुर्मिळ पुस्तिका तयार करण्यात आल्या होत्या, त्या अस्सल आहेत हे वाटण्यास बळकटी येत होती. हा लेख निनावी होता. कार्टर व पोलार्ड यांनी असे गृहित धरले की हा लेख मि. वाईज यांनीच लिहिलेला आहे. हे त्यांनी गृहित धरण्याचे कारण, मि. वाईज हे त्या ग्रंथाचे एक संपादक होते. ते काहीही असो, अशा रीतीने कार्टर व पोलार्ड यांना बनावट दुर्मिळ पुस्तिका व मि. वाईज यांच्याबाबत आणखी एक मुद्दा समजलेला होता. यानंतर झालेल्या संशोधनाने ही त्यांची समजूत चुकीची होती असे सिद्ध केले होते.

इ. स. १९३४ साली मि. वाईज यांनी घातलेला सभ्यपणाचा मुखवटा कार्टर व पोलार्ड या दोघानी टरकावल्यानंतर,न्यूयॉर्क शहरातील दुर्मिळ ग्रंथाचे एक विक्रेते डॉ. गॅब्रिएल वेल्स यांनी एक छोटी पुस्तिका लिहून मि. वाईज यांचा बचाव करण्याचा निरर्थक प्रयत्न केला. त्यांनी आपल्या लेखात असे सांगितले की टेनिसनच्या 'आयडिल्लस' याबद्दलचा लेख मि. वाईज यांनी लिहिलेला नसून तो मि. फोरमन यांनी लिहिलेला आहे. त्यांना ही खात्री होती याचे कारण त्या लेखाचे हस्तलिखित, त्याची मुद्रित संशोधकाकडे गेलेली छापील प्रत आणि त्यात त्यानंतर केलेल्या सुधारणा, हे सारे साहित्य. इ. स. १९२० साली मि. फोरमन यांचा ग्रंथसंग्रह व इतर साहित्याचा लिलाव झाला तेव्हा त्यांनी ते खरेदी केले होते.

मि. कार्ल एच. पफोरझायमर यांनी हा मुद्दा या ठिकाणी उचलला. मि. पफोरझायमर हे अमेरिकेतले तत्कालीन एक अतिशय नामवंत ग्रंथसंग्राहक. त्यांनी आपणास मि. वेल्स यांनी ज्या हस्तलिखिताबद्दल व मुद्रिताविषयी लिहिले होते,ती आठवत असल्याचे सांगितले. त्यांनी असे म्हटले की, ते लिहीत होते, त्यावेळी त्या सर्व गोष्टी त्यांच्याच संग्रहात होत्या, त्यांनी स्वत: त्याची तपासणी केल्यानंतर त्यांनी ते सर्व साहित्य मिस रॅचफोर्ड आणि मि. कार्टर या दोघांना दाखविल्यानंतर, त्या दोघांवर त्या साहित्याचा प्रभाव पडला हे ओघानेच आले. परंतु त्या पुडक्यात जे काही पाहिले होते व वाचले होते, ते कोणासही ते सांगणार नाही असे वचन त्या दोघांनी दिलेले होते.

पफोरझायमर यांच्याकडे जो पुरावा होता तो त्यांनी प्रसिद्ध करण्यास संमती द्यावी, आपल्याकडे जे साहित्य आहे ते त्यांनी प्रसिद्ध करावे यासाठी त्यांचे मन वळविण्यासाठी मिस रॅचफोर्ड आणि या विषयाबद्दल आस्था असलेल्या दुसऱ्या अनेक संशोधकांना तब्बल दहा वर्षे लागली. सरतेशेवटी ते सारे साहित्य इ. स. १९४९ च्या अखेरीस 'बीटवीन दि लाईन्स' या नावाच्या एका छोटेखानी ग्रंथरूपाने प्रसिद्ध करण्यात आले. हा ग्रंथ युनिव्हर्सिटी ऑफ टेक्सासने प्रसिद्ध केला होता. मिस. रॅचफोर्ड यांनी त्याचे संपादन केले होते. आता खरे काय ते एकदाचे बाहेर आले. या छोटेखानी ग्रंथाने महाविख्यात मि. हॅरी बुक्सटन फोरमन-

ग्रंथसंग्राहक, ग्रंथसूचीकार आणि संपादक यांची मि. वाईज यांच्या गुन्हेगारीच्या साहसात किमानपक्षी सल्लागाराची तरी भूमिका होती असे सिद्ध करून दाखविले होते.

इ. स. १८९६ साली वृत्तपत्रात प्रसिद्धीस देण्यासाठी 'दि बिल्डींग ऑफ दि आयडिल्लस' 'The Building of the Idylls' हा लेख मि. फोरमन तयार करीत होते. त्यावेळी त्यांच्यात आणि मि. वाईज यांच्या दरम्यान या लेखाच्या छापील मुद्रितांची सारखी ये-जा चालू होती. छापलेल्या मजकूरांच्या दोन ओळींमधल्या जागेत, त्या कागदाच्या समासात, आणि वेळप्रसंगी वेगळ्या चिठोऱ्यावर, ते दोघेही आपली टीका-टिप्पणी वारंवार लिहीत असत. पफोरझायमर यांच्याकडे जे फोरमन कागदपत्रांचे पाकीट होते त्यातील कागदपत्रात मि. वाईज, मि. फोरमन यांच्यातील एक, लिखित संवाद बंदिस्त झाला होता. मि. रॅचफोर्ड संपादित छोटेखानी ग्रंथात या कागदपत्रांची जशीच्या तशी नक्कल (Facsimile) छापून प्रसिद्ध करण्यात आलेली आहे.

मि. पफोरझायमर यांच्याकडे असलेल्या या फोरमन पाकिटात सर्वात जास्त लक्ष वेधून घेईल असे एक वाक्य होते. दोन ओळींच्या मध्ये जी टिपणे केली जात होती, त्यात ते आहे. या दोघात या टिपणाद्वारे जो वाद चालू होता, त्याने जेव्हा उग्र स्वरूप धारण केले, त्यावेळी लिहिलेले ते वाक्य होते. हा वाद एकाच गोष्टीबाबत होता. मि. वाईज यांनी एक दुर्मिळ पुस्तिका छापून तयार केली होती. त्या संबधात त्यांनी या पुस्तिकेच्या 'थोड्या प्रती' उपलब्ध आहेत असा शब्दप्रयोग जाणून-बुजून केला होता. हे असे करणे नितीला धरून आहे का? याबद्दलचा तो वाद होता. ही दुर्मिळ पुस्तिका बनावट नव्हती. ती एका दुर्मिळ पुस्तिकेची जशीच्या तशी नक्कल प्रसिद्ध झालेली पुस्तिका होती. या पुस्तिकेची नक्कल आवृत्ती आपण छापून प्रसिद्ध केलेली आहे असे मि. वाईज जाहीरपणे सांगत होते.

मि. फोरमन हे आपण जणू देवदूतांच्या बाजूचे आहोत असा आव आणून तक्रार करीत होते, व आपला निषेध नोंदवित होते. मि. वाईज हे लोकांना, समजा दहा प्रती छापल्या आहेत असे जेव्हा सांगत होते. तेव्हा प्रत्यक्षात त्यांनी तीस प्रती छापलेल्या असत. मि. फोरमन यांची तक्रार व निषेध या संबंधात होता. मि. वाईज यांनी उत्तर दिले. "अगदी बरोबर आणि आम्ही 'लास्ट टुर्नामेंट' ही पुस्तिका इ. स. १८९६ साली छापली आणि ती प्रत्यक्षात इ. स. १८७१ साली छापली गेली आहे असं कोणासही वाटावं असा आमचा हेतू होता" कार्टर व पोलार्ड या दोघांनी 'लास्ट टुर्नामेंट' ही पुस्तिका देखील बनावट पुस्तिका आहे हे सिद्ध केले होते.

मि. वाईज यांनी आपण गुन्हेगार आहोत याची कबुली या वाक्याकरवी दिलेली आहे. त्यांच्याविरुद्ध प्रत्यक्ष असा जो पुरावा उपलब्ध आहे, तो तेवढे एक वाक्यच. परंतु हे एकच वाक्य मि. वाईज यांचा पार निकाल लावणारे होते. कार्टर व पोलार्ड तोवर अंधारात असलेल्या गोष्टीचा तपास लावण्यासाठी महिनोन् महिने खपत होते. त्याची उकल मि. वाईज यांच्या या वाक्याने केली होती. त्यांचा गुन्हा त्या वाक्याकरवी अगदी निर्विवादपणे चव्हाट्यावर आला होता. परंतु त्या वाक्यातून आणखी एक गोष्ट सिद्ध झाली होती. ती

म्हणजे मि. वाईज यांचे काय उद्योग आहेत याची मि. बुक्सटन फोरमन यांना पुरेपूर कल्पना होती. मि. वाईज दुर्मिळ पुस्तके-पुस्तिका यांच्या जशाच्या तशा नक्कला करून, त्या केवळ प्रसिद्ध करीत नसत.

प्रत्यक्षात, त्या पुस्तिकेच्या / पुस्तकाच्या किती प्रती छापून घेऊन प्रसिद्ध केल्याचे ते सांगत, त्यापेक्षा कितीतरी अधिक प्रती त्यांनी छापून घेतलेल्या असत. शिवाय सरळ सरळ बनावट दुर्मिळ पुस्तिकाही छापून घेत व विकावयास काढीत होते. हे सारे त्या वाक्यात अनुस्युत आहे. या वाक्यात 'आपण' या सर्वनामाचा वापर आहे. यावरून मि. फोरमन हेही या बनावट दुर्मिळ पुस्तिकांच्या उत्पादन धंद्यात एक भागीदार होते हे सूचित होते. आता या पुस्तिकेचे उत्पादन झाल्यानंतर मग त्यांचा सहभाग चालू होत होता, व तो सहभाग तेवढ्याच पुरता मर्यादित होता की ते उत्पादनात आरंभापासूनच सहभागी होते, हे अजूनही अनिश्चित आहे. मि. वाईज यांच्या वर्तुळात जे कोणी होते, त्यातल्या कोणावरच मिस. रॅचफोर्ड बाईंचा विश्वास नाही. परंतु मिस. रॅचफोर्ड बाईंनी फसवेगिरीसाठी खटला केला असता, तर मि. वाईज व मि. फोरमन यांची त्या गुन्हात सारखीच जबाबदारी आहे असे सांगून त्या दोघांनाही त्यांनी प्रतिवादी केले असते. अर्थात याबरोबरच त्या दोघांना जो बहुमान व हक्क प्राप्त होणार होते, ते मिस रॅचफोर्ड यांनी नाकारले नसते.

मि. वाईज यांच्या बनावट दुर्मिळ पुस्तिका उत्पादनाची जी कथा आहे ती सध्यातरी या ठिकाणीच थांबलेली आहे. त्यात आणखी माहितीची भर अजून तरी पडलेली नाही. ग्रंथसूची हा व्यवसाय सर्वसामान्यपणे चांगली प्रतिष्ठा असलेला व्यवसाय आहे. परंतु मि. वाईज यांच्या उदाहरणावरून या व्यवसायातही एक काळी बाजू आहे हे प्रकाशात आले. ही वस्तुस्थिती काहीवेळा कितीही अप्रतिष्ठा दर्शविणारी असली, तरी तिचा स्वीकार करणे भागच आहे. हे असे असले तरी ज्या व्यक्तीला ग्रंथसूची या शास्त्राबद्दल आस्था व जवळीक असेल, त्याला या सर्वच प्रकरणापासून खूप घेण्यासारखे आहे. तोच त्या व्यक्तीचा आनंदाचा भाग. मि. वाईज हे कीर्तिशिखरावर असताना ते एकाएकी दुष्कीर्तीच्या कर्दमात लोटले गेले.

हेच या घटनेचे सार आहे खरे म्हणजे मि. थॉमस जे. वाईज यांची कथा ही एक शोकांतिका आहे. इ. स. १९३४ साली मि. वाईज यांची गुन्हेगारी जगासमोर आली. परंतु त्या अगोदर ग्रंथसूची हे जे त्यांचे 'राखीव' क्षेत्र होते, त्यात त्यांच्या हुकमतीला कोणीही आव्हान दिले नसते इतका त्यांचा त्या क्षेत्रात दरारा होता. मि. वाईज यांच्या या आपल्या 'राखीव' क्षेत्रातील प्रजाजनांना त्यांचा शब्द हा अखेरचा शब्द होता. तत्कालीन विद्वद्जगतातील सर्वांच्या दृष्टीने त्यांचा ग्रंथसंग्रह हा इतरांच्या असूयेचा आणि अगतिकता निर्माण करणारा विषय होता. परंतु या त्यांच्या प्रदीर्घ संशोधनाचे फलित ज्या दिवशी प्रकाशात आणले गेले, त्या दिवसापासून मि. वाईज यांची प्रतिष्ठा आकुंचन पावली आणि ते एक सर्वसामान्य गुन्हेगार ठरले.

कोणत्या शोकजनक अशा चुकीमुळे त्यांनी आपणावर हे संकट ओढवून घेतले या

संबधी जरूर तपास घेता येईल. इ. स. १९३४ सालपर्यंत मि. वाईज यांच्या प्रसिद्धीवर एकही बारकासा सुद्धा डाग नव्हता. याचे कारण त्यांच्या विरुद्ध संशय निर्माण करील असे काही जाहीर झालेच नव्हते. त्यांच्याशी ज्या कोणाचा जुजबी संबध येई, त्यांना त्यांचा स्पष्टवक्तेपणा हा उर्मटपणाकडे वळणारा आहे असे वाटे. .

त्यांचे वागणे काहीसे एखाद्या न्यायाधिशाला शोभेल असे भासे. त्यांची विद्वता हा ठोकळेबाज विचार प्रदर्शित करण्याकडे झुकणारी होती. पण ती विद्वता चांगलीच विस्तृत नेमकी आणि तिच्यात काहीही खोड काढता येणार नाही,या पातळीवरची होती, हे जगन्मान्य होते. त्यांच्या धंद्यात त्यांची जी पत होती, तीही वादातीत होती. त्यांचे खाजगी जीवन हे एकसुरी असावे. तरीही त्याबद्दल लोकापवाद नव्हते. त्यांनी पन्नासाहून अधिक बनावट दुर्मिळ पुस्तिका छापून तयार केल्या; त्याही अनेक प्रतींच्या आवृत्तीत. हे सारे त्यांनी दहा वर्षाहून थोड्या अधिक काळात केले. पुढची तीस वर्षे ते दुर्मिळ ग्रंथ बाजारपेठेत या प्रतींची विक्री करण्याच्या उद्योगात होते. त्यांनी फसवेगिरी करण्याच्या आयुष्याचा आरंभ का केला?

याची कारणे अज्ञातच आहेत. आपणास त्याविषयी फक्त अंदाज बांधता येतात. तथापि त्या मानाने स्वीकारार्ह असे एक स्पष्टीकरण आहे. एरवी सभ्य व अत्यंत गुणी अशी अनेक माणसे वाचनालयातून पुस्तकांची चोरी करताना आढळतात. ही अशी पुस्तके चोरी करण्याचा रोगच त्यांना झालेला असतो. या रोगाला काही वेळा नैतिक अशा गुंतागुंतीची जोड मिळते. मि. वाईज यांना तासल्याच या पुस्तकचोरी रोगाने ग्रासले होते. मि. वाईज यांचा जन्म एका फारच गरीब कुटुंबात झाला होता. थोडक्यात त्यांच्या बालपणीचा काळ तसा समाधानकारक होता असे नाही. परंतु दुर्मिळ पुस्तकांचा ग्रंथसंग्रह उभा करण्याची महत्त्वाकांक्षा बाळगून एकदा तिचा ध्यास घेतल्यानंतर त्यांना हे गरिबीचे दु:ख तितकेसे जाणवेनासे झाले. मग ती एक सहन होण्याजोगी गैरसोय आहे असे स्वरूप त्याला आले होते.

ते एका सुगंधी तेले विकण्याऱ्या कंपनीत नोकरीला होते. याचा उल्लेख यापूर्वी येऊन गेला आहे. त्याना तेथे पगार तसा बेताचाच होता. मि. वाईज यांना जी पुस्तके विकत घेण्याचा ध्यास व उत्कंठा होती, ती पुस्तके कधी विकत घेण्याची आशा त्यांना बाळगता आली नसती. या नोकरीत असतानाच त्यांनी दुर्मिळ पुस्तकांची जशीच्या तशी नक्कल करून ती छापण्याच्या व्यवसायास सुरुवात केली. ती सुद्धा कवी ब्राउनिंग आणि कवी शेले यांच्या स्मरणार्थ स्थापन झालेल्या संस्थांच्या कामात सहभागी झाल्यानंतर. या नव्या व्यवसायामुळे अनेक शक्यतांचे नवे दालन त्यांना खुले झाले.

दुर्मिळ पुस्तकांच्या ज्या नकला, वैधपणे प्रसिद्ध झालेल्या होत्या, त्यांचे मलपृष्ठ काढून टाकून, त्या प्रती, त्यांनी आरंभाला विकल्या असाव्यात. हे मलपृष्ठ काढून टाकल्यानंतर त्या प्रती नकला आहेत हे सिद्ध करणारा पुरावाच नाहीसा होत असे. मि. वाईज यांनी या अस्सल आवृत्तीतल्या मलपृष्ठ नसलेल्या प्रती आहेत असे सांगून त्या विकल्या असाव्यात. हा त्यांचा प्रयोग यशस्वी झाल्यानंतर, त्यांनी स्वत: कल्पिलेल्या व त्याबरहुकूम तयार केलेल्या खास

आवृत्त्या काढण्यास सुरुवात केली. याच त्यांनी छापून घेतलेल्या बनावट दुर्मिळ पुस्तिकांच्या पहिल्या आवृत्त्या. अशा रीतीने त्यांना पैसे मिळू लागल्यानंतर त्या महान 'अॅशले ग्रंथसंग्रहांची पायाभरणी करणे', त्यांना शक्य झाले होते.

काही काळानंतर, सुगंधी तेलाच्या धंद्यातही मि. वाईज यशस्वी झाले होते ! थोडक्यात मि. वाईज यांना वाममार्गाने मिळणाऱ्या अधिक पैशाची तशी जरुरी नव्हती. दुर्मिळ पुस्तकांच्या बाजारपेठेतले त्यांचे व्यवहार, आणि त्यांचा सुगंधी तेलांचा धंदा या दोन्हीत ते खूपच पैसे मिळवीत. दुर्मिळ ग्रंथ बाजारपेठेत व्यवहार करणारे तत्कालीन व्यावसायिक गमतीने म्हणत की कवी स्विनबर्ग याचे प्रेत थडग्यात थंडगार होण्याअगोदर मि. वाईज यांनी कवी स्विनबर्ग यांचा ग्रंथसंग्रह व त्याचे कागदपत्र हस्तगत केले होते. दुर्मिळ ग्रंथ व्यवहारात मि. वाईज किती चलाखीने धंदा करीत, याचे हे प्रख्यात उदाहरण आहे. मि. वाईज यांना दुर्मिळ ग्रंथांचा संग्रह करण्याचे जे वेड होते, त्यासाठी आता त्यांना भरपूर द्रव्य उपलब्ध होते.

दुसऱ्या एखाद्या सुमार बुद्धीच्या माणसाने या अवस्थेत, वाम-मार्गाने पैसे मिळविण्याचे थांबविले असते. परंतु हे सुमार बुद्धीचे नव्हते. त्यांची या क्षेत्रातील कर्तबगारी तशी उल्लेखनीय होती. मि. वाईज यांना आपल्या बनावट दुर्मिळ पुस्तिका, त्या विशिष्ट क्षेत्रातील अत्यंत विचक्षण संशोधकांच्या गळी उतरविण्यात यश प्राप्त झाले होते. तसेच त्यांना आवश्यक होती त्याहीपेक्षा कितीतरी अधिक द्रव्यप्राप्ती या व्यवसायातून झाली होती. मग त्यांनी यापेक्षा अधिक कशाची अपेक्षा करायची? पण त्याचे असे झाले असेल की बनावट दुर्मिळ पुस्तिकांचे उत्पादन करण्याची सवय वा छंद म्हणा– याच्या प्रेमात ते पडले असावेत. दुर्मिळ ग्रंथ बाजारपेठेत या बनावट दुर्मिळ पुस्तिका एकामागून एक आणून टाकण्याची कृती करून त्यांना प्रचंड असे बौद्धिक समाधान प्राप्त होत असावे. शिवाय या बनावट पुस्तिकांच्या प्रत्येक पुस्तिकेचा जो जो कोणी लेखक होता, त्याच्या जीवनातील तोवर ज्ञात असलेल्या घटनांची माहिती, त्याचबरोबर त्या पुस्तिकेत केलेली विधाने अगदी काटेकोरपणे सुसंगत होती.

याबद्दल मि. वाईज यांना अभिमान वाटत असावा. म्हणूनच मुळात या दुर्मिळ बनावट पुस्तिकांचे उत्पादन केवळ अर्थप्राप्ती व्हावी या गरजेपोटी करण्यात येत होते. ही गरज आता मागे पडली होती. नवीनच गरज निर्माण झाली होती. त्यासाठीच हे उत्पादन त्यांनी पुढे चालू ठेवले असावे. या दुर्मिळ ग्रंथ बाजारपेठेत अनेक लोक ज्यांची गणना मूर्खातच करावी असे होते. हे लोक उद्धटपणे आपणास दुर्मिळ ग्रंथाबद्दल किती सखोल ज्ञान आहे याची शेखी मिरवीत. या तथाकथित तज्ज्ञांना ठकवून, त्यांची खरी जागा त्यांना दाखवून देऊन मि. वाईज हे केवळ एका आगळ्यावेगळ्या कुचेष्टायुक्त सुखद भावनेचा अनुभव घेण्यासाठी हा सारा खेळ खेळत असावेत. प्रख्यात ब्रिटिश लेखक व नाटककार जॉर्ज बर्नाड शॉ यांनी या मि. वाईज प्रकरणावर भाष्य करताना आपले मत नमूद केले. त्यांच्या मते, चाळीस वर्षांहून अधिक काळ चालू असलेली महाप्रचंड बनवेगिरी, केवळ एक गमतीदार अशी तात्पुरत्या

करमणुकीसाठी केलेली चेष्टा (प्रॅक्टिकल जोक) हे स्वरूप मि. वाईज यांनी केलेल्या फसवणुकीचे आहे, असे बनार्ड शॉ यांचे म्हणणे आहे. शॉ यांचे हे मत, त्यांनी कदाचित अगदी मनापासून व गंभीरपणे नोंदविलेले असेलही पण ब्रिटनमधील समकालिनांनी व त्यानंतर आलेल्या संशोधकांनी शॉ यांच्या या मताची गंभीरपणे कधीही दखल घेतलेली नाही.

ग्रंथसूचीकाराचे पदच्युत झालेले राजपुत्र मि. थॉमस जे वाईज हे आणखी एका पदच्युत झालेल्या राजपुत्राच्या अमलाखाली असलेला प्रदेशात आपले दिवस कसेबसे घालवीत होते. वाङ्मयाच्या अभ्यासकांना या दुसऱ्या पदच्युत झालेल्या राजपुत्राचा परिचय नाही असे नाही. नरकात जर काही न्याय असेल तर मि. वाईज यांची नेमणूक एका विशिष्ट ठिकाणी झालेली असेल– दि घोस्टली लायब्ररी (भयानक ग्रंथालय) हे त्या ठिकाणाचे नाव. या ग्रंथसंग्रहातील एका आलिशान दालनात मि. वाईज यांचे वास्तव्य असेल– या ग्रंथसंग्रहात एक लाखावर ग्रंथ आहेत. त्यातले अर्धे अस्सल आहेत. सैतानाच्या ग्रंथसूचीकार अनुयायांनी शक्य होती ती कुटिलता वापरून महापाताळयंत्रीपणे आणि कल्पकतेने तयार केलेल्या बनावट दुर्मिळ ग्रंथांनी त्या ग्रंथसंग्रहालयाचा दुसरा अर्धा भाग व्यापलेला आहे.

या लाखाहून अधिक ग्रंथातील अस्सल कोठचे व बनावट कोठचे हे हुडकून काढण्याचे काम मुखत्वेकरून, मि. वाईज यांच्याकडे सोपविलेले आहे. दिवसभर हे किचकट काम केल्यानंतर मि. वाईज यांना थकवा येणारच. म्हणून त्यांना हे काम करण्यास प्रोत्साहन मिळावे यासाठी ते कामाला बसतात, त्या दालनाच्या तुळईवर एक वाक्य खोदण्यात आलेले आहे. मि. वाईज यांचेच ते वाक्य आहे. मि. वाईज हे कीर्तीशिखरावर होते. तेव्हा त्यांना यशाचा कैफ होता – त्या काळात त्यांच्या लेखणीतून बाहेर पडलेले ते वाक्य. या वाक्यात जी भविष्यवाणी होती ती वेळप्रसंगी त्यांनाही लागू पडणार होती, त्यांची विजयी दौड चालू होती, त्या काळात ते लिहिलेले असल्याकारणाने ती भविष्यवाणी त्यांना ऐकू गेली नाही.

कार्टर व पोलार्ड यांनी हे वाक्य आपल्या 'इनक्वायरी' या ग्रंथाचे उद्दिष्ट स्पष्ट करण्यासाठी आपल्या पुस्तकाच्या त्या दुष्ट अशा पहिला पानावरच ते छापले होते. हे वाक्य त्या लेखकालाच आता वाकुल्या दाखवीत होते. ते वाक्य असे होते –

"या सर्वावरून एकच गोष्ट सिद्ध होते. दुर्मिळ ग्रंथाची बनावट आवृत्ती तयार करणे हे तसे सोपे दिसते, पण प्रत्यक्ष कार्यवाही करावयास लागल्यानंतर, एक गोष्ट अगदी स्पष्ट होते. ती ही, की अशा प्रकारे जी बनावट आवृत्ती तयार होते, ती बनावट आहे हे कोणासही शोधून काढता येणार नाही, अशा पद्धतीने तयार करणे हे केवळ अशक्य आहे."

( कार्टर व पोलार्ड, मिस फॅनी रॅचफोर्ड यांच्या लिखाणावर आधारित. विल्फोड पार्टींगटन यांच्या थॉमस जे वाईज इन दी ओरिजिनल क्लॉथ या पुस्तकात बर्नार्ड शॉ यांच्या ज्या आठवणी लिहिल्या त्यांचा अंतर्भाव केलेला आहे. )

---



अनुक्रमणिका

# लेखकाचे विचार आणि त्याचे साहित्य

## लुई –फर्डिनांड सेलीन

–डॉ. मंगला सरदेशपांडे

**सेलीन यांचा जीवनपट.**

**इ.स.१८९४** –लुई – फर्डिनांड यांचा कूरबवॉय (सिन) येथे जन्म झाला. त्यांच्या वडिलांचे नाव फर्डिनांड डस्टूश. हे एका विमाकंपनीत अगदी खालच्या पायरीवर काम करून, कशीबशी गुजराण करीत. सेलीन यांच्या आईचे नाव लुई– सेलीन गुईल्लू या लेस तयार करण्याचे काम करीत.

**इ.स.१९०५**–सर्टिफिकेट एड्यूड ही परीक्षा उत्तीर्ण. एका छोट्या दुकानात उमेदवारी आणि निरोप्याचे काम.

**इ.स.१९१२** –बाराव्या घोडदलातील एका विभागात तीन वर्षांसाठी दाखल होतात.

**इ.स.१९१४** –फ्लाँडर्स येथील पोएलकाप्पेल या ठिकाणी जखमी झाले. उच्च असा सैनिकी बहुमान प्राप्त झाला. डोक्याला आणि हाताला जबरदस्त जखमा झाल्या होत्या. त्या कारणाने सैनिकी मोजमापात ते पंचाहत्तर टक्के नादुरुस्त होते. सैन्यातल्या प्रत्यक्ष कार्यवाहीतून निवृत्त.

**इ.स.१९१६** –आफ्रिकेतील कामरून, हा प्रदेश व्यापण्यासाठी गेलेल्या सैन्याबरोबर प्रयाण. तेथे मलेरिया, ॲमिबिक डिसेंट्री (हगवण) इत्यादी रोगांनी हैराण होतात. आर्मामेंट सर्व्हिसमध्ये दाखल होण्यासाठी लंडन येथे प्रयाण.

**इ.स.१९१७** –बाकॅलॉरीएट ही पदवी प्राप्त करून घेतात. ही पदवी मिळविण्यासाठी ते कोणत्याही शाळेत जात नाहीत. स्वत:च अभ्यास करून ही परीक्षा पास होण्यात ते यशस्वी होतात.

**इ.स.१९१८** –रॉन्स येथे वैद्यकीय शिक्षणाचा आरंभ.

**इ.स.१९१९** –मेडिकल स्कूलच्या संचालकाची कन्या एडीथ कॉलेट हिच्याशी विवाह.

**इ.स.१९२०** –कन्या कॉल्लेट हिचा जन्म.

**इ.स.१९२४** –पॅरिस येथील फाकलते ड मेडर्सं या संस्थेचा डिप्लोमा मिळवतात. सेम्मवाईस या विषयावर डॉक्टरेट मिळविण्यासाठी प्रबंध लेखन



अनुक्रमणिका

रॉकफेलर फाउंडेशनसाठी जिन्हेव्हा व लिव्हरपूल येथे काम.

इ.स.१९२६ –पुन्हा एकदा आफ्रिकेतील कामरूनमधून प्रवास. अमेरिका, कॅनडा आणि क्यूबा या देशातून भ्रमंती.

इ.स.१९२८ –क्लीशी या ठिकाणी डॉक्टरी हा व्यवसाय करण्यास सुरुवात. लहान मुलांच्या दुखण्याबाबत विशेषतः, एरवी सर्वसाधारण दुखण्याबाबत इलाज करणारा डॉक्टर म्हणून व्यवसाय करण्यास आरंभ.

इ.स.१९३२ –पहिल्या कादंबरीचे प्रकाशन. दनोएल आणि स्टील कंपनीकडून अखेरास प्रकाशित. ही कादंबरी चांगलीच गाजली. लेखकाला प्रसिद्धी प्राप्त झाली. या कादंबरीचे नाव आहे व्होयाज ओ बु ड ला नुई. (रात्रीच्या तळाशी अखेरीस नेणारा प्रवास प्रकाशित)

इ.स.१९३६ –MORT A CREDIT मोर्ट आ क्रेडित – 'हप्तेबंदीचे मरण' ही आणखी एक कादंबरी प्रसिद्ध झाली. लुई आरागाँ आणि एल्सा ट्रिओले यांनी व्होयाज..या कादंबरीचे रशियन भाषेत भाषांतर केलेले असते. त्यापासून जी रॉयल्टी प्राप्त होते,तिच्या जोरावर रशियाची सफर, रशियाहून परतल्यानंतर कम्युनिस्ट समाजाचा निषेध तीव्र शब्दात नोंदवितात. MEA CULPA या नावाने त्या सफरीचा वृत्तांत प्रसिद्ध होतो.

इ.स.१९३७ –BAGATELLES POUR UN MASSACRE बागातेल्ल पूर अँ मासाक्र (कत्तलीसाठी एक छोटे पदक) या पुस्तिकेचे लेखन व प्रकाशन. पराकोटीच्या वंशवादी आणि ज्यू विरोधी विचारांची पुस्तिका. या पुस्तिकेसारख्याच आणखी दोन पुस्तिका इ.स. १९३८ आणि इ.स. १९४१ साली त्यांनी प्रसिद्ध केल्या होत्या.

इ.स.१९३९ –पुन्हा एकदा सैन्यात दाखल होण्याचा प्रयत्न. त्यांची प्रकृती चांगली नाही या कारणावरून त्याना प्रवेश नाकारण्यात येतो. एका जहाजावर डॉक्टर म्हणून काम. सारट्रुव्हील या ठिकाणी एक दवाखाना चालवितात. पॅरिस शहर सोडून जातात. एका रुग्णवाहिकेच्या संघटनेत काम करतात. पॅरिसला परत येऊन माँत मार या पॅरिसच्या एका भागात पुन्हा एकदा डॉक्टरी व्यवसायास सुरुवात.

इ.स.१९४२ –बर्लिन शहरास भेट.

इ.स.१९४३ –लुसेत्त आलमानझोर या नर्तिकेशी विवाह.





अनुक्रमणिका

**इ.स. १९४४** – GUIGNOL'S BAND गुईग्नोल बॉन्द या पुस्तकाचे गालीमार्ड या प्रख्यात प्रकाशक संस्थेमार्फत प्रकाशन. डेन्मार्कला जाण्याचा प्रयत्न करण्यासाठी पॅरिसहून प्रयाण. त्यांच्याबरोबर त्यांची पत्नी, त्यांचे मांजर बोबर्ट व सिनेनट ल व्हिगाँ हे होते. बर्लिन येथे अटक व तुरुंगात रवानगी. सिगमारीनगेन या गावी हद्पार करण्यात आले.

**इ.स. १९४५** – बॉम्बचा वर्षाव होत होता तरीही जर्मनीमधून डेन्मार्कला जाण्यासाठी निघतात. बरोबर पत्नी व मांजर असते. वाहन उपलब्ध नसल्याकारणाने पायीच जर्मनी पार करून, डेन्मार्कमध्ये प्रवेश. कोपनहागन या शहरात लपून बसतात. त्यांना अटक व्हावी अशी फ्रेंच वकिलातीकडून मागणी येते. फेनस्टेर फाँगेल या ठिकाणी चौदा महिने तुरुंगवास.

**इ.स. १९४७** – सुटका. प्रिन्सेसगाव या ठिकाणी एका पोटमाळ्यावर वास्तव्य. त्यानंतर बाल्टिक समुद्राच्या तीरावरील एक झोपडीत मुक्काम.

**इ.स. १९५०** – फ्रेंच न्यायालयात देशद्रोहाच्या आरोपाखाली खटला चालून, १ वर्षाचा तुरुंगवास, पन्नास हजार फ्रँक दंड व त्यांची जी काही मालमत्ता होती, त्यातली अर्धी मालमत्ता जप्त करण्यात यावी अशी शिक्षा फर्मावली जाते.

**इ.स. १९५१** – सैनिकी न्यायालय सेलीन यांना निर्दोषी ठरवून मुक्त करते. पॅरिस शहराच्या वेशीवर मउदाँ या भागात गरिबांच्या वस्तीत डॉक्टरी व्यवसायास पुन्हा एकदा सुरुवात.

**इ.स. १९५२** – FEERIE POUR UNE AUTRE FOIS 'पऱ्यांची भूमी' दुसऱ्या एखाद्या वेळेसाठी हे पुस्तक आणि या नंतरची सर्व पुस्तके गालीमार्ड प्रकाशन संस्था-प्रसिद्ध करते.

**इ.स. १९५४** – NORMANCE FEERIE POUR UNE AUTRE FOIS !! या पुस्तकाचे प्रकाशन.

**इ.स. १९५६** – ENTRETIENS AVEL LE PROFESSER.

**इ.स. १९५७** – D'UN CHATEAU L'AUTREU.

**इ.स. १९६०** – NORD.

**इ.स. १९६१** – मृत्यू आणि दफन. त्यांचा मृत्यू, त्यांच्या दफनाची वेळ व जागा ही गुप्त ठेवण्यात आली होती. वृत्तपत्रातून तिला प्रसिद्धी देण्यात आली नव्हती.

## सेलीन यांच्या तीन मुलाखती

**एक**

(१ जून १९६० – क्लोद सरोत्त यांनी घेतलेली मुलाखत)

**सेलीन** – मी काय सांगणार? माझ्या वाचकांना काय आवडेल? मला माहीत नाही. हे वाचक हे अशा प्रकारचे लोक असतात की त्यांच्याशी आपण चांगले वागलेच पाहिजे. त्यांच्या डोक्यावर आपणस प्रहार करता येणार नाही. त्याना न दुखावता आपण त्यांची करमणूक करावयास हवी. ते काहीही असो.... जाऊ दे.... मी आपणास काय हवे असेल ते सांगतो. लेखकाकडे फारशी पुस्तके नसतात. माझ्यावर जर संकटाची मालिका कोसळली नसती तर 'व्होयाज ओ बु द ला नुई' आणि 'मोर्त आ क्रेडीट' ही माझ्या दृष्टीने फारच पुस्तके ठरली असती. या संकटाच्या मालिकेमुळे मला नवीन विषय मिळाले. उत्सुकतेने मी त्यात शिरलो. उत्सुकता ही महागडी ठरते. मी एक तवारिखकार बनलो, शोकांतिकांचा तवारिखकार. जवळजवळ सर्वच लेखक शोकांतिकाच्या शोधात असतात. पण त्या त्यांना गवसत नाहीत. त्यांना छोटेसे खाजगी प्रसंग आठवतात, पण त्या शोकांतिका नसतात. तुम्ही यावर म्हणाल ग्रीकांचे काय? शोकांतिका रचणारे ग्रीक कवी अशा भ्रमात असत की आपण ईश्वरांशी संवाद करीत आहोत.... म्हणजे तुमच्या लक्षात येईल.... HELL ईश्वराबरोबर दूरध्वनीवर संपर्क साधण्याची संधी तुम्हाला रोज मिळत नाही.

**मुलाखतकार** – आपल्या विद्यमान काळात, आपल्या मते शोकांतिक घटक कोणता आहे?

**सेलीन** – स्टॅलिनग्राड. तुम्हाला त्या ठिकाणी विरेचन आढळेल. स्टॅलिनग्राड पडले त्याच वेळी युरोपची इतिश्री झाली. महान उत्पात झाला, त्याचे केंद्र स्टॅलिनग्राड होते. या घटनेनंतर तुम्हाला असे म्हणता आले असते की गौरवर्णीयांची संस्कृती निकालात निघालेली आहे. असं पहा महान उत्पात होत असताना, आवाज, कोलाहलही भरपूर प्रमाणात होतो. खदखदणे, क्षेपणास्त्रे, मोतीबिंदू. मी या सर्वांच्या मध्यभागी होतो... त्यापासून मला काही मिळालेही. मी त्या साहित्याचा उपयोगही केला. मी त्यांची विक्रीही केली. होय अगदी बरोबर! माझा ज्या गोष्टींशी अजिबात संबंध नाही.... ए यू संबंधीचे जे मी लिहिले त्यात – अशा करण्यात मी गुरफटलो. मी ती गोष्ट सांगितली.... अर्थात माझ्या पद्धतीने.

**मुलाखतकार** – आपली पद्धत अशी होती की 'व्होयाज...' जेव्हा प्रकाशित झाले, तेव्हा त्या पुस्तकाने चांगलाच जनप्रवाद निर्माण झाला. वादंग माजले. आपल्या लेखन–शैलीने तोवरच्या अनेक चांगल्या संकेताचा भंग केला.

**सेलीन** –आपण ज्याचा भंग केला असे म्हणता.... ती कृती नवा शोध म्हणून ओळखली जाते. उदा. दृक प्रत्ययवादाचेच घ्या. या ढंगाच्या चित्रकारांनी आपली चित्रकला बाहेरच्या सूर्यप्रकाशात नेली. ते चित्रकार घराबाहेर राहूनच आपली चित्रे रंगवीत. बाहेरच्या

हिरवळीवर बसून जेवण घेताना खरोखरच्या लोकांनी त्याना पाहिले. संगीतकाराही त्याच दिशेने काम करू लागले होते. संगीतकार बाख ते डब्यूस्सी– हा कालखंड चांगलाच लांबलचक आहे. संगीतकारानी ध्वनी व चित्रकारांनी रंग यांच्यात क्रांती घडवून आणली. शब्दाशब्दांचे स्थान हे माझे माध्यम आहे. मी आपणास फ्रेंच वाङ्मयासंबंधी एक छोटेसे व्याख्यान देणार आहे. रागावू नका. कॅथलिक, प्राटेस्टंट आणि ज्यू सर्व धर्मांनी आपणास लहानाचे मोठे केले. फारतर असे म्हणा ख्रिश्चन धर्मातील पंथानी ते काम केले.

फ्रेंच शिक्षण हे अनेक शतके जेसुइटांच्या मार्गदर्शनाखाली होते. लॅटिन भाषेतून झालेल्या भाषांतराच्याद्वारा त्यांनी आपणास वाक्य रचना करावयास शिकवले. संतुलित वाक्ये कर्ता, क्रियापाद आणि कर्म असलेली एका विशिष्ट लयीची ती वाक्ये होती. थोडक्यात सांगावयाचे झाल्यास एक बिघडलेले प्रवचनच असावयाचे ते ! लोक एखाद्या लेखकाबद्दल म्हणतात. 'तो चांगल्या वाक्यांची रचना करतो.' मी सांगतो 'ती वाचनीय नाहीत.' लोक म्हणतात, "केवढी प्रशंसनीय नाट्यपूर्ण भाषा" ! मी पाहतो, एकतो. ती अगदीच सपाट, काही परिणाम न साधणारी, तिच्यात काही अर्थ नाही. ती अस्तित्वातच नाही अशी. मी जर काय केले असेल. तर बोलीभाषा लेखनात आणली; अगदी एका झटक्यात.

**मुलाखतकार** –त्याला आपण, आपले 'छोटे संगीत' या नावाने संबोधता. नाही का?

**सेलीन** –मी त्याला 'छोटे संगीत' म्हणून संबधतो याचे कारण मी नेमस्त व नम्र आहे. परंतु हे परिवर्तन फारच कठीण आहे. त्याकरता फार कष्ट घ्यावे लागतात. वरवर पहाता, त्यात काहीच नाही असे भासते. पण त्यास फार ज्ञानाची आवश्यकता असते. मी लिहिली आहे तसे लिहावयाचे असेल, तर तुम्हाला प्रथम एक हाती ऐंशी हजार पृष्ठे लिहावी लागतील. मग त्यातून तुम्ही काटछाट करून, ती आठशे पृष्ठांवर आणता. माझ्याविषयी बोलताना लोक म्हणतात,"हे स्वाभाविक असे बोलणे आहे. तो जसे बोलतो, तसेच लिहितो. दररोजच्या वापरातले शब्द. . . . वाक्यात जवळजवळ त्या एकाच स्थानावर असलेले. . . तुम्हाला ते ओळखीचे वाटतात." फक्त एकच गोष्टी झालेली असते बघा, प्रत्येक बाबतीत परिवर्तन झालेले तुम्हाला दिसते. तुम्ही ज्या शब्दाची अपेक्षा केली होती तो शब्द, किंवा तुम्ही अपेक्षा केली होती ती परिस्थिती, तुम्हाला भेटत नाही. सत्य आणि 'न– सत्य' यांच्या दरम्यान असणाऱ्या स्वप्नांच्या प्रांगणात त्याचे परिवर्तन झालेले असते.

एखादा शब्द या अशा प्रकारे वापरल्यानंतर, तो एकाचवेळी ज्याच्याबद्दल आपणास अधिक आपणास जवळीक आहे, आणि तो अधिक तो नेमका आहे असा वाटू लागतो. हे असे घडणे, हे तोच शब्द सर्वसामान्यपणे वापरला असता जे घडते, त्यापेक्षा अधिक काही असते. लेखक स्वत:लाच शैली बनवितो. त्याला तसे करावेच लागते. हा व्यवसाय तसा सोपा आहे. तो सहज शिकून घेता येईल. कुशल कामगाराला आपल्या हत्यारांचा फारसा उपयोग नसतो. तेच लेखनशैलीबद्दल म्हणता येईल. तुम्हास ज्याचे प्रदर्शन करायचे आहे. ते आपल्या स्वत:तून बाहेर काढून दाखविण्यापुरतीच त्याची उपयुक्तता असते.

**मुलाखतकार** –आपणस कशाचे प्रदर्शन करण्याची इच्छा आहे?

**सेलीन** – भावना. सार्व्हा नावाच्या जीवशास्त्रज्ञांनी नेमके व योग्य असेच सांगितले आहे. आरंभाला शब्द नव्हता, सुरुवातीला होती भावना. तुम्ही एखाद्या अमिबाला जेव्हा चाळवता, तेव्हा तो लगेच आक्रसतो. त्याच्याकडे भावना आहेत. पण त्याला बोलता येत नाही. त्याच्याकडे भावना निश्चित असतात. लहान मूल रडते, घोडा भरधाव धावतो. लहान मुलाला बोलायचे कसे हे शिकावेच लागते. दुडक्या चालीने कसे धावायचे हे घोड्याला शिकावे लागते. परंतु मानवजातीला आणि फक्त मानवजातीलाच शब्द बहाल करण्यात आला. त्याचा परिणाम लेखक, राजकारणी, प्रेषित निर्माण होण्यात झाला. शब्द हा राक्षसी आहे. त्याची दुर्गंधी नेहमीचीच. परंतु भावनांचे भाषांतर करणे, हे कल्पनातीत असे कठीण काम आहे... महाभयानक आहे.... मानवी शक्तीपलीकडेच आहे... ते माणसालाच ठार करील.

**मुलाखतकार** –परंतु लिहिण्याची आवश्यकता आपणास नेहमीच भासली आहे.

**सेलीन** – आपण जे काही करतो, त्यातले काहीही आवश्यकतेविना नसते. आपण कोणतीही गोष्ट अगदी स्वतंत्रपणे करीतच नाही. आपण एखादी गोष्ट रचली, तर तिला काहीही किंमत नसते, तुम्ही ज्या गोष्टीकरिता किंमत मोजली आहे तीच चांगली असते. तुम्ही एकदा तिची किंमत चुकती केलीत, मग तिच्यात मागे पुढे करण्याचा हक्क तुम्हाला प्राप्त होतो. तसे नसले तर मग ते फारच वाईट... ते सगळे नेमके हेच करतात... ते म्हणजे ज्यांच्याकडे सगळे काही– नोबेल पारितोषिक, ॲकॅडमीचे सदस्यत्व, वृत्तपत्रातील प्रसिद्धी, फसवेगिरीचे सुवर्णपदक– आहे ते लोक. माझ्याजवळ जर पैसे असते तर या सर्वांना त्यांनी निर्माण केलेल्या कर्दमात राहू दिले असते. आकाशवाणीवरचे कार्यक्रम मला ऐकणे झेपतच नाही... प्रत्येक आठवड्याला या आकाशवाणीवरच्या लोकांना एका 'जिनिएस'चा (प्रज्ञावान माणसाचा) दर दोन आठवड्यानी एखाद्या बालझाक (एक महान फ्रेंच कादंबरीकार) दररोज सकाळी उठल्याबरोबर जॉर्ज सॅन्डचा (एक महान फ्रेंच स्त्री कादंबरीकार) शोध लागतो.

मला माझे काम असल्याकारणाने, या आकाशवाणीवरच्या लोकांबरोबर जाऊन, त्या लोकांची उंची गाठण्याइतका मला वेळच नाही. मी एक करार केला आहे, तो मला पुरा केलाच पाहिजे. आज माझ्या वयाला सहासष्ट वर्षे झाली आणि मी पंचाहत्तर टक्के अपंग आहे. या माझ्या वयाला बहुतेकजण सेवानिवृत्त होता. मला गालीमार्द प्रकाशन संस्थेचे साठ लाख फ्रँकचे कर्ज.... तुमच्या लक्षात आलेच असेल मला काम करीतच राहिले पाहिजे. मी आणखी एका कादंबरीवर काम चालू केले आहे. D'UN CHATEAU LAUTRE डं शाटो लोट्र या कादंबरीनंतर प्रसिद्ध झालेल्या नॉर्द NORD या कादंबरीसारखीच ती आहे.

नॉर्द खरे म्हणजे डं शाटो लोट्र या कादंबरीचा पुढचा भाग आहे. एका गोष्टीतून दुसरी निर्माण होते आणि तुम्हाला थांबताच येत नाही. मला कादंबऱ्याविषयी थोडेसे माहिती आहे. माझ्या तरुणपणी... या अजूनही कादंबऱ्या लिहिल्या जात होत्या. कादंबऱ्या या काहीशा लेससारख्या असतात... लेस बनविणे ही देखील एक कला आहे. कॉनव्हेटस् नाहीशी झाली

आणि ही कला नाहीशी झाली. मोटारगाड्या, चित्रपट, दूरचित्रवाणी आणि मद्य यांच्याबरोबर कादंबरीला स्पर्धा करताच येणार नाही. जो कोणी भरपेट जेवतो. उत्तम मद्य पिऊन ज्याने आपली टाकी भरून घेतली आहे तो रात्रीच्या जेवणानंतर आपल्या प्रियेचे चुंबन घेतो आणि त्याचा दिवस संपतो. इत्यलम.

## दोन

(इ. स. १९६०च्या उत्तरार्धात. जाँ गुएमो आणि जॅक दाहीबहोद हे दोघे मुलाखतकार)

**मुलाखतकार** – आपणावर ज्याने कायमची मुद्रा उठविली आहे, आपणास ज्याने वाङ्मयीन धक्का दिला आहे अगर उत्साह प्राप्त झाला आहे असा एखादा प्रसंग आपणास आठवतो का?

**सेलीन** – छे. छे. निश्चितपणे नाही. मी डॉक्टरी व्यवसायापासून सुरुवात केली. तोच व्यवसाय करण्याची माझी इच्छा होती आणि वाङ्मयीन क्षेत्रात प्रवेश करण्यास मी अजिबात उत्सुक नव्हतो अगदी खरेच नव्हतो; मला काही लेखक हे प्रज्ञावान आहेत असे जरूर वाटते. . . . नेमके तेच तेच लेखक प्रज्ञावान आहेत असे दिसते. तीच तीच नावे. . . पॉल मोरँड. . . रामूझ. . . . बाटब्यूस्स. . . हे सर्वजण लेखक म्हणूनच जन्माला आले होते.

**मुलाखतकार** – आपण जेव्हा एक बालक होता, तेव्हा आपण लेखक होणार आहोत असा विचार केला होतात का?

**सेलीन** – कधीही नाही. नाही, नाही, नाही. मला जे डॉक्टरी व्यवसाय करणारे होते. त्यांच्याबद्दल मला प्रचंड कौतुक व आदर होता. डॉक्टरी व्यवसाय मला खरोखरीच विलोभनीय वाटे. त्या व्यवसायाच्या विचाराने माझ्या अंगावर रोमांच उभे राहात.

**मुलाखतकार** – आपण जेव्हा एक बालक होता. तेव्हा डॉक्टरी व्यवसाय करणाऱ्या व्यक्तीकडे बघून आपणास काय वाटत असे?

**सेलीन** – पासाज चॉईसल येथे माझ्या आईला आणि वडिलांना तपासण्यासाठी जो मनुष्य येई, तो माझ्या दृष्टीने एक चमत्कार करणारा, लोकांना बरे करणारा मनुष्य होता. जे शरीर नादुरुस्त होते, त्या शरीराच्या संबंधात आश्चर्यकारक गोष्टी करणारी ती व्यक्ती होती. ते सारे अद्भुत आहे असे मला वाटत होते. तो इतका विद्वान आणि शहाणा मनुष्य आहे असे भासे. अगदी मला हेच वाटत असे, तो अगदी निःसंशयपणे जादूगार होता.

**मुलाखतकार** – डॉक्टरी व्यवसाय करणाऱ्या व्यक्तीकडे बघून आपणास आज काय वाटते?

**सेलीन** – वाह ! आजकालची जी सामाजिक घडी आहे, ती त्या व्यवसायाला फारच त्रासदायक आहे. आजकाल प्रत्येकजण डॉक्टरबरोबर स्पर्धा करीत आहे. डॉक्टर सामाजिक प्रतिष्ठा गमावून बसला आहे. त्याने प्रतिष्ठा गमावली तेव्हा तो थांबला. . . . एकदा त्याने एखाद्या गॅरेजमधल्या मेकॅनिकसारखे कपडे करण्यास सुरुवात केली. मग आस्ते कदम, हळूहळू आपण डॉक्टर नसून एक गॅरेज मेकॅनिक आहोत अशी छाप पाडण्यास सुरुवात

केली. आता त्याला अधिक काही सांगायचे नसते. एखाद्या गृहिणीपाशी आता वैद्यकीय–ज्ञानकोश असतो आणि इतकेच नव्हे तर रोगांनीही आता आपली प्रतिष्ठा गमावली आहे. प्रतिष्ठा असणाऱ्या रोगांपैकी बहुतेक निकालात निघाले आहेत. . . विचार करून पहा. . . सिफिलीस; परमा, गरमी हे रोग आता भीतीदायक राहिलेले नाहीत. . . इतकेच नव्हे टाइफाइडही नाही. डॉक्टरी व्यवसायतील शोकांतिकेचा अर्धा भाग आता ॲन्टीबायोटिकस्मुळे नाहीसा झाला आहे. इत:पर प्लेग नाही, कॉलरा नाही.

**मुलाखतकार** – पण मानसिक आणि मज्जातंतू या दोघांच्या संबंधित असलेल्या रोगांचे काय? त्यांची संख्या दिवसेंदिवस वाढत नाहीये का?

**सेलीन** – परंतु त्या रोगाबाबत आपणास एकही बारीकशी गोष्टही करता येत नाही. काही मानसिक रोग झाल्याने मृत्यू येतो हे खरे पण त्यांची संख्या तशी मोठी नाही. पॅरिस हे थोडेसे वेड लागलेल्या लोकांनी भरलेले शहर आहे. उत्तेजकता प्राप्त व्हावी यासाठी झपाटलेले व तशी प्रवृत्ती असलेले काही लोक जरूर असतात. परंतु पॅरिस शहरात अंग–प्रत्यांगाचे जे प्रदर्शन होते, ते पाहून लैंगिक प्रेरणेला उधाण येणे स्वाभाविकच आहे. . . शाळकरी मुलींचा विचार करा. . . या प्रदर्शनानी त्या सैरभैर होणारच.

**मुलाखतकार** – आपण जेव्हा फोर्ड– मोटर कंपनीत काम करत होता, त्या कारखान्यात दैनंदिन कामाबाबत कामगारावर जीवनपद्धती लादली गेलेली आहे. त्यातून अनेक मानसिक रोग उद्‌भवतात अशी आपली त्यावेळी समजूत झाली होती का?

**सेलीन** – अजिबात नाही. फोर्ड कारखान्यातील सर्व डॉक्टरांचे एक डॉक्टर प्रमुख डॉक्टर होते. माझेही ते वरिष्ठ अधिकारी होते. ते सांगायचे ते असे : "मला असे सांगण्यात आले आहे की, चिपांझी ही माकडे शेतातला कापूस वेचतात. त्यांतल्या काही माकडांनी या कारखान्यातील यंत्रासमवेत काम केले तर मला आनंदच होईल, ही गोष्ट अधिकच चांगली आहे." मानसिक रोगग्रस्त जे कोणी होते, ते कामगार म्हणून अधिक चांगले काम करीत. सर्वसामान्यदृष्ट्या निरोगी मनुष्याची तो जेथे काम करतो, त्या कारखान्याला त्याची जी बांधिलकी असते त्यापेक्षा मानसिक रोगग्रस्त माणसाची बांधिलकी अधिक असते. हा सर्वसामान्य मनुष्य नोकरी सोडून जातो. मानसिक रोगग्रस्त आपल्या नोकरीला चिकटून राहतो.

परंतु आजकालचा जो मानवी प्रश्न आहे तो केवळ औषधांचा प्रश्न नाही. डॉक्टरांकडे सल्ला वा औषध घेण्यासाठी जे रोगी आलेले असतात, त्यातले बहुसंख्य रोगी स्त्रिया असतात. स्त्रिया या नेहमीच काळजीत असतात. आपणा सर्वांस ज्या ज्या कमतरता वा त्रुटी ज्ञात आहेत. त्या सर्वांचेच त्या माहेरघर आहेत. प्रत्येक स्त्रीने केलेच पाहिजे. . . त्याचे असे आहे. स्त्रियांच्या मनात, आपण सदैव तरुण राहिलेच पाहिजे ही इच्छा असते. . . विटाळ गेलेला असतो. मासिक पाळीचे दिवस असतात. . . थोडक्यात स्त्रियांच्या त्या नाजूक भागां–संबंधीचा हा जीवघेणा खेळ. . . हे सारेच नाजूक आहे, आणि त्या कारणानेच ती शहीद

बनते. तरीही ती आयुष्य कंठीतच असते. मासिकस्त्राव होतच असतो. तो यदाकदाचित् थांबला तर ती डॉक्टरकडे जाते, मग ती शस्त्रक्रिया करून घेईल, अथवा करूनही घेणार नाही... मग आणखी एक शस्त्रक्रिया... मध्यंतरीच्या काळात ती एका बालकाला जन्म देते, आपले शरीरसौष्ठव ती गमावते, आणि ते वाईटच... तिला तरुण राहण्याची, आपले शरीसौष्ठव कायम ठेवण्याची इच्छा असते... आपण नोकरी कामधंदा करावा अशी तिची इच्छा नसते.

परंतु प्रत्यक्षात तसे करणे तिला शक्य नसते... तिच्या शरीरातील स्नायुच तिला हालचाल करण्यास नकार देतात... हा खरोखरच मोठाच प्रश्न आहे... या प्रश्नाकडे कोणी अजिबात लक्ष न दिल्याकारणाने तो सर्वस्वी दुर्लक्षित राहिला आहे... याच कारणामुळे ब्यूटी पार्लर, कायाकल्प घडविणारे, आणि अक्सीर जडीबुटी आपणाकडे आहे असे सांगणाऱ्यांची चलती होते. परंतु वैद्यकशास्त्राने हा प्रश्न व त्या प्रश्नाबरोबरचे आनुषंगिक प्रश्न यात जराही लक्ष घातलेले नाही. ज्या स्त्रीचे विघटन होत असते ती एखाद्या कोमेजणाऱ्या गुलाबासारखी. तुम्ही हा प्रश्न वैद्यकशास्त्रातला अथवा शेतकीशास्त्रातला प्रश्न, अथवा त्या दोन्ही शास्त्रातला प्रश्न या स्वरूपात तुम्ही त्या स्त्रीकडे पाहात नाही. तुम्ही आपल्या बागेतले गुलाबाचे फूल कोमजताना पाहाता, तेव्हा गप्प बसून काहीही न करता ते पत्करायचे ठरविता. तुम्ही म्हणता आणखी गुलाबाची फुले फुलणारच आहेत...

परंतु स्त्रीच्या बाबतीत... तिला मरणाची इच्छा नसते. तुमच्या दृष्टीने अडचणीचा व खुपणारा भाग तेवढाच असतो. मला या प्रश्नासंबंधी फारच चांगली जाण आहे. याचे कारण माझे आयुष्य नर्तिकेबरोबर गेलेले आहे. शरीरातील स्नायूसंबंधात बोलायचे झाले तर त्याबाबत स्त्रियांना झुकते माप मिळालेले आहे. आपण पुरुष हे स्त्रियांपेक्षा बळकट स्नायू मिळालेले प्राणी आहोत... स्त्रीला स्वत:ची काळजी घेणे प्राप्तच असते. पण ते तिला आवडत नाही ते सारे ठीक. आता डॉक्टरी सल्ल्यानुसार बसविलेली आपली नेहमीची वागणूक घेऊ या. डॉक्टरांना त्यापासून रोजी रोटी प्राप्त होते. परंतु आपण जेव्हा खऱ्याखुऱ्या आजारपणाशी येतो, तेव्हा तसा आजार आपणास फारसा पहावयास मिळतच नाही. मी एक बालक होतो, तेव्हा जे रोग पाहिलेले आहेत, ते आजच्या तरुण विद्यार्थ्यांनाही पहावयास मिळत नाही. हे विद्यार्थी आजकाल प्रेतेही पहात नाहीत.

**मुलाखतकार** – आपण डॉक्टर म्हणून जेव्हा काम करीत होता, तेव्हा आपणास अनेक गोष्टींचा अनुभव आला. अनेक प्रकारच्या गोष्टी स्पष्ट झाल्या, जाणीव झाली, आणि प्रचीतीही आली. हे सर्व आपण आपल्या साहित्यातून आविष्कृत केलेत?

**सेलीन** – अलबत. मी डॉक्टरी व्यवसायात पस्तीस वर्षे घालविली आहेत. काही झाले तरी त्याला काही अर्थ आहे. हा व्यवसाय करताना... एक तरुण मनुष्य म्हणून अनेक योजने चाललो आहे. त्या काळात अनेक जिन्यांची चढउतार केली आहे. शेकडो लोकांना भेटलो आहे. होय अगदी शेकडो लोकांना... प्रत्येक बाबतीत या अनुभवाने माझे खूपच भले केले... परंतु मी वैद्यकीय कादंबऱ्या लिहिल्या नाहीत, कारण त्या लिहिणे म्हणजे तिटकारा करावा असे कंटाळवाणे काम... उदा. SOUBIRAN





अनुक्रमणिका

**मुलाखतकार** – आपल्या डॉक्टरी व्यवसायासंबंधी महत्त्वाकांक्षा होत्या. त्या अगदी सुरुवातीच्या काळातल्या. पण त्यानंतर आपण आयुष्याला अगदी वेगळेच वळण देऊन नव्याने सुरुवात केलीत.

**सेलीन** – होय. अगदी बरोबर. ते सुद्धा कसे झाले ते पहा. मी वस्तूंची खरेदी– विक्री करणारा सेवक व्हावे अशी वडिलांची इच्छा होती. डिपार्टमेंटल स्टोअरमधील विक्रेता. . . माझ्या घरची गरिबी होती. माझ्या आई– वडिलांकडे पोटभर जेवण्यासाठीही पैसे नव्हते. माझा गरिबीत जन्म झाला तसाचा माझा अंतही होणार आहे.

**मुलाखतकार** – इ. स. १९०० सालाच्या आसपासच्या काळातील एखाद्या छोट्या दुकानदाराच्या आयुष्यासंबंधी मला काही सांगाल का?

**सेलीन** – भयानक. . . अगदी भयानक. . . म्हणजे मला काय सांगायचे आहे. आमच्या घरी जेवायला पुरेसे अन्नही नसे. परंतु समाजात आम्ही मध्यमवर्गीय आहोत हे नाटक चालू ठेवणे भागच होते. उदा. पासाज चॉईसल या ठिकाणी आमच्याकडे दोन शोकेसिस होता. त्यातल्या फक्त एका शोकेसमध्येच दिवा लागलेला असे. दुसरीत दिवा नव्हताच, कारण ती रिकामी होती. कामावर जाण्या अगोदर . . म्हणजे माझे वडील पासाज ही जागा झाडू पोते करून मगच कामावर जात. . . . जीवन काही गंमत नव्हती. . . माझ्या आईकडे इअरिंगचा एक जोड होता. . . दर महिन्याच्या अखेरीस गॅसचे बिल भागविण्यासाठी आम्ही तो गहाण टाकत होतो. तुम्ही विचारूच नका. ते सारेच महाभयानक होते.

**मुलाखतकार** – आपण पासाज चॉईसल या जागेत खूप दिवस राहिलात का?

**सेलीन** – मी असं सांगेन, चांगली अठरा वर्षे. . . . मी सैन्यात दाखल होईपर्यंत. . दारिद्र्याने पुरेपूर भरलेले जीवन. . . खरे म्हणजे दारिद्र्यापेक्षा कमालीचे वाईट. याचे कारण तुम्ही जेव्हा नुसतेच गरीब असता, तेव्हा तुम्हाला झोकून देता येते. दारू पिऊन धुंद होऊन, गटारात लोळलात तरी त्याची पर्वा नसते. पण देखावा कायम ठेवून जगावयाचे गरिबीचे जीवन, प्रतिष्ठा कायम ठेवून जगावयाचे. दारिद्र्याचे जीवन आणि तेच महाभयानक असते. उदा. . . माझ्या आयुष्यभर मी नुडल्सच खाल्ल्या. नुडल्सच याचे कारण, त्याचे असे होते. माझी आई जुन्या लेसी दुरुस्त करण्याचे काम करीत असे. जुन्या लेसीविषयी प्रत्येकाला एक गोष्ट माहीतच आहे. ती म्हणजे लेसीला एकदा वास यायला लागला, की मग तो कायमचाच. मग गिऱ्हइकाचे काय?

तुम्ही आपल्या त्या गिऱ्हाइकाला वास येणारी लेस देत नाही. मग कुठलाही वास न येणारे अन्न कुठचे ! नुडल्स. मी वाडगा वाडगा भरून नुडल्स खाल्लेल्या आहेत. उकडलेल्या नुडल्स, होय; पुन्हा होय. माझ्या सर्व लहानपणी सदासर्वकाळ खात होतो. नुडल्स आणि ब्रेड, सूप. दोन्हीही गोष्टी बिनवासाच्या. तुम्हाला माहीतच आहे. पासाज चॉईसल या जागेतील स्वयंपाकघर हे दुसऱ्या मजल्यावर होते. आपले कपडे ठेवायचे कपाट असते, तेवढेच ते मोठे होते. एका गोलाकार जिन्याने तुम्हाला त्या स्वयंपाकघरात जावे लागे. हे बघा हे असे

वर जावे लागे. नुडल्स शिजता आहेत का हे पाहण्यासाठी, कोणाना कोणाला तरी सारखे वर जावेच लागे. नुडल्सना आधण आलेले आहे की नाही हे पाहण्यासाठी. म्हणजे हे सारेच मोठे निराशाजनक. माझी आई अपंग होती. तिचा पाय अधू होता आणि तिला हा गोल जिना चढून दिवसातून किमान पंचवीस वेळा जावे लागे... जीवन अशक्य होते... माझे वडील कारकून होते. ते पाच वाजता घरी येत... त्यानंतर आम्हाला गिऱ्हाइकांच्या घरी जाऊन माल पोचता करायचा असे, छे. छे. ती विपन्नावस्था प्रतिष्ठायुक्त विपन्नावस्था.

**मुलाखतकार** – आपण जेव्हा शाळेत गेलात, तेव्हा आपणास जे काही सोसावे लागले असेल, त्याचे मूळ या आपल्या गरिबीत होते का?

**सेलीन** – ती सरकारी शाळा होती... आम्ही कोणीच श्रीमंत नव्हतो. म्हणून मला तसा न्यूनगंड कधीच वाटला नाही.... ती सगळी मुले माझ्यासारखीच होती. दारिद्र्याने पछाडलेली. . छे ! छे ! आमच्या शेजारचे लोकही श्रीमंत नव्हते... परंतु आम्हाला काही श्रीमंत माणसे परिचित होती... आम्हास ते आदरणीय वाटत. माझ्या आईवडिलांनी ते फारच धनवान लोक आहेत असे मला सांगितले होते... आमच्या शेजारी राहाणारे कापडाचे व्यापारी, ते काहीतरी गैरसमज झाल्यामुळे राहावयास आले असावेत. परंतु आम्ही त्यांना ओळखत होतो आणि त्यांचा आदरही करीत होतो. त्याकाळी श्रीमंत मनुष्य हा आदरणीय होता. त्याच्या संपत्तीमुळे; आणि प्रथम आम्हाला असे वाटे की तो बुद्धिवान असावा.

**मुलाखतकार** – आपणास या गोष्टींच्या अन्यायकारकतेविषयी केव्हा व कशी जाणीव झाली?

**सेलीन** – फारच उशिरा. मला कबूल केलेच पाहिजे. पहिल्या महायुद्धानंतर मी त्यावेळी युद्धजन्य परिस्थितीमुळे नफेखोरी करणारे पहातच होतो. अनेक लोक खंदकात मरत होते. त्यावेळी ऐषआराम करणारे लोक गडगंज पैसा मिळवीत होते. तो मला पहिला इशारा होता. मी माझ्या स्वतःच्या डोळ्यांनी पाहीन असे काहीतरी ते होते. त्यानंतर मी लिग ऑफ नेशन्स (राष्ट्रसंघ) या संघटनेबरोबर काम करीत होतो. त्यावेळी एकदाचे 'शहाणपण' प्राप्त झाले. सोने– पैसा ह्याचीच हुकूमत जगावर होती. याबद्दल शंकाच नाही या संबंधात जराही तडजोड करता येणार नव्हती. ते काहीही असो. मला सामाजिक जाणीव तशी उशिराच झाली! माझ्याकडे ती नव्हतीच.... मी हतबल झालेला होतो.

**मुलाखतकार** – जे प्राप्त झाले ते स्वीकारावे असाच दृष्टिकोन आपल्या मातापित्यांचा होता असे आपण म्हणाल का?

**सेलीन** – अगदी तत्परतेने स्वीकारलेला. माझी आई नेहमी म्हणायची की "हे दुर्दैवी चिमुरड्या, या जगात कोणी श्रीमंत नसता तर आपणास काहीही जेवावयास वा खाण्यास मिळाले नसते. श्रीमंत माणसांना जबाबदारीची जाणीव असते." (ती असे म्हणायची. पण कोठून तरी माझ्या छोट्या डोक्यात कल्पना अगोदरच पैदा झाल्या होत्या.) तुमच्या लक्षात आलेच असेल श्रीमंताविषयी माझ्या आईच्या मनात आदरभाव होता. तिचे हे जे शहाणपण

होते, त्यापासून मी धडा घेतला. अर्थात माझी खात्री पटली होती असे नाही. पण कोणतेही मत बाळगण्याची माझी हिंमतच नव्हती.... छे ! छे ! माझी आई अगदी गळ्यापर्यंत त्या लेसच्या धंद्यात बुडालेली होती. परंतु तिने स्वत: लेस कधी वापरली नाही. ती जे काही तयार करीत असे, ते सारे गिऱ्हाईकांसाठी होते. कधीही नाही... ते तसे करणे बरोबर नव्हते. जवाहिरे आणि त्यांच्या धर्मपत्नी यापैकी कोणीही जडजवाहीर वापरत नसे. . . मी जवाहिऱ्यांचा निरोप्या म्हणून काम केलेले आहे, रोयाल रस्त्यावरील रॉबर्ट पे रस्त्यावरील लाक्लोश.

**मुलाखतकार** – गॉरलोगबद्दल काय? आणि गॉरलोग कुटुंबांबद्दल आपणास काय म्हणायचे आहे?

**सेलीन** –होय. त्याचे नाव वागनर. व्हिएल ड्यू तामप्ल रस्त्यावरचे वागनर होय तोच तो. मी त्याच्याकडे नक्कीच काम केलेले आहे. माझे काम दागिने व इतर जडजवाहीर यांच्या नमुन्यांनी भरलेल्या पेट्या वाहून नेण्याचे. दारोदार नेण्याचे... नमुन्यानी भरलेल्या त्या भल्या मोठ्या कातडी संदुका तुमच्या परिचयाच्या असतील. . . . ते नमुने जस्ताचे बनविलेले असतात. यावरून तुमच्या लक्षात आलेच असेल... मी त्या संदुका घेऊन घरोघर जात होतो आणि मी, आम्ही निरोप्ये तामप्ल रस्त्यापासून तो ऑपेरा एवढा भाग आमच्याकडे होता. या विभागातल्या हमरस्त्यावर जेवढी म्हणून जवाहिऱ्यांची दुकाने होती, त्यातील प्रत्येक दुकान आम्ही निरोप्ये घेत असू... आम्ही सर्वजण एकत्र जमत होतो. आम्ही सर्व जवाहिऱ्यांच्या दुकानातले निरोप्ये ऑमविन्यूच्या पायऱ्यांवर एकत्र जमत असू. त्या. . . खाली जाणाऱ्या पायऱ्या तुम्हाला माहीत असतीलच. आम्ही सर्वजण एकत्र जमायचो. तेव्हा आमचे सर्वांचे पाय चांगलेच दुखत असत. याला कारण आमचे जोडे... माझे पाय नेहमीच दुखायचे. याचे कारण मला नवे जोड वारंवार मिळतच नसत. माझे पाय वाढत असायचे पण जोडे जुनेच... माझी पायाची नखे बाकदार झाली होती. हाय रे दैवा ती अजूनही तशीच बाकदार आहेत.

आम्हाला शक्य होते तेवढे चांगले काम आम्ही करीत होतो. आमचे जोडे तसे लहानच होते. मुले सारखीच वाढत असतात. तुम्हाला माहीत आहेच. मी खरोखरच त्यावेळचा मी... मी त्या दिवसात फारच चपळ होतो. मी प्रत्येक गोष्ट इतक्या चपळाईने करीत असे, की पॅरिमधील भुयारी मेट्रीलाही मागे टाकीत होतो... मीही सगळी दुकाने पायीपायीच करीत होतो... होय, होय सामाजिक जाणीव... मी जेव्हा घोडदलात होतो, तेव्हा प्रिन्स ऑरलॉफ आणि डचेस डी उसेस यांनी दिलेल्या शिकारी पार्टीच्या वेळी मी हजर असे. . . मा अधिकाऱ्यांचे घोडे धरून उभा राही. घोड्यावर बसलेली डचेस मला चांगली आठवते. जेने.. प्रिन्स ऑरलॉफ हा माझ्या पलटणीतल्या सर्व अधिकाऱ्यांबरोबर मिळून मिसळून असे आणि माझे काम घोडे धरून रहाणे एवढेच होते... त्या पलिकडे ते कधीही गेले नाही. आम्हाला मेंढरागत वागविण्यात येई. ते गृहीतच धरले गेलेले होते. वेगळे काही होईल अशी अपेक्षाच नव्हती.

**मुलाखतकार** – अशा रीतीने, आपल्या सामाजिक जाणीवेत. . . ज्यू विरोध दाखल झाला.

**सेलीन** – होय. दुसऱ्याही शोषण करणाऱ्यांच्या कृती माझ्या लक्षात आल्या होत्या. मी लिग ऑफ नेशन्समध्ये काम करताना फार मोठे व्यवहार झालेले पाहिले होते. . . होय. मला आठवतेय. मागाहून क्लीशी येथे राजकीय व्यवहार होताना मी पाहिले. . . ती एक लहानशी जळू होती. . . मला जे आवश्यक होते, ते सारे मी पाहिले होते. तुमच्या प्रश्नाचे उत्तर होय असेच आहे.

**मुलाखतकार** –आपल्या आईचा आपल्यावर फार प्रभाव होता का?

**सेलीन** – दुसऱ्या कशाहीपेक्षा, मी तिचा स्वभाव आपलासा केला होता. ती एक फारच कठीण बाई होती. ती केवळ अशक्य होती. . . तिचे राग, लोभ हे सारे काहीच विशिष्ट होते हे मी नाकारीत नाही. . . तिला जीवनापासून काही आनंदच मिळत नसावा, अगदी अजिबात मिळत नव्हता. नेहमीच काळजीने ग्रासलेली आणि नेहमीच रागाने थयथयाट करणारी. आपल्या आयुष्याच्या शेवटच्या मिनिटापर्यंत ती काम करीत होती.

**मुलाखतकार** –ती आपल्याला कोणत्या नावाने हाक मारीत असे? फर्डिनांड.

**सेलीन** – नाही, लुईस. हॉटेल व्हिल किंवा लूव्ह या विभागांच्या आसपासच्या डिपार्टमेंटल स्टोअरमधील नोकरीत मी कायम व्हावे, अशी तिची इच्छा होती. दुकानात लागणाऱ्या मालाची खरेदी करणारा नोकर म्हणून मी काम करावे, हे तिचे ध्येय होते. माझ्या वडिलांनाही तसेच वाटत होते. याचे कारण त्यांच्याकडे कलाशाखेतील डिग्री असूनही त्यांना फारसे काही करता आले नाही. म्हणून त्यांना असे वाटे की मी धंद्यात प्रवेश केला तर माझा अभ्युदय होईल.

**मुलाखतकार** – आपल्या वडिलांनी शिक्षण क्षेत्रात प्रवेश केला असता, तर त्यांचे अधिक भले झाले नसते का?

**सेलीन** – अर्थात. त्याना चांगले दिवस दिसले असते. गरीब बिचारा ! परंतु त्याचे असे झाले, त्यांना शिक्षणक्षेत्रातील पदवीची आवश्यकता होती. त्यांच्याकडे सर्वसाधारण कला–क्षेत्रातील फक्त पदवी होती. आणि शिक्षण क्षेत्रातील पदवी त्यांना घेता आली नाही. याचे कारण त्यांच्याकडे पैसे नव्हते. त्यांचे वडील वारले आपल्या पाठीमागे पत्नी व पाच मुले ठेवून.

**मुलाखतकार** –आपले वडील चांगले वृद्ध होऊन वारले का?

**सेलीन** –ते इ. स. १९३१ साली वारले. 'व्होयाज हे पुस्तक प्रसिद्ध होण्याअगोदर.

**मुलाखतकार** –ही आपली पहिली कादंबरी प्रसिद्ध होण्याअगोदर?

**सेलीन** – होय, अगदी थोडे दिवस अगोदर. त्यांना ती कादंबरी आवडली नसती. . शिवाय ते असूयाग्रस्त होते. . . त्यांना माझ्याकडे एक लेखक या स्वरूपात पहाताच आले नसते. तसे पाहिले तर मीही स्वतःकडे एक लेखक म्हणून बघतच नाही. निदान या मुद्यावर

आमचे दोघांचे एकमत होते.

**मुलाखतकार** –आपल्या पुस्तकांसंबंधी आपल्या आईची प्रतिक्रिया काय होती?

**सेलीन** – तिला ती पुस्तके धोकादायक, घृणास्पद, आणि काहीना काहीतरी आरिष्ट आणणारी. . . गोष्टीचा शेवट वाईटच होणार अशी तिची अपेक्षा होती. सावधगिरीने वावरणातली ती होती.

**मुलाखतकार** –तिने आपली पुस्तके वाचली होती का?

**सेलीन** – नाही. तिला ती वाचताच आली नसती. ती सर्वच तिच्या डोक्यावरून जाणारी होती. तिला ती पुस्तके हीन दर्जाची आहेत असे वाटले असते. ते काहीही असो. तिने ती पुस्तके वाचलेली नव्हती. ती पुस्तके वाचणारी बाईच नव्हती. . . नाही तिला दंभ अजिबात नव्हता. . . मला तिच्या मृत्यूची बातमी कळली. . . मला तिच्या मृत्यूची बातमी समजली तेव्हा मी नुकताच कोपनहागनमध्ये दाखल झालो होतो. . . सर्व दृष्टीने नापसंत व त्रासदायक अशी सफर,अगदी दुर्गंधी पसरवणारी. . . . होय. तिच्या मृत्यूची वेळही तिच्यात खोड काढता येणार नाही. अशी सर्वस्वी अरुचीची. . . . परंतु विसरू नका, गोष्टी एका विशिष्ट दृष्टिकोनातून सर्वस्वी अरुचीच्या असतात. . .

खरे म्हणजे तुम्हाला माहीतच आहे, अनुभव हा काजळी आलेल्या कंदिलासारखा असतो. त्याचा प्रकाश तो कंदील जो कोणी नेत असतो त्यावरच पडतो. . . . त्यातून संपर्क साधताच येत नाही. . . म्हणूनच या सर्व गोष्टी मी माझ्यापाशीच ठेवणे चांगले.

मला त्याबद्दल असे वाटते की प्रत्येक व्यक्ती ही मरणारच असते. आपल्याकडे एखादी चांगलीशी कथा सांगण्यासारखी असली म्हणजे मग त्याने जावे. तुम्ही आपली सांगितलीत आणि तुम्ही पुढे चालू लागलात. प्रतिकात्मक भाषेत बोलायचे झाल्यास 'हप्तेबंदीचे मरण' ही कादंबरी त्या संबंधीच आहे. मृत्यू हे जीवनाचे पारितोषिक आहे. . . . ईश्वराची अधिसत्ता नसून ती सैतानाची आहे. हे एकदा पाहिल्यानंतर . . . . माणूस अगर निसर्ग दुर्गंधी पसरवितो. पक्षी आणि इतर प्राण्यांच्या आयुष्याकडे नजर टाका.

**मुलाखतकार** – आपण आयुष्यात सुखी केव्हा होतात?

**सेलीन** – कधीही नाही. मला वाटते याचे कारण वय होऊ लागले आहे; मला गरज आहे. . . मला वाटते मला जर कोणी गडगंज पैसा दिला, तर मग काळजीच करावी लागणार नाही. . . मला ते आवडेल. . . कोठेतरी जाण्याची संधी मला त्यामुळे मिळेल आणि तेथे मी काहीही करणार नाही. . . फक्त दुसऱ्या लोकांकडे बघत बसेन. . . मला कोणीही त्रास द्यायला नाही, माझा मीच समुद्राच्या काठी बसून आहे. . . ते खरे सुख आहे आणि फारच थोडे खायचे. . . होय. अगदी बरोबर. जवळजवळ काहीच खायचे नाही. . . माझ्याकडे मेणबत्ती असावी. मला वीज आणि त्यावर चालणारी साधने घेऊन व ती वापरून राहण्याची इच्छा नाही. . . एक मेणबत्ती ! मला एक मेणबत्ती द्या, आणि मग मी वृत्तपत्र वाचीन. . . बाकीचे लोक, मी त्यांना ज्याप्रकारे पाहातो आहे, त्यावरून ते सारे उधाण आल्यासारखे वाटतात.

अधिक करून महत्त्वाकांक्षा त्याना पुढे लकटीत असते.

श्रीमंताचे जीवन ही एक सर्कस आहे. श्रीमंत एकमेकांना बोलवतात. त्यांना आपला उत्साह टिकवून धरायचा असतो... ओ गॉन ट्रान, तो तुम्हाला खरेच असे म्हणाला, ओ गान ट्रॉ काल तू मला खरोखराच चमक दाखविलीस. त्याला तू त्याची जागा अशा रीतीने दाखवून दिलीस ! होय, खरोखरच कालच पुन्हा एकदा त्याने त्याचा उल्लेख केला. त्याची पत्नी म्हणाली, ओ गानट्रॉने विस्मयचकित केले !... होय, ती सर्कसच आहे. ते आपला वेळ तसाच घालवितात, ते एकमेकांचा गोलगोल फिरून पाठलाग करतात. एकाच गोल्फ क्लबमध्ये, एकाच उपहारगृहात त्यांच्या गाठी भेटी होतात.

**मुलाखतकार** – समजा. आपल्या आयुष्याला पुन्हा एकदा पहिल्यापासून सुरुवात करायची झाली, तर मग वाङ्मयाव्यतिरिक्त अन्य क्षेत्रातून आनंद मिळवाल का?

**सेलीन** – अगदी नक्कीच. मी आनंद मिळावा अशी अपेक्षाच करीत नाही. मला आनंद वाटतच नाही... जीवनाचा आस्वाद घेणे, हा एक मनोवृत्तीचा भाग, आपण काय सेवन करतो याचा एक भाग आहे. आपण जर सुग्रास अन्न खाल, चांगली पेये प्राशन कराल, एखादी मोटारगाडी घेऊन फेरफटका करून याल... आपल्या आवडत्या वृत्तपत्राचे वाचन करता, काही लोक आपल्याला भेटायला येतात. आपण सकाळची कॉफी पितो, आपण थोडे फिरायला जातो, मग दुपारच्या जेवणाची वेळ होते... दुपारी काही मित्रांच्या घरी जातो... अशा रीतीने दिवस संपतो. रात्री नेहमीप्रमाणे बिछान्यात झोपी जातो. आपले दिवस हे असे जात असतात. विशेषत: आपले वय जसजसे होत जाते... कारण मग वेळ फार झटकन निघून जातो, आपण तरुण असतो, तेव्हा दिवस संपता संपत नाही. परंतु आपले वय जसे होते... त्याला फारसा वेळ लागत नाही, आपल्या पेन्शनवर जगणारे, आपण एक वृद्ध गृहस्थ असतो. दिवस झटक्यात जातो. कारण आपण जेव्हा अगदीच छोटे असतो, तेव्हा दिवस फार हळूहळू जातो.

**मुलाखतकार** – आपणास कायमचे एक वर्षासन दिले, तर आपण आपला दिवस कसा घालवायचे पसंत कराल?

**सेलीन** – मी एखादे वृत्तपत्र वाचीन. मला जेथे कोणी पाहणार नाही अशा ठिकाणी मी फिरायला जाईन. फिरायला जाईन तोही थोडेसे अंतर.

**मुलाखतकार** – आपणास या ठिकाणी फिरायला जाणे शक्य आहे का?

**सेलीन** – नाही. मी फिरायला जाऊ नये हे चांगले.

**मुलाखतकार** – का?

**सेलीन** – पहिले कारण मी लोकांच्या लक्षात येईन. मला ते आवडत नाही. लोकांच्या मी लक्षात यावे हे मला आवडत नाही. एखाद्या बंदराच्या गावात आपल्याला अदृश्य होता येते.. ल हाव्र या बंदराच्या गावात. ल हाव्र बंदराच्या गोदीत कोणी एखादा मनुष्य आपल्या लक्षात येईल असे मला वाटत नाही. कोणालाच काहीच दिसत नसते. एक सेवानिवृत्त खलाशी एक

मूर्ख म्हातारा...

**मुलाखतकार** –आपल्याला होड्या– जहाजे आवडतात खरे ना?

**सेलीन** – होय. नक्कीच मला जहाजे बघायला आवडतात. बंदरात येताना– जाताना नक्कीच. मला एक जेटी (लाकडाचा धक्का) द्या आणि मी सुखी आहे. ती जहाजे फेसाचा पट्टा मागे सोडून जातात, त्या होड्या दूर जातात, त्या परत येतात आणि आपल्याशी त्याचे देणे घेणे काहीच नसते ! आपल्याला कोणीही विचारत नाही. होय नक्कीच आपण 'ल पती हाव्र' हे वृत्तपत्र वाचतो... ते सारे तेवढेच... जे काय व्हायचे असते ते तेवढेच... होय. मला जर माझे आयुष्य पुन्हा एकदा सुरुवातीपासून जगायचे झाले, तर मग ते अगदी सर्वस्वी वेगळेपणाने जगेन.

**मुलाखतकार** –अशी एखादी व्यक्ती आहे का, ती आपण आदर्श मानता? आपणास ज्याचे अनुकरण करावयास आवडले असते असे कोणी आहे का?

**सेलीन** – नाही. याचे कारण त्यांच्यासारखे लोक हे फार बडेजावी असतात. मला बडेजावी बनण्याची इच्छा नाही. कोणीही ज्याच्याकडे लक्ष देत नाही, असा एक म्हातारा मनुष्य होण्याची माझी इच्छा आहे... नाही... त्यांच्यासारखे जे लोक असतात, त्यांचे संदर्भ ग्रंथात असतात. मला तसले काही आवडत नाही.

**मुलाखतकार** – दैनंदिन आयुष्यात आपल्याला काही लोक भेटले असण्याची शक्यता आहे, मी त्यांच्याबद्दल विचार करीत होतो.

**सेलीन** –छे, छे नाही. ते नेहमीच एखाद्या नाटकात भूमिका केल्यासारखे वागतात. दुसरी माणसे मला दुःखच देतात. माझ्याकडे माझ्या आईकडून, एक प्रकारचा नम्रपणाचा वारसा हक्काने आलेला आहे. अगदी सर्वस्वी नगण्य आणि मी सर्वस्वी नगण्य आहे हेच सांगतो. माझ्याकडे पूर्णपणे दुर्लक्ष केले जावे यातच मला रस आहे. माझी प्रवृत्ती आहे. . . अगदी एखाद्या प्राण्यागत सरपटत दूर जाण्याची प्रवृत्ती . होय बुलान्स माझ्या चांगलेच सोईचे आहे. बुलॉन्स– स्यूर– मेर. तेथे कोणीही जात नाही. सॉं– मालो या ठिकाणी खूप काळ घालविला आहे. पण यापुढे ते शक्य नाही... त्या ठिकाणी मी तसा परिचित आहे. रॅन्स येथील वैद्यकीय महाविद्यालयात, मी विद्यार्थी म्हणून होतो.

**तीन**

(सेलीन यांची शेवटची मुलाखत १ जून १९६१ मुलाखतकार आँद्रे परिनोद)

**मुलाखतकार** –आपल्या कादंबऱ्यातून 'प्रेम' या भावनेला महत्त्वाचे स्थान आहे का?

**सेलीन** –अजिबात स्थान नाही. ते असूही नये. कादंबरीकाराला शरम या भावनेची जाण असावयास हवी.

**मुलाखतकार** –आणि मैत्री.

**सेलीन** –आपण ते मागे टाकू या.

**मुलाखतकार** –मग त्यामानाने कमी महत्त्वाच्या भावना आहेत, त्यासंबंधी बोलणे

पसंत कराल का?

**सेलीन** –आपण कामासंबंधी बोलू या. लेखन करण्याविषयी. फक्त तीच एक गोष्ट जमेस धरण्याजोगी आहे आणि ते करीत असताना सुद्धा फारच मोठ्या प्रमाणात सावधता व विवेक दाखवावा लागतो. लोक या गोष्टीसंबंधी बोलतात, तेव्हा त्यात नको इतकी जाहिरात असते. आम्ही लेखक हे जाहिरातीचे भक्ष्य आहोत. सारेच चीड आणणारे. नम्रता वा नेमस्तपणा अंगी बाणविणारे औषध लोकांनी घेण्याची वेळ केव्हाच आलेली आहे.

इतर गोष्टीप्रमाणे साहित्याचे आहे. आपण त्या ठिकाणी जाहिरातीमुळे घृणास्पद बनतो; अगदी तिरस्करणीय बनतो. आपले काम करा आणि गप्प बसा. तोच एकमेव मार्ग आहे. लोक ते वाचतील अथवा वाचणार नाहीत. तो त्यांच्या मर्जीचा प्रश्न आहे. लेखकाला एकच गोष्ट करता येण्यासारखी आहे. त्याने स्वत:स दुर्मिळ बनवून टाकावयाचे.

**मुलाखतकार** –लेखनापासून जो आनंद मिळतो, त्यासाठी आपण लेखन करता का?

**सेलीन** –नाही. निश्चितच नाही. माझ्याजवळ पैसे असते, तर मी एक शब्दही लिहिला नसता. ते तर माझे पहिले तत्त्व आहे.

**मुलाखतकार** –प्रेमापोटी अगदी द्वेषापोटी आपण लिखाण करीत नाही का?

**सेलीन** –अर्थातच नाही. त्या भावनांचा अनुभव मला आला, तर तो माझा स्वत:चा प्रश्न आहे. लोकांचा त्याच्याशी काहीही संबंध नाही.

**मुलाखतकार** –आपले जे समकालीन आहेत. त्यांच्यात आपणास जरूर रस आहे.

**सेलीन** –छे, हो नाही. अजिबात नाही. मी त्यांच्यात फक्त एकदाच लक्ष घातले. त्यांना युद्धापासून परावृत्त करण्याचा प्रयत्न मी केला. पण वेगळेच घडले. त्यानी युद्ध केले नाहीच पण भीतीच्या भाराने वाकलेल्या अवस्थेत ते परतले. आणि मग त्यानी मला तुरुंगात फेकून दिले. मी माझ्या स्वत:वरच लक्ष केंद्रित करावयास हवे होते.

**मुलाखतकार** –ते काहीही असो. आपल्या अगदी अलिकडच्या बहुतेक कादंबऱ्यातून काही भावना प्रकट होतातच ना?

**सेलीन** –लेखक कोणत्याही भावना आविष्कृत करील. पण त्याला काहीही अर्थ नाही.

**मुलाखतकार** –आपल्या अलिकडच्या कादंबऱ्यातून आपल्या अंतर्गत आयुष्याचा काही भाग प्रकट झालेला नाही असे सांगून त्यासाठी आपण आम्हा वाचकांचे मन वळविण्याचा प्रयत्न करीत आहात का?

**सेलीन** –अंतर्गत आयुष्य? नाही. अगदी काहीही नाही. कदाचित एखादी गोष्ट असेल आणि तेवढी एकच. मला जीवनाचा आस्वाद कसा घ्यायचा हे माहीत नाही ही वस्तुस्थिती आहे. मी जिवंतच नाही. मी अस्तित्वात नाही. यामुळे ज्या लोकांना दुर्गंधी येत असते, त्यांच्यापेक्षा मला काही प्रमाणात श्रेष्ठत्व प्राप्त होतेच, आता हे नाकारता येणार नाही. त्यांना दुर्गंधी येण्याचे कारण, ते आयुष्याचा आस्वाद घेत असतात हे आहे. आयुष्याचा आस्वाद घेणे म्हणजे खाणे, पिणे, ढेकर देणे, रतिसुख घेणे इत्यादी गोष्टी. परंतु त्यामुळे स्त्री अथवा

पुरुषाचा पार कचरा होऊन जातो. मी वेश्यागमन करीत नाही आणि ते माझ्या दृष्टीने सुदैवाचे आहे. मला कशाची निवड करायची याची चांगली माहिती आहे. माझ्याकडे आस्वाद घेण्याची क्षमता आहे.

परंतु रोमन लोक म्हणत असत त्याप्रमाणे स्त्री– सुख घेणे याचा अर्थ वेश्यागृहात जाणे हा नाही. गेल्यानंतर धड शरीराने परत न येणे म्हणजे वेश्यागृहात जाणे. मी माझे सर्व आयुष्यभर वेश्यागृहात गेलो आहे. परंतु मी नेहमीच धड शरीराने बाहेर आलो. मी दारू पीत नाही. खाण्याबद्दल चोखंदळ नाही. या गोष्टी मला कंटाळा आणतात. तो माझा अधिकारच आहे नाहीं का? माझी एकच इच्छा आहे. झोप घेणे आणि मला एकट्यालाच राहू देणे. पण तसे होत नाही.

**मुलाखतकार** –आपल्या दृष्टीने खरे प्रज्ञावान लेखक कोण आहेत?

**सेलीन** –कादंबरी लेखनाचा जो सुवर्णकाळ होता, त्यात तीन लेखक होऊन गेले अशी माझी भावना आहे. मोरँड, रतुझ आणि बारकझ हे ते तीन लेखक. या लेखकाना वाङ्मयाची नस सापडली होती. इतर लेखक त्याबाबतीत अनभिज्ञ होते. त्यांचा तो विषयच नाही. ते सारे अगदी पार तोतये आणि ते तातये तर पहिले सारे क्रमांक पटकावून बसले आहेत. साहित्य समीक्षक जर सावध राहिले नाहीत, तर हे फसवेगिरी करणारे लोक वाङ्मय केव्हाच गिळंकृत करतील. तेच अगोदर घडले आहे म्हणा. मैल्याच्या खाडीच्या मुखाशी साहित्य–समीक्षक आहेत.

**मुलाखतकार** – आपण या साऱ्या गोष्टीपासून स्वतःस अलग करून घेताना दिसता. परंतु आपण तर या शतकातल्या अत्यंत संवदेनाक्षम व भावना प्रधान लेखकांपैकी एक आहात.

**सेलीन** – होय आहे. पण इतःपर नाही. त्यांनी मला फारच सतावले आहे. मला त्यांचा आता कंटाळा आता आहे. मला त्यांची दया येते; असे इतःपर होणार नाही. आता मला त्यांच्याशी काहीच कर्तव्य नसते. ते मला बोअर करतात.

**मुलाखतकार** – आपण कडवट झाला होता का? तत्त्वज्ञानी झाला होता? तुच्छता दर्शवित होता?

**सेलीन** – नाही, नाही, अजिबात नाही. हे शब्द फारच झाले. माझा ज्ञानकोश अशा शब्दांनी पार भरलेला आहे. निव्वळ विष्ठा. मला दुसऱ्यावर मात कशी करायची हें माहीत आहे. इतर लोकांना माहीत नाही.

**मुलाखतकार** – आपण अजूनही आपणास हयात असलेल्या लेखकातील सर्कत श्रेष्ठ लेखक मानता का?

**सेलीन** – नाही. अजिबात नाही. महान लेखक. . . मला या विशेषणाशी काय कर्तव्य आहे? तुम्हाला प्रथम मरावे लागते आणि एकदा मेलात की मग ते वर्गवारी करतात. पण प्रथम तुम्हाला मेलेच पाहिजे.

**मुलाखतकार** – भविष्यकाळ आपणास न्याय देईल याबद्दल आपली खात्री आहे का?

**सेलीन** – छे. नाही. अर्थात माझी खात्री पटलेली नाही. छे, नाही ! फ्रान्स नावाचे काही शिल्लक राहील हे तरी कोणास माहीत आहे? कदाचित चिनी अथवा बर्बर हे दप्तरखान्याचा शोध घेतील आणि माझे नशा उत्पन्न करणारे वाङ्मय, माझी 'फॅन्सी शैली' आणि लेखनातली ती तीन टिंबे, यातल्या कशाबद्दलही त्यांना काहीही वाटणार नाही. . . त्यासाठी एखादा 'जिनिएस' लागत नाही. आपण सध्या वाङ्मय या विषयासंबंधी बोलत आहोत. मी तो विषय माझ्या लेखी केव्हाच संपविला आहे. 'हप्तबंदीचे मरण' प्रसिद्ध झाल्यानंतर मला जे काही म्हणायचे होते. ते सर्व सांगून टाकले आहे, अर्थात त्यात फारसे काही नव्हते.

**मुलाखतकार** – आपण जीवनाचा द्वेष करता.

**सेलीन** – मी त्यावर प्रेम करतो असे म्हणता येणार नाही. मी फक्त ते सहन करतो. कारण मी जिवंत आहे. आणि माझ्यावर जबाबदाऱ्या आहेत. तसे नसते तर मी ज्यांचे वर्णन नैराश्यवादी विचारधारा असे करीन, त्याच शाखेचा मी आहे.

**मुलाखतकार** – या पृथ्वीतलावर आपल्या आदरास पात्र होईल असा कोणी आहे का?

**सेलीन** – माझ्या आदरास पात्र? माझ्या आदरास पात्र होण्याबद्दल आजवर कोणीही विचारणा केलेली नाही. माझ्या आदरास एखादा पात्र झाला आहे अथवा नाही, अशा प्रकारची शिफारस पत्रे बहाल करण्याचा मला काय अधिकार आहे? त्याचा अर्थ काय? काहीही नाही. वैज्ञानिकदृष्ट्या विचार करता काहीही नाही. चांगल्या वर्तणुकीसाठी मी काय म्हणून प्रशस्तीपत्रे द्यावीत. मला त्याच्याशी काहीही कर्तव्य नाही.

**मुलाखतकार** – आपली ही भावना ही तशी आगतिकतेची भावना आहे.

**सेलीन** – का बरे? अजिबात नाही. आगतिकता ही काय भानगड आहे. त्याचा गर्भित अर्थ असा आहे की मी कशाची तरी आशा बाळगून आहे. मी कशाचीही आशा करीत नाही. शक्य असेल तेवढ्या वेदनाविरहित मृत्यूची आशा करतो. इतर सर्वांप्रमाणे तेवढेच. माझ्यासाठी, माझ्यामुळे माझ्याजवळ कोणाला काहीही सोसावे लागू नये अशी आशा मी करतो. अगदी शांतपणे मृत्यू येणे. थ्रामब्रासिस मृत्यू येणे; की मीच स्वत:ला निकालात काढणे शक्य झाले तर ती सगळ्यात सोप्यात सोपी गोष्ट. दिवसेंदिवस गोष्टी अधिक अधिक बिकट होत जाणार आहेत. एक वर्षापूर्वी पासून आजकाल काम करणे अधिकाधिक कठीण होत चालले आहे. येत्या वर्षी ते याही वर्षापेक्षा आणखीनच कठीण असेल. तीच तर माझी कथा आहे –

---

# पाश्चिमात्य कादंबरीचे मानकरी

## जोव्हान्नी बोकाचीओ

— विष्णु सदाशिव ब्रम्हे

युरोपीय मध्ययुगीन वाङ्मयाचा एक साचा ठरून गेलेला होता. प्रचलित दंतकथांच्या आधारे प्रेम, शौर्य, कपटकारस्थान, लढाई यासारखेच विषय प्रामुख्यानं लेखक हाताळत असे. लेखन करते समयी सद्गुण-दुर्गुणांची तत्कालीन प्रमाणित जंत्री त्याच्यासमोर असे. नीतिजाण वाचून मानवी साहस कथेची परिपूर्ती होत नव्हती. यातून वेगळी वाट चोखाळायचा विचार कोणाच्याही मनाला स्पर्शून जात नव्हता. लेखनाची, वर्ण्यविषयाची चाकोरी ठरलेली होती. त्या चाकोरीतून स्वत:च्या लेखन प्रकृतीनुसार वाटचाल करायची एवढंच त्याला ठाऊक होतं. वाचकाला अथपासून इतीपर्यंत खिळवून ठेवणं यासाठीच त्याचं लेखनकौशल्य खर्ची पडत होतं. थोडक्यात, पूर्वसूरींना अनुसरून कथा मागील पानावरून पुढं सरकत होती.

आणि एक दिवस आक्रीत घडलं. प्लेगचं जीवघेणं अरिष्ट कथासृष्टीला वरदान ठरलं. या साथीनं जोव्हान्नी बोकाचीओला (१९१३-७५) 'ह्यूमन कॉमेडी'ची एक चौकट पुरवली. त्यातून समकालीन जीवनाचं वास्तववादी दर्शन प्रथमत:च घडलं, कथा लेखनानं एक नवीन वळण घेतलं.

बोकाचीओ हा फ्लॉरेन्समधील एका धनाढ्य बँकरचा अनौरस पुत्र. तथापि, वडिलांच्या कुटुंबांत त्याला चांगली वागणूक मिळत होती. फ्लॉरेन्सलाच त्याच्या शिक्षणाला प्रारंभ झाला. लॅटिन आणि 'अकाउंटिंग' यांचं शिक्षण त्यानं घेतलं. बँकेच्या व्यवहाराबाबतचं ज्ञान त्याला मिळावं, तिथल्या आर्थिक उलाढाल्या त्याला कळून याव्यात म्हणून त्याच्या वडिलांनी त्याच्या वयाच्या चौदाव्या वर्षी त्याची नेपल्समधील बार्दी शाखेत पाठवणी केली. कपाळाला आठ्या घालून त्यानं तिथं शिकाऊ बँकर म्हणून काम केलं. त्यानंतरची सहा वर्ष नाखुषीनं विद्यापीठात 'कॅनन लॉ' शिकला. या काळात नेपल्सच्या राजदरबारी त्याला प्रवेश मिळाला. बँकरच्या व्यवसायामुळे त्याला झालेला हा लाभ. तिथं त्यानं पाहिले, 'कामासक्त उमराव आणि नरवीर' आणि त्यांच्या संगे 'झगमगणाऱ्या सुवर्णालंकारात चमकणाऱ्या आणि मौल्यवान आणि अत्यंत दुर्मिळ हिऱ्यांनी मढलेल्या कुलीन मडमा.'

इथल्या या आनंददायी क्षणांनी आयुष्याच्या अखेरपर्यंत सोबत केली, त्याच्या तारुण्यातील दिवसांच्या स्मृती उजळत्या ठेवल्या. इथंच एका 'लेडी'शी त्याचे संबंध जुळून आले. फिआयेत्ता या नावानं ती ओळखली जाते. हे अर्थातच कृतक नाव आहे. या स्त्रीनं त्याच्या आयुष्यात आणि साहित्यात एक महत्त्वपूर्ण भूमिका वठवली. त्याच्या प्रथम भेटीत त्या देखण्या देदीप्यमान स्त्रीच्या पाणीदार डोळ्यांनी 'माझ्या डोळ्यांत विंधणाऱ्या दीप्तीनं

पाहिलं. . . ज्यांनी, माझ्या डोळ्यांद्वारे पुढं सरकत माझ्या हृदयावर एवढा जबरदस्त आघात केला की तेव्हाची ती धडधड अद्यापिही कायम आहे.' पण बोकाचीओनं लग्न मात्र केलं नाही. तो जन्मभर अविवाहितच राहिला पण पाच अनौरस पोरांचा बाप झाला. त्यांच्या आया कोण हे कधीच कोणाला कळू शकलं नाही.

१३४० मध्ये बोकाचीओच्या वडिलांच्या बँकेचं दिवाळं निघालं. बोकाचीओ फ्लॉरेन्सला परतला. हद्दपारीची सजा भोगत असलेल्याची जिंदगी व्यतीत करू लागला. नेपल्समधील त्याच्या एका घनिष्ट मित्राला पाठवलेल्या पत्रात त्यानं लिहिलं, 'माझ्या इच्छेविरुद्ध मी फ्लॉरेन्समध्ये आहे, तत्संबंधी मी तुला काहीच सांगणार नाही. कारण मला ते लिहावं लागेल शाईनं नव्हे तर आसवांनी' आणि 'दैवाचा दुष्मन' म्हणून सही केली.

बोकाचीओचं प्रारंभीचं लिखाण हे नेपल्सच्या सुपीक साहित्यिक जीवनाचा परिपाक होता. वयाच्या सत्ताविसाव्या वर्षी तो तस्कनीला परतला, तत्पूर्वी प्राक्कथा आणि साहसपूर्ण कथा यांसारख्या शिष्टसंमत वाङ्मयप्रकारात त्यानं लिखाण केलं होतं. कथा त्यानं गद्यातून लिहिल्या, पद्यातून सांगितल्या. 'तेझारिमा' मध्ये डायना व व्हीनस या सौंदर्यवतींमधील स्पर्धा व तरुण प्रियकरांनी केलेला त्यांचा अनुनय ही जुनीच कथा त्यानं कथन केली आहे.' 'इल फिलोस्त्रातो' (Il Filostrato) मध्ये ट्रॉइलस आणि क्रेसिडा यांची प्रेमकहाणी गुंफलेली आहे. चारण नसलेल्या कवीनं इटालियन भाषेत लिहिलेली ही पहिली पद्यमय प्रेमकहाणी. या महाकाव्याच्या आधारे चॉसरनं (१३४३ – १४००) काव्य रचलं तर शेक्सपिअरनं (१५६४ – १६१६) नाटक लिहिलं. 'तेसेइदे' (Teseide) या महाकाव्यात एकाच स्त्रीवर प्रेम करणाऱ्या दोन मित्रांची कहाणी आहे. तस्कन बोलीभाषेत लिहिलेलं हे पहिलं महाकाव्य. यावर आधारित 'नाइट्स टेल' ही कथा चॉसरच्या 'कँटरबरी टेल' मध्ये समाविष्ट झालेली आहे.

वडिलांचा आर्थिक आसरा वा झगमगीत राजदरबारातील मनोरंजन याविना बोकाचीओचा फ्लॉरेन्समधील प्रत्येक दिवस रटाळपणे पुढे सरकत होता. नोकरी वा आश्रयदाता लाभतो का ते अजमावण्यासाठी त्यानं रावेन्नाची (Ravenna) वारी केली, पण पदरी निराशा पडली. १३४८ च्या वसंतात तो हात हलवत माघारी नेपल्सला परतला तेव्हा तिथं 'कभित्र कृतांता'नं – 'ब्लॅकडेग'नं थैमान मांडलेलं होतं. 'कभित्र कृतांत' म्हणजे प्लेग, उंदरामुळे तो रोग फैलावतो, गाठ येऊन ह्यातच माणसाचा तडकाफडकी अंत होतो, हे आता आपल्याला ठाऊक आहे. पण चौदाव्या शतकात, जेव्हा रोगाचं निदान वा त्यावरील उपचार ज्ञात नव्हते, तेव्हा मानवी जीवनावरील लहरी दैवाचं अधिराज्य हीच भावना प्रबळ होती. ही भावना बळावण्याचं कारण, जवळ जवळ आठव्या शतकानंतर अशा प्रकारच्या जीवघेण्या साथीपासून युरोप तसं मुक्त होतं. या साथीचं खापर पहिल्या प्रथम फोडण्यात आलं ते ज्यूंवर. सर्व जर्मनीत हजारो ज्यूंची कत्तल करण्यात आली. १३४७ च्या ऑक्टोबरमध्ये प्लेगनं युरोपमध्ये प्रवेश केला, काळ्या समुद्राकडून येणारी जहाजं मेस्सिनाच्या सिसिलियन बंदराला लागली, तेव्हा आणि त्यानंतर तीन वर्षात या साथीनं युरोपची एक तृतियांश लोकसंख्या

खतम केली. लोक म्हणत होते,'जगाचा अंत ओढवला आहे.'

उत्तर मध्ययुगीन युरोपचं पुष्प. म्हणून गौरवलेल्या फ्लॉरेन्सला प्लेग पोचला तेव्हा त्या शहरातील मुलकी व्यवस्था पार कोलमडून गेली होती. तिच्या अत्यंत महत्त्वाच्या बँकांचं, त्यात बोकाचीओच्या वडिलांची बँकही होती, दिवाळं वाजलेलं होतं. 'फ्लॉरेन्सच्या वेशीच्या आत एक लाखाहून अधिक माणसं मृत्युमुखी पडली' हे बोकाचीओचं विधान अर्थातच अतिशयोक्तिपूर्ण आहे. आज आपल्याला जी खात्रीलायक आकडेवारी उपलब्ध आहे त्यानुसार किमान पन्नास हजार तरी त्या साथीला बळी पडले होते. धडधाकट माणसं झोपी जात आणि त्यांना जाग येण्यापूर्वीच प्लेगनं त्यांचा जीव घेतलेला असे. संसर्गाची लागण झालेली व्यक्ती पाच दिवसांपेक्षा अधिक जगली आहे असं क्वचितच घडे. याहूनही कमी दिवसांत कित्येकांनी प्राण गमावले होते. असं म्हटलं जात असे, रुग्णाला तपासत असतानाच डॉक्टरला लागण होऊन तो खोलीबाहेर पडण्याआधीच त्याच्या आयुष्याची दोरी तुटण्याची शक्यता फार. जिओवान्नी व्हिल्लानी (१२८० – १३४८) हा फ्लॉरेन्सचा बखरकार लिहायला बसला असताना त्याचं वाक्य पूर्ण करण्याची संधीही प्लेगनं त्याला दिली नव्हती. प्लेगनं जो हाहाकार माजवला होता, विध्वंस करून टाकला होता त्यासंबंधीच्या आठवणी पुढील पिढ्यांना दंतकथा वाटतील, असं पेयार्कनं (१३०४ – ७४) नमूद करून ठेवलेलं आहे.

आपल्या सुदैवानं, बोकाचीओ त्या काळात फ्लॉरेन्सला असूनही जिवंत राहिला, १३४८–५२ या काळात त्यानं 'देकामेरॉन' लिहिलं आणि त्या अद्‌भुत पुस्तकाच्या वाचनाचा आनंद आपण आज घेऊ शकतो. प्लेगचा त्याचा प्रत्यक्षदर्शी वृत्तांत 'पहिल्या दिवसाचं प्रास्ताविक' बनतो. प्रेमामध्ये त्याच्या स्वत:च्या वाट्याला जे दारुण वैफल्य आलं त्यासाठी वाचकांच्या सहानुभूतीची याचना करीत तो ग्रंथारंभीच सांगतो : 'विपत्तीमधील माणसांची कणव करणं हा मानवी गुण आहे, जो प्रत्येक स्त्री पुरुषाच्या अंगी असायला हवा.' ज्यांनी ज्यांनी त्याच्याविषयी सहानुभूती दाखवली आहे त्या साऱ्यांना तो हे पुस्तक अर्पण करतो. खास करून स्त्रियांना, 'ज्यांना त्याची अत्यंत गरज आहे.' आणि अशा प्रकारचं प्रोत्साहन, कितीही थोडकं असलं तरी, पुरुषांपेक्षा देखण्या स्त्रियांना देणं कोण नाकारील?

कारण, भीती वा शरमेपोटी, स्त्रिया त्यांच्या कोमल उरोजात वासनांच्या ज्वाला दडवून ठेवतात, आणि दडवून ठेवलेलं प्रेम अतिशय बळकट असतं, उघडपणे दाखवलेल्या प्रेमापेक्षा, या अशा गोष्टींचा ज्याला अनुभव आहे तो हे जाणतोच शिवाय आपले मातापिता, बंधू, पती यांच्या लहरी, आवडीनिवडी आणि हुकूमत यांना अनुसरण्याची जबरदस्ती त्यांच्यावर करण्यात येते. परिणामी, त्यांचा बराचसा काळ त्यांच्या खोल्यांच्या चार भिंतीच्या खुराड्यात त्या कोंडल्यागत व्यतीत करतात, तिथं त्या रिकामटेकड्या बसतात. विविध गोष्टींचं चिंतन करीत, ज्या नेहमीच चिंतन करण्याएवढ्या सुखद असतीलच असं नाही.' ज्या प्रेमात पडल्या आहेत, अशाच स्त्रियांचं मनोरंजन करण्याचं, त्यांना सहाय्य करण्याचं तो आश्वासन देतो. कारण बाकीच्या त्यांच्या सुया, त्यांची रिळं आणि सुताळ्या यात वेळ घालवू

शकतात. मी कथन करणार आहे शंभर कथा, नीतिपर, दृष्टांतपर, ऐतिहासिक, वा तुम्ही त्यांच्यासाठी जे काही नाव निवडाल अशा प्लेगच्या कचाट्यातून पळ काढलेल्या सात स्त्रिया आणि तीन पुरुष दहा दिवसात त्या सांगणार होत्या.

१३४८ 'प्राणघातक साथी'चं जे कटू वर्णन तो आता करणार आहे त्याबद्दल 'पहिल्या दिवसाच्या प्रास्ताविका'त तो क्षमा मागतो. 'ज्यांनी स्वत:च्या डोळ्यांनी ते पाहिलेलं आहे अशा बहुसंख्यांकांपैकी तो एक आहे' ही वस्तुस्थिती आहे. त्यावर विश्वास ठेवणंही मला जड जात आहे. रोगाचा वणव्यागत फैलाव, संसर्ग टाळण्यासाठी केलेली व्यर्थ धडपड, घबराट उडालेल्या फ्लॉरेन्सवासीयांचा उफराटेपणा यांना तो उजाळा देतो. 'एवढं दु:ख आणि दैन्य, परमेश्वराच्या आणि माणसांच्या कायदेकानूबद्दलचा सारा आदर पूर्णत: लोप पावला होता, आमच्या शहरामधून नष्ट झाला होता' 'स्त्रियांनी त्यांचा विनय गमावला होता, पुरुषांना इंद्रीयनिग्रहतेचा विसर पडला होता, नैसर्गिक भावनांचा गळा घोटण्यात आला होता आणि कैकदा मृत्यूमुळे झालेली हानी सिग्नल बनला होता, हास्यविनोदासाठी, सर्वसामान्य मनोरंजनासाठी.'

प्लेगच्या साथीनं, मृत्यूनं फ्लॉरेन्समध्ये सर्वत्र थैमान घातलेलं असतानाच एका मंगळवारी सकाळी पानिपिनीआ (Panipinea) फिआमेत्ता, फिलोमेना, एमिलिआ, लॉरेत्ता, नेइफील (Neifile) आणि एलिसा या सात जणी घरदार सोडून बाहेर पडतात. १८ ते २८ या वयोगटातील या तरुण स्त्रिया जिथं चिटपाखरूही नव्हतं अशा सांता मारिया नोव्हेलाच्या चर्चमध्ये प्रवेश करतात. पुढं काय करायचं याविषयी त्या विचारविनिमय करतात. तेवढ्यात पामफिलो, फिलोस्त्रातो आणि डाएनेओ (Dianeo) हे तीन तरुण त्या स्थळी पोचतात. पंचवीस वर्षाहून यात कुणी लहान नव्हता, 'ज्यांच्यामधील प्रेमाची ज्योत काळाच्या घडकांनी वा मित्र वा सोयऱ्याधायऱ्यांच्या मृत्यूनं वा त्यांच्या स्वत:च्या सुरक्षिततेच्या काळजीनं मंद करून टाकलेली नव्हती. त्यांच्यावर नजर जाताच पानिपिनीआच्या चेहऱ्यावर हास्य विलसतं. ती उद्गारते, 'दैव आपल्यावर प्रसन्न झालं आहे !' ती त्यांच्यापुढे प्रस्ताव मांडते की त्या तिघांनी आपल्या संगे चलावं. प्लेगची साथ असेपर्यंत फ्लॉरेन्सच्या वेशीबाहेरील गावात राहावं.' आपल्या नगरवासीयांच्या विषयलंपट सवयींना बाजूला सारून, आणि जे रास्त आहे त्यांच्या मर्यादा कुठल्याही प्रकारे न उल्लंघिता उत्तमोत्तम मेजवान्या झोडू, मौजमजा करू.' 'अव्यभिचारी आणि बंधू प्रेमाच्या भावनेनं' ते तरुण मान्यता देतात आणि दुसऱ्या दिवशी भल्या पहाटे एकदोन मोलकरणी, तीन गडी यांना बरोबर घेऊन त्या सात स्त्रिया आणि ते तीन पुरुष फ्लॉरेन्सची वेस ओलांडतात.

दोनेक मैल प्रवास झाला असेल नसेल, एका छोट्या टेकडीववरील प्रासादाकडे त्यांचं लक्ष जातं. प्रासादाभोवती प्रशस्त बाग. मुक्काम करायला अत्यंत योग्य असं ठिकाण. सर्वजण खूष होत्साते, त्या प्रासादात वस्तीला राहातात. स्थिरस्थावर झाल्यावर सर्वानुमते ठरवलं जातं की दर दिवशी त्यांच्यातील एक जण राजा वा राणी म्हणून राज्य करील, आणि कथाकथनासाठी एखादा विषय जाहीर करील, आणि प्रत्येकाला एखादी गोष्ट सांगण्यासाठी

पाचारण करील. त्या दिवशीचा राजा व राणी पुढील दिवसाचा राजा वा राणी यांचं नाव जाहीर करील. अशा प्रकारे प्रत्येकाला राज्याधिकार मिळेल. दहा जणांच्या मिळून शंभर कथा होतील. आलिग्यैअरी दांतेच्या (१२६५ – १३२१) 'डिव्हाइन कॉमेडी' च्या सर्गाएवढ्या दांतेचं हे महाकाव्य बोकाचीओचं अत्यंत आवडीचं. जाणता अजाणता तोही शंभर कथा सादर करतो. या दोन्ही साहित्यकृतीमध्ये एक सादृश्य आढळतं. प्लेगच्या साथीनं ग्रासलेलं फ्लॉरेन्स हा बोकाचीओचा नरक; जिथं कथा सांगितल्या जातात तो प्रासाद आणि बागा, निसर्गाचं वरदान लाभलेलं अवतीभवतीचं वातावरण, त्या शांततामय वातावरणात रंगणारी नृत्यं आणि कवनं, हसणंखिदळणं बोकाचीओचा हा स्वर्ग होता. कथा त्याची 'पर्गेटरी' प्रायश्चितभूमी होती. फरक एवढाच 'देकामेरॉन'चे कथाविषय उघड उघड ऐहिक आहेत.

दहा तरुण मंडळीच्या दृष्टीमधून पाहिला गेलेला प्रेम, धारिष्ट्य, भ्याडपणा, विनोद, शहाणपणा, लांडीलबाडी, बिनडोकपणा यासारख्या वैविध्यपूवर्ण भावभावनांचा, अनुभवांचा, बोकाचीओ एक 'पॅनोरमा' निर्माण करतो. 'दिवसां'चे सर्व विषय या ना त्या प्रकारे प्रारब्धाच्या गूढाशी संबंधित आहेत. पहिल्या आणि नवव्या दिवशी कुठलाही विषय कथेसाठी निवडण्याची मुभा प्रत्येकाला असते. परंतु इतर दिवशी मात्र खास विषय नेमून दिलेले आहेत. दुसरा : दुर्दैवाचा तडाखा बसल्यानंतर अनपेक्षितरित्या ज्यांना सुखाचे दिवस लाभतात; तिसरा : स्वत:च्या चातुर्याच्या बळावर ज्यांची कामनापूर्ती होते; चवथा : ज्यांच्या प्रेमाचा शेवट दु:खद होतो; पाचवा : जे दुर्दैवाच्या फेऱ्यात सापडतात पण अंती ज्यांच्या वाट्याला सुखासमाधानाचे दिवस येतात; सहावा : जे एखाद्या चाणाक्ष खेळीनं नुकसान वा धोका टाळण्यात यशस्वी होतात; सातवा : आपल्या पतीसंगे पत्नीने खेळलेल्या खेळी; आठवा : पुरुष वा स्त्री त्यांच्या प्रेयसी-प्रियकरांवर, किंवा पुरुषांच्या पौरुषांवर आणि अखेरच्या दहाव्या दिवशी : त्यांच्यासंबंधी जे औदार्यानं वा धैर्यानं वागलेले आहेत.

मानवी अनुभवांचा हा 'कॅटलॉग' कथनकारांवर वा श्रोत्यांवर कुठलंही तत्त्वज्ञान वा धर्मशास्त्र यांचं बंधन घालत नाही. बोकाचीओचं जग आदर्श सद्गुण वा काळीकुट्ट पापं दाखवत नाही. यातील कथांपैकी एक तृतियांश फ्लॉरेन्समध्ये घडतात, तीन चतुर्थांश कथांना इटालीची पार्श्वभूमी आहे, उरलेल्या जगभरच्या आहेत, इंग्लंडपासून चीनपर्यंत, प्राचीन काळापासून बोकाचीओच्या दिवसांपर्यंत यातील पात्रं समाजाच्या सर्व थरातील आहेत. शेतकरी – कामकऱ्यांच्या बरोबरीनं बडे उमराव – जमीनदार आहेत, ठगांबरोबर महंतही आहेत. तथापि, प्रमुख भूमिका पार पाडलेल्या आहेत त्या स्त्रियांनी. लोककथा, पुराणं, दंतकथा यांची चातुर्यानं उसनवारी केलेली आहे. प्लेगचा त्यानं वर्णिलेला 'आँखो देखा हाल'सुद्धा आठव्या शतकातील एका जोग्याच्या वृत्तांताबरहुकूम बेतलेला आहे. अर्थात, जुनीच गोष्ट वाचकांना नवीन वाटावी अशा कौशल्यानं सांगण्याची त्याची हातोटी मात्र दाद द्यावी अशी आहे.

'ह्यूमन कॉमेडी'ची मूळ संकल्पनाच : पृथ्वीतलावरील मानवाच्या दैनंदिन अनुभवाचे ऐहिक मासले निर्माण करणं आणि बोकाचीओनं केलेली अशी निर्मिती लक्षणीय आहे.



अनुक्रमणिका

अगदी पहिल्या दिवशीच्या पहिल्या कथेपासूनच याची वाचकाला प्रचीती येते. चिआप्पेल्लेत्तो (Ciappelletto) नामक प्रांतामधील एका डवीराची ही कथा. हा असामी एक नंबरचा लुच्चा, लफंगा. खोटं बोलणं, ठकवणं त्याच्या हातचा मळ. मित्र, नातलग वा अन्य कुणीही यांच्यात कलागती लावून त्यांच्यामध्ये वैमनस्य निर्माण करण्यात त्याला भारी आनंद, दुष्मनी जेवढी तीव्र तेवढा त्याचा आल्हाद गगनाएवढा . . . कुत्रं जसं हाडकावर लट्टू तसा तो बायांवर . . . . . एखादा धर्मात्मा ज्या सद्भावनेनं सत्कृत्य करील तेवढ्याच नेकीनं हा एखाद्याला लुबाडेल वा हातोहात फसवेल. आपल्या चातुर्यानं अद्याप परतफेड न झालेली बिलं वसूल करण्याच्या कामी त्याची नेमणूक होते व त्या कामानिमित्त तो बर्गंडीला येतो. परंतु, सोपवण्यात आलेलं काम पूर्ण होण्याआधीच तो अचानक आजारी पडतो, अखेरच्या घटका मोजू लागतो आणि ज्यांच्याबरोबर तो राहात असतो त्या दोघा फ्लॉरेन्सनिवासी बंधूंची पाचावर धारण बसते.

त्यांच्या वास्तूत हा दुष्ट पाखंडी मेला तर त्याचे कोणते परिणाम भोगावे लागतील या विचारानंच त्यांचे हातपाय लटपटतात. ही बला कशी टाळता येईल, जिवंतपणी वा निधनोत्तर, ते त्यांना समजत नाही. ते त्रांगड्यात सापडतात. पाद्र्याच्या भेटीविना हा मेला तर एका पाखंड्याला आसरा दिला म्हणून लोक दूषणं देतील, आणि ती भेट घडून आली तरी त्यांच्या वाट्याला तोच भोग येणार. कारण, या पाप्याच्या हातून न घडलेला असा एकही गुन्हा नसेल आणि त्याला त्याबद्दल पश्चात्तापही वाटत नाही. त्यांची हतबल अवस्था चिआप्पेल्लेत्तोच्या चाणाक्ष नजरेतून सुटत नाही. तो त्या बंधूंना धीर देतो, त्यांच्यावर कुठल्याही प्रकारचे आरिष्ट कोसळणार नाही, त्यांनी पाक पाद्र्याला पाचारण करावं. त्यानुसार एक वयोवृद्ध, निष्कपट पाद्री येऊन कर्तव्यभावनेनं त्याचं 'कन्फेशन' ऐकतो. त्याचं अमर्याद ममत्व आणि औदार्य प्रकट करणारा त्याचा कबुलीजबाब ऐकून त्या भाबड्या पाद्र्याची फसगत होते. त्याच्या लेखी तो सत्पुरुष ठरतो. स्वतःच्या ब्रह्मचर्याची बढाई मारण्यासही तो विषयलंपट माणूस कचरत नाही. स्वतःच्या पिपासूवृत्तीविषयी तो सांगतो की प्रदीर्घ काळ उपवास वा प्रार्थना केल्यानंतर एखाद्या अस्सल बेवड्यानं ज्या चवीनं आणि खुषीनं मद्य सेवन करावं त्याच चवीनं तो पाणी पीत असे. अखेरीस आपल्या हातून घडलेलं महत्पाप तो पाद्र्याला ऐकवतो :

लहानपणी त्याच्या आईला त्यानं उर्मटपणे दुरुत्तरं केली होती. त्याच्या या पापाचं परिमार्जन होतं आणि अखेरचा श्वास सोडतो. पाद्री त्याचा अंत्यविधी 'मोठ्या दिमाखात आणि समारंभपूर्वक' पार पाडतो. या प्रसंगी जमलेल्या लोकांसमोर तो चिआप्पेल्लेत्तो नामक सत्पुरुषाचं गुणगान गातो. सांगतो, या थोर पुरुषाचं उदाहरण समोर ठेवून त्यानुसार प्रत्येकानं आचरण करावं. त्याचा उत्साह आणि मृताविषयीचा त्याचा आदरभाव पाहून जमाव भारावून जातो. चिआप्पेल्लेत्तोच्या पायाचं चुंबन घेण्यासाठी, त्याच्या वस्त्राचा एखादा तुकडा स्मृतिचिन्हं म्हणून आपल्या पायी ठेवण्यासाठी प्रत्येकजण धडपडतो. संताच्या इतमामानं त्याचा अंत्यविधी होतो. त्याच्या थडग्याला तीर्थस्थानाची थोरवी प्राप्त होते. आणि संत

चिआप्पेल्लेत्तोनं केलेल्या दैवी चमत्कारांच्या कहाण्या हा हा म्हणता सर्वत्र पसरतात या सत्पुरुषाला जो कोणी भक्तिभावानं शरण जाईल त्याचा उद्धार होईल याबद्दल कोणाच्याही मनात तिळमात्र संदेह नसतो. प्रत्यक्षात नरकातल्या आगीत होरपळून निघणारा एक पापी, दुराचरणी भूतलावर संत म्हणून गौरविला जात असतो !

रोमन कॅथॉलिक चर्च, खिस्ती मठ आणि मठाधिपती यांचं चित्रण करताना बोकाचीओची उपहासप्रचुर लेखणी अतिशय धारदार बनते. उल्लेखिलेली कथा सांगून झाल्यानंतर दुसरी कथा सांगितली जाते ज्यू अब्राहम आणि ख्रिश्चन जोहान्नोत या मित्रांची. जोहान्नोतला आशा असते की अब्राहम एक दिवस ख्रिश्चन धर्म स्वीकारील. त्या दृष्टीनं तो त्याचं मन वळवायचा प्रयत्नही सातत्याने करीत असतो. एक दिवस ज्यू ठरवतो, रोमला जायचं. ख्रिश्चन धर्माचं ते मूळ मीठ. तिथं जाऊन खिस्ती धम्र जोखून पाहावा. जहान्नोत त्याला न जाण्याचा सल्ला देतो, पण तो मानत नाही. तो ठरवल्यानुसार जातो, तिथल्या धार्मिक स्थळांना भेटी देऊन माघारी येतो आणि आपल्या ख्रिश्चन मित्राला भेटीचा वृत्तांत कथन करतो : चर्चमधील झाडून सारे पदाधिकारी अधाशी आहेत, मद्यपी आहेत. उदरभरणाएवढं त्यांना अन्य काही प्रिय नाही. वखवखलेल्या जनावरांच्या कळपागत ते अन्नावर तुटून पडतात. ते एवढे धनलोभी आहेत की पैशांसाठी माणसांची विक्री करायलाही ते मागेपुढं पाहणार नाहीत. म्हणजेच ख्रिश्चन रक्ताचाही बाजार ते मांडतील, पवित्र वस्तूही ते विक्रीला काढतील, वगैरे वगैरे.

सर्व सांगून झाल्यानंतर ख्रिश्चन धर्म स्वीकारण्याचा आपला निर्णय तो मित्राच्या कानावर घालतो. हे कसं काय? मित्र चक्रावतो. त्यावर ज्यू स्पष्ट करून सांगतो : असं दिसतं की चर्चचे सर्वोच्च पदाधिकारी ख्रिश्चन धर्माच्या मुख्य ठाण्यातच त्या धर्माचं समूळ उच्चाटन करण्यासाठी प्रयत्नशील आहेत. परंतु त्याला पुरतेपणी कळून येतं की त्यांचे प्रयत्न निरर्थक आहेत. 'तुमच्या धर्माची लोकप्रियता अधिकाधिक वृद्धिंगत होत जाईल आणि तो अधिक वैभवशाली आणि कीर्तिवंत होईल. मी एवढाच निष्कर्ष काढू शकतो की, अन्य कुठल्याही धर्मापेक्षा तो अधिक पवित्र आणि, सच्चा असल्यामुळं त्याचा पाया आणि आधार 'होली घोस्ट' असणं अगदी उचित आहे.

ख्रिश्चन मठातील स्वैराचार वर्णन करणाऱ्या कथा रंगवण्यात बोकाचीओची लेखणी विशेष रमते. वानगीदाखल पुढील दोन कथा, सारांश रूपानं.

(१) एक भिक्षू एका पोरीला मठात आणून तिच्याशी संग करतो. मठाधिपतीला या पापकृत्याचा सुगावा लागताच तो त्या भिक्षूला कठोर शासन करायला निघतो. पण संधी मिळताच त्याच पोरीसंगे तो मठाधिपती आपली कामवासना भागवून घेतो. अशी संधी हातची दवडण्यास तो राजी नसतो. शिवाय हे कोणालाच कळून येणार नाही. आणि लपून केलेलं पाप हे जवळपास क्षम्य असतं. पण भिक्षूला हे कळून आल्याचं ध्यानी येताच तो उदार अंत:करणानं त्याला माफ करतो आणि त्यानंतर त्या पोरीला मठात आणून तिच्याशी शय्यासोबत करण्यात पुढील दिन गुजरतात.

(२) लोंबार्डी मठातील इसाबेत्ता नामक एक जोगीण तिच्या खोलीत तिच्या यारासं·

कैक रात्री संभोगसुख उपभोगत असते. एक दिवस इतर जोगीणींना याचा वास लागतो. तिला 'रंगे हात' पकडून देण्यासाठी तिच्यावर त्या पाळत ठेवतात. एका रात्री तसा योग जुळून येतो. त्या साऱ्याजणी 'अॅबेस'च्या खोलीचं दार ठोठावतात : 'उठा, लौकर उठा इसाबेत्ताच्या खोलीत एक तरुण आहे.' धार्मिक वृत्तीची, पापभीरू बाई म्हणून 'अॅबेस'ची ख्याती. पण त्यावेळी तिच्याही खोलीत एक धर्मगुरु असतो आणि त्याच्याशी तिची रतिक्रीडा चालू असते. तसा तो अधून मधून तिच्याशी शय्यासोबत करीत असतोच. जोगिणीचं ठोठावणं कानी पडताच 'अॅबेस' खडबडून उठते. प्रसंग बाका गुदरलेला. जोगिणी उतावळेपणानं आत घुसल्या तर ! ती अंधारातच घाईघाईनं कपडे करते. चुकून धर्मगुरूचं शिरोभूषण स्वत:च्या डोक्यावर चढवते. खोलीबाहेर पडून खोलीचं दार लावण्याची खबरदारी घेते व भराभर पावलं उचलत त्या जोगीणींसंगे इसाबेत्ताच्या खोलीपाशी जाते, सर्वांचं लक्ष इसाबेत्ताला मिळणाऱ्या शिक्षेकडे लागलं असल्यामुळे 'अॅबेस'च्या डोक्याकडे कुणाचं लक्ष जात नाही. आपलं प्रकरण उघडकीला आलं म्हणून इसाबेत्ता बिचारी शरमेनं मान खाली घालून निमूट राहाते. सर्वांच्या नजरा तिच्यावर रोखलेल्या. अखेर धीर एकवटून इसाबेत्ता नजर वर उचलते आणि तिची दृष्टी 'अॅबेस'च्या शिरोभूषणावर खिळून राहाते. मनोमन निर्धास्त होते. नम्रपणे माथी काय आहे हे चाचपून पाहायला 'अॅबेस'ला विनंती करते. आणि सर्वांच्या नजरा तिच्या डोक्याकडे वळतात. आणि तिचं प्रकरण उघडकीला येते. अंती, तेरी भी चूप, मेरी भी चूप.

माणसं आपली वासनापूर्ती कशी करून घेतात हा विषय ज्या दिवशी असतो त्या दिवशी सांगण्यात आलेली एका निष्पाप साध्याभोळ्या कुमारिकेची कहाणी अत्यंत लोकप्रिय आहे. या कुमारिकेचं नाव अलिबेक. बार्बेरीमधील काप्सा शहरातील एका धनाढ्याची मुलगी वय वर्ष चौदा. देखणी, मोहक. शहरात ख्रिश्चन असतात ते ख्रिस्ती धर्म आणि परमेश्वराची सेवा यावर प्रवचनं देत असतात. त्यातल्या एकाला अलिबेक विचारते की विशेष अडथळ्याविना एखादा कोणी परमेश्वराची सेवा करण्याचा मार्ग कुठला? तो उत्तरतो की त्यासाठी तिला थेबाइसच्या (Thebais) वाळवंटात जावं लागेल. त्या बिचारीला खरंच वाटतं. दुसऱ्या दिवशी दिवस उजाडायच्या आधीच ती कुणालाही न सांगता घर सोडते. आणि काही दिवसांनी बहुत कष्टाने वाळवंटात पोचते. तिथं एक झोपडी तिच्या दृष्टीला पडते. ती तिथं जाते. दारात एक साधुपुरुष, तिला पाहून तो अचंबित होतो. विचारतो, कशाच्या शोधार्थ ती निघाली आहे? ती उत्तरते, परमेश्वराचा. त्याची सेवा करण्याचा ध्यास तिला लागला आहे. या बाबतीत तिला मार्गदर्शन करेल असा कोणी आहे का? त्या रूपवती तरुणीला एकांतात पाहून तो भ्याला. न जाणो सैतान आपला कब्जा घेऊन आपल्याला पापकर्म करायला लावेल. तो तिला रानटी सफरचंद, खजूर आणि प्यायला पाणी देतो आणि सांगतो, की इथून जवळच एक गुरु राहातो त्याच्याहून चांगला. तो तिला मार्गदर्शन करील. ती त्या गुरुपाशी जाते तेव्हा तिला पूर्वीचाच सल्ला मिळतो. यावेळी तो एका तरुण तपस्व्याचं नाव सुचवतो : रस्तिको.

ती त्याच्यापाशी जाते. तिच्या मनीची इच्छा व्यक्त करते. तो इतरांप्रमाणे तिची पाठवणी

करीत नाही. कामवासना आपण काबूत ठेवू शकतो की नाही याची खातरजमा करून घेण्याची अशी चालून आलेली संधी त्याला दवडायची नव्हती. दिवस मावळतो. तो तिच्यासाठी पानांची बिछायत बनवतो व स्वत: झोपायला जातो. पण अनावर वासना काबूत ठेवणं पळापळाला कठीण होत असल्याचं त्याला कळून येतं. त्याचं विषयासक्त मन त्या मुलीचं तारुण्य आणि सौंदर्य याभोवती रुंजी घालू लागतं. तिची प्राप्ती व्हावी पण आपण व्यभिचारी आहोत ही शंका तिच्या मनाला स्पर्शून जाऊ नये. कसं साध्य होईल? संभाषणाच्या ओघात त्याला आढळून येतं की तिला पुरुष म्हणजे काय ठाऊक नाही. आणि ती दिसते तशीच भोळीभाबडी आहे. परमेश्वराच्या सेवेच्या नावानं तिला हासिल करून घेण्याचा डाव तो रचतो. सैतान हा परमेश्वराचा कसा शत्रू आहे याविषयी तो प्रथम तिला ऐकवतो. तपशीलवार. आणि तिची खात्री पटवतो की परमेश्वराला मान्य होईल अशी सेवा म्हणजे सैतानाला नरकात ढकलून देणं. तीच त्याला सजा. मुलगी विचारते, 'हे कसं करता येईल?' तो उत्तरतो, 'लौकरच कळेल तुला. मी जसं करीन तसंच तू कर.' असं म्हणून तो अंगावरची सर्व वस्त्र उतरवतो आणि तिलाही तसंच करायला सांगतो. तो प्रार्थना करण्याचा बहाणा करून गुडघे टेकतो.

ती विचारते, "रस्तिको, मी पाहातेय ती तुझ्यापुढं चिकटलेली गोष्ट आहे तरी काय? आणि जी माझ्यापाशी नाही?"

"उफ, माझ्या पोरी" रस्तिको उत्तरतो, "तो आहे सैतान, ज्याच्याविषयी मी तुला मघाशी बोललो होतो. आता तर तो तू स्वत: पाहू शकतेस. तो मला अशा यातना देतोय की त्या सहन करणं मला कठीण जातंय."

"परमेश्वराचे आभार !" ती मुलगी म्हणते. "तुझ्यापेक्षा माझी स्थिती अधिक चांगली आहे, कारण माझ्यापाशी असला सैतान नाही."

"अगदी खरं आहे ते," रस्तिको उत्तरतो, "पण तुझ्यापाशी अन्य असं काहीतरी आहे जे माझ्यापाशी नाही, तुझ्यापाशी ते आहे याच्या जागी."

"काय?" अलिबेक प्रश्न करते, "काय ते?"

"तुझ्यापाशी नरक आहे," रस्तिको म्हणतो, "आणि माझी अशी ठाम श्रद्धा आहे की माझ्या आत्म्याच्या मुक्तीसाठी परमेश्वरानं तुला इथं पाठवलंय. हा सैतान मला एवढ्या यातना देतोय, की माझी कीव करून त्याला नरकात पाठवण्याची अनुमती दे. त्या योगे तू मला श्रेष्ठ समाधान देणार आहेस, आणि परमेश्वराची महान सेवा तू करणार आहेस, "त्याला" खूष करून, त्यासाठीच तर तू इथवर आलीस ना?"

"ओह फादर," ती मुलगी विश्वासानं म्हणते, "माझ्यापाशी जर नरक आहे तर मग तुझ्या इच्छेबरहुकूम करू या आणि तेही शक्य तेवढ्या लौकर."

"परमेश्वर तुझं भलं करो, माझ्या पोरी," रस्तिको म्हणतो, "चल, उठ, त्याला माघारी त्याच्या जागी घालू या म्हणजे मला तरी तो स्वस्थ चित्तानं राहू देईल."

असं म्हणून तो त्या मुलीला एका बिछान्यापाशी नेतो आणि तिनं कसं पडावं, त्या शापित सैतानाला ढकलून देण्यासाठी, याबाबत मार्गदर्शन करतो. त्या मुलीनं यापूर्वी एकही सैतान नरकात पाठवलेला नसल्यामुळं, पहिल्या खेपेला तिला यातना होतात आणि म्हणून ती रस्तिकोला म्हणते, "हा सैतान म्हणजे खचितच एक दुष्ट गोष्ट आहे आणि खरोखरीच तो परमेश्वराचा शत्रू आहे, फादर, तो दुसऱ्यांना यातना देतो असंचं नव्हे तर जिथं त्याला ढकललं जातं त्या नरकालाही तो दुखावतो."

"माझ्या पोरी," रस्तिको उत्तरतो, "पण नेहमीच तसं असतं असं नाही" आणि ते तसं नसतं हे सिद्ध करून देण्यासाठी तो बिछान्यावरून उठण्यापूर्वी त्याला सात वेळा नरकात लोटतो; वस्तुतः सातव्या खेपेनंतर सैतानाला स्वतःचा उद्दाम माथा ताठर ठेवणं अशक्य झालं होतं आणि काही काळ स्वस्थ पडून राहण्यात तो समाधानी होता.

रस्तिको कंदमुळं भक्षण करून वर पाणी पिणारा. तिच्या इच्छेनुसार सैतानाला पुन्हापुन्हा नरकात ढकलून परमेश्वराची सेवा करण्याची तिची मनोकामना पुरी करता करता त्याचा जीव मेटाकुटीस येतो. परमेश्वराची सेवा करण्यात आपण उणे पडत आहोत या भावनेनं ती हिंपुटी होते. दरम्यान तिच्या वडिलांचं घर जळतं आणि त्यात तिचे वडील, तिची भावंडं भस्मीभूत होतात. आता . ती एकटीच वारसदार राहिलेली असते. तिचा ठावठिकाणा नीरबेल (Neerbale) या तरुणाला कळतो. ऐष करून तो कफल्लक बनलेला असतो. तो तिच्या इच्छेविरुद्ध रस्तिकोच्या खोपटातून तिला बाहेर काढतो. रस्तिको सुटकेचा श्वास टाकतो. नीरबेल काप्साला येऊन तिच्याशी लग्न करतो आणि तिच्या बापाचा वारसदार बनतो.

शेजारीपाजारणी तिला विचारतात, "वाळवंटात जाऊन तिनं परमेश्वराची सेवा कशी केली?" ती सांगते, "सैतानाला नरकात ढकलून" आणि "नीराबेलनं तशी सेवा करण्याची संधीच अद्याप दिली नाही त्यामुळं त्याच्याकडून महापाप घडतंय." बाया पृच्छा करतात, "सैतानाला नरकात कसं ढकललं जातं?" आणि शब्द, हातवारे यांच्या सहाय्यानं ती त्यांना समजावून देते. आणि बायांची हसून हसून मुरकुंडी वळते. त्या सांगतात की 'ते इथंही करता येतं की,' आलिबेकची ही कहाणी हळूहळू शहरभर पसरते, सातासमुद्रापार जाते. आजही ती कहाणी प्रचलित आहे. परमेश्वराची सेवा करण्याचा हा मार्ग अनुसरल्यास सर्वत्र आनंदी आनंद !

बोकाचीओने 'देकामेरॉन' पूर्ण केला तेव्हा तो अवघा चाळीस वर्षांचा होता आणि त्यानं आपल्या कहाण्यांनी आधुनिक लघुकथेचा अभिजात मूळकल्प (Prototype) साहित्य सृष्टीला बहाल केला होता. त्यांच्या कहाण्यांना नाव देण्यात आलं होतं, Novella - a little new thing. प्रत्येकाच्या ओठावर असणाऱ्या दंतकथांहून त्या वेगळ्या होत्या. त्यांना संविधानकाचा कलात्मक आकृतीबंध जाणीवपूर्वक देण्यात आलेला होता. या Novella वरूनच Novel रचण्याचा मार्ग पुढिलांच्या दृष्टिपथात आला.

१३५३ च्या सुमारास 'देकामेरॉन' पूर्ण केल्यानंतर बोकाचीओ वीस वर्षाहून अधिक काळ जगला. दरम्यान त्याच्या आयुष्यात, लिखाणानं वेगळं वळण घेतलं. त्याच्यामध्ये घडून

आलेल्या या परिवर्तनाला कारणीभूत ठरला होता, रेनेसांस उद्‌बोधनकालीन मानवतावादाचा मार्गदर्शक, महान इटालियन कवी पित्रार्क (१३०४ – ७४), त्याची व बोकाचीओची १३५० मध्ये फ्लॉरेन्समध्ये प्रथम भेट झाली, परिचय झाला. पित्रार्कला त्यानं गुरु मानलं. त्याचं लॅटिनमध्ये चरित्र लिहिलं, पण या गुरूचं शिष्याच्या 'देकामेरॉन'बद्दलचं मत तेवढसं अनुकूल नव्हतं. 'एक' भला थोरला ग्रंथ, गद्यात लिहिलेला आणि सर्वसामान्यांसाठी योजलेला. त्यानं बोकाचीओला सांगितलं, 'तुझं त्या वेळचं वय आणि ज्यांच्यासाठी हे पुस्तक रचलं गेलं आहे त्या सर्वसामान्य जनतेचा दृष्टिकोन लक्षात घेता, त्यातील क्वचित प्रसंगीचा मोकळा ढाकळा, स्वैर सूर क्षम्य मानायला हवा.

पित्रार्कच्या प्रभावाखाली बोकाचीओ अभिजात ग्रीक लॅटिन वारशाचा शोध घेण्याच्या कामी लागला. त्या दोघांनाही ग्रीक वाचता येत नव्हतं. पण होमर आणि प्लेटो यांची ग्रीक हस्तलिखितं पूज्य बुद्धीनं डोळा भरून पाहाण्यातला आनंद त्यांनी उपभोगला. फ्लॉरेन्सच्या विद्यापीठात ग्रीकचं पहिलं प्राध्यापकपद निर्माण करण्यात बोकाचीओचा महत्त्वाचा सहभाग होता. या विद्यापीठात पित्रार्कनं अध्यापन करावं अशी त्याची इच्छा होती पण त्याची इच्छा पूर्ण होऊ शकली नाही. लिओझिओ पिलातो याला विद्यापीठात ग्रीकच्या प्राध्यापकाची जागा देण्यात आली. पिलातोला त्यानं स्वत:च्या घरी राहायला आणला. त्याची नेमणूक केवळ दोन वर्षंच टिकली. कारण फ्लॉरेन्सवासी यांना ग्रीक अभिजात वाङ्मयात रस नव्हता. त्यांच्या उद्योगधंद्यासाठी प्राध्यापक महाशयांनी त्यांना 'कमर्शियल' ग्रीकचे पाठ द्यावेत एवढीच त्यांची माफक अपेक्षा होती. पिलातोच्या घेडगुजरी लॅटिन भाषांतरावरून पित्रार्क आणि बोकाचीओ यांना होमरचा प्रथम परिचय झाला.

१३६२ मध्ये ध्यानीमनी नसताना एक संत बोकाचीओच्या घरी आला. या भेटीत 'देकामेरॉन' लिहिल्याबद्दल पश्चाताप व्यक्त करावा लागला. या संताने महात्मा पेत्रोनी या **कार्युसिथन** योग्याचा निरोप आणला होता. त्या महात्म्याला मृत्यूशय्येवर भविष्यसूचक साक्षात्कार झाला होता. येशूनं त्याला सांगितलं होतं की पित्रार्क आणि बोकाचीओ लौकरच मरणार आहेत आणि निधनोत्तर दोघांनाही कायमचं नरकातच खितपत पडावं लागणार आहे. यातून सुटका होण्याचा एकमेव मार्ग : काव्य आणि साहित्य यासारख्या अधार्मिक वाङ्मय प्रकारांकडे तात्काल पाठ फिरवून येऊ घातलेल्या जगावर त्या दोघांनी त्यांचे विचार केंद्रित करावे. भयभीत झालेल्या बोकाचीओनं पित्रार्कला पत्र लिहिलं. लिहिलं की, महात्म्याच्या इशाऱ्यानुसार वागायचं त्यानं ठरवलेलं आहे. यापुढं तो ललितलेखन करणार नाही, त्याचं साहित्य जाळून टाकणार आहे आणि पित्रार्कला स्वत:चा ग्रंथसंग्रह त्याला विकायचा आहे.

पित्रार्कनं त्याला उलट टपाली कळवलं की, 'मृत्यू माणसाला येतोच, त्याची धास्ती बाळगण्याचं कारण नाही. समंजसपणानं वाग. . . सर्व चांगल्या माणसांचं अंतिम उद्दिष्ट एकच असतं, पण तिथं पोचण्याचे मार्ग अनेक असतात, आणि यात्रेतही वैविध्य असतं . . . ज्ञानमार्ग हा खचितच अधिक गौरवास्पद, प्रकाशमान आणि उच्च आहे.' बोकाचीओनं ज्ञानमार्ग सोडायचा मनाशी निश्चयच केला असेल तर त्याचा ग्रंथसंग्रह विकत घेण्यासंबंधी



अनुक्रमणिका

विचार केला जाईल. हव्या असलेल्या पुस्तकांच्या यादीनुसार, परवडेल अशा किंमतीत ग्रंथ विकत घेतले जातील. आपल्याबरोबर राहायला येण्याचं त्यानं बोकाचीओला आमंत्रण दिलं, कारण आपले थोडेच दिवस उरलेले आहेत. माझी फार दिवसाची इच्छा आहे आणि तूही एकदा येण्याचं आश्वासन दिलं होतंस. तो येऊन राहिला तर दोघांनाही त्यांच्या ग्रंथ संग्रहाचा लाभ घेता येईल.' बोकाचीओनं हे आमंत्रण कधीच स्वीकारलं नाही.

पित्रार्कच्या प्रभावानं बोकाचीओनं लॅटिन भाषेत विपुल लेखन केलं. त्यापैकी लक्षणीय ग्रंथसंपदा : 'जिनिऑलॉजी ऑफ द गॉड्स ऑफ द जेंटिल्स.' १५ खंडातील या अभिजात पुराणकथांच्या ज्ञानकोशात त्यानं सर्व उपलब्ध पॅगन पुराणकथा संग्रहित केल्या. यासाठी आयुष्याची अखेरची पंचवीस वर्षं तो खपला. पुढील चार शतकं कोशाचा आदर्श नमुना म्हणून गणला जात होता. त्याच्या प्रारंभीच्या चरित्रकारांनी 'देकामेरॉन'कडे दुर्लक्ष करून या कोशाचीच मुक्तकंठानं वाखाणणी केली होती. 'Bucollcum Carmen' (१३५१-६६) हा रूपकात्मक गोपगीतांचा संग्रह, De Claris Mulierbus' (१३६०-७४) मध्ये १०४ प्रसिद्ध स्त्रियांची चरित्रे आहेत तर De Casibus virorum Illustrium (१३५५-७४) मध्ये प्रारब्धानं ज्यांच्या आयुष्याला धक्का दिला आहे अशा प्रसिद्ध पुरुषांची चरित्रं आहेत. त्यानं भूगोलकोशही तयार केलेला होता. त्याचं अखेरचं कथारूप साहित्य म्हणजे जिज्ञासू स्त्रीद्वेष्टा Cor baccio (द इव्हिल क्रो : १३५५) यात 'देकामेरॉन' च्या जगामधून बाहेर पडावं लागल्याची खंत त्यानं प्रदर्शित केली होती. 'लाईफ ऑफ दांते' हे त्याचं चरित्र विश्वसनीय मानलं जातं. हे प्रचंड काम त्यानं अनेक हालअपेष्टांना तोंड देत पार पाडलेलं होतं.

सतत प्रयत्न करूनही कुणी आश्रयदाता मिळू न शकल्यामुळं बोकाचीओची फ्लॉरेन्समधील अखेरची वर्षं अत्यंत हलाखीत गेली. ॲव्हिग्नॉन आणि रोम येथे वकील म्हणून त्याच्यावर कामगिरी सोपवून त्याच्या तस्कन मित्रांनी त्याच्या पोटापाण्याची थोडीबहुत व्यवस्था केली. इतरांसाठी आपल्या लिखाणांच्या प्रती बनवून देऊन त्यावर आपला चरितार्थ त्यानं चालवला. अखेरीस १३७३ च्या ऑक्टोबरमध्ये San stefano de Badia च्या चर्चमध्ये दांतेच्या 'डिव्हाइन कॉमेडी'चं वाचन व अर्थ निरूपण करण्याच्या कामी त्याची नियुक्ती करण्यात आली. त्यानं अशी साठ एक व्याख्यानं दिली. शेवटी त्याचा आजार आणि त्याच्या अर्थनिरूपणावर विद्वज्जनांनी घेतलेले आक्षेप यामुळं ती व्याख्यानमाला बंद पडली. त्याचा विश्वस्त, मार्गदर्शक, पित्रार्क याचं १३७४ च्या जुलैमध्ये निधन झालं. त्याच्या मृत्यूच्या आघातानं बोकाचीओ पार खचून गेला. आणि विपन्नावस्थेत २१ डिसेंबर १३७५ रोजी त्यानं अखेरचा श्वास घेतला. त्याच्या थडग्यावर त्याचेच शेवटचे उद्‌गार कोरले गेले : 'ही चेरिश्ड द नरिशिंग म्युजिस.'

विद्याविभूषित टीकाकारांनी 'देकामेरॉन'ला प्रतिष्ठा मिळवून देण्यापूर्वीही ते इतर अभिजात साहित्यकृतीप्रमाणे सर्वत्र वाचलं जात होतं. त्याच्या प्रती युरोपभर घेऊन जाणाऱ्या

इटालियन व्यापाऱ्यांमुळें त्याचा इटालीबाहेर प्रसार झाला. १४७१ साली ते मुद्रित स्वरूपात वाचकांच्या हाती पडेपर्यंत हस्तलिखित स्वरूपातच ते वाचलं जात होतं. प्रत्येकाचं लक्ष त्या साहित्यकृतीनं वेधून घेतलं होतं. मात्र बोकाचीओच्या समकालिनांकडून आणि रेनेसाँसच्या प्रवर्तकांकडून तिची क्वचितच स्तुती केली जात असे. काही वेळेला तर लेखकाबरोबर तिच्यावरही कैकदा टीकेची झोड उडवण्यात येत असे. रेनेसांसच्या प्रवर्तकांच्या लेखी बोकाचीओ हा एक लॅटिन स्कॉलर होता, एक मानवतावादी विद्वान होता, एक काव्यप्रेमी होता. त्याचं नाव अजरामर होईल ते त्याच्या अभ्यासपूर्ण लॅटिन ग्रंथामुळं. या ग्रंथांनी त्यांची ऐतिहासिक कामगिरी बजावली. व्यासंगीं अभ्यासकांना त्यांचा उपयोगही झाला, त्यांच्या आवृत्त्याही निघाल्या. पण कालांतराने ते कालबाह्य ठरले. आज ग्रंथालयांच्या कुठल्यातरी कोपऱ्यात ते धूळ खात पडून असतील वा चार दोन विद्वानांच्या स्मरणात असतील. पण आज, सहा शतकं उलटून गेल्यानंतरही, बोकाचीओची ख्याती तगून आहे ती 'देकामेरॉन' या त्याच्या 'मास्टरपीस'मुळे.

कलात्मकतेच्या दृष्टीनं बोकाचीओचं De Claris Mulieribus इंग्रजी शीर्षक : 'कन्सर्निंग फेमस वूमेन' 'देकामेरॉन' पेक्षा डावं असलं तरी या दोन्ही ग्रंथातील साम्यस्थळं लक्षात घेता त्यांचा एकत्रित विचार केला तर तो अप्रस्तुत ठरू नये.

'कन्सर्निंग फेमस वूमेन' हा बोकाचीओचा एक लक्षणीय प्रबंध आहे. यात एकशे चार प्रसिद्ध स्त्रियांची चरित्रं रेखाटण्यात आली आहेत. थेट इव्हपासून चरित कहाण्यांना प्रारंभ करण्यात आला आहे. स्त्रियांचा चरित्रांचा लिखित असा हा पहिलावहिला संग्रह. ज्या काळात चरित्र हा वाङ्मय प्रकार लोकप्रिय झाला नव्हता, त्या काळात या प्रकाराकडे ज्यांचं लक्ष गंभीरपणानं वळलं अशा मोजक्या व्यक्तींपैकी बोकाचीओ हा एक. त्याची धारणा होती की मनुष्य स्वत:चं कर्तृत्व सिद्ध करतो आणि कीर्ती संपादन करतो ती इहलोकी आणि महान व्यक्तींचं कार्य, त्यांची कामगिरी भावी पिढ्यांसाठी जतन करून ठेवणं हे लेखकाचं कर्तव्य आहे. आणि या कारणास्तव तो चरित्र लेखनाकडे वळला होता. हा वाङ्मयप्रकार हाताळताना त्यानं बोधवादी आणि नीतिपाठ देणारी मध्ययुगीन प्रथाच अनुसरलेली होती. त्या काळात अतिशय लोकप्रिय ठरलेली कोशाची बरीच वैशिष्ट्यं यात आढळतात. त्यापैकी प्रमुख, वाचकांना मार्गदर्शन करणं, त्यांच्या व्यक्तिमत्त्वाला बळकटी आणणं.

तथापि, मतभिन्नताही आहे. नीतिपाठ देताना त्यानं मध्ययुगीन मार्ग नेहमीच अवलंबिलेला नाही. स्त्रिया आणि जी मूल्यं तो त्यांना अनुसरायला सांगतो याविषयीचा त्याचा दृष्टिकोन सर्वस्वी भिन्न आहे. विशेष म्हणजे प्राचीन जगाविषयीचा त्याचा दृष्टिकोन व प्रस्तुत साहित्यकृती आणि पुराणकथा आणि भूगोल लिहिण्यामागील त्याची कारणं यात बदल झाला असल्याचं आपल्या निदर्शनास येतं. सहज उपलब्ध व्हावीत म्हणून घटितं एकत्रा करावीत वा आपल्या व्यासंगाचं प्रदर्शन करावं हाच केवळ त्याचा उद्देश नव्हता. मध्ययुगीन काळातील ज्ञानात नवीन ज्ञानाची भर पडावी या इच्छेपोटीच त्यानं हे काम अंगिकारलेलं होतं. त्याला दाखवून द्यायचं होतं की प्राचीन पुराणकथांचा अर्थ मध्ययुगात चुकीचा लावला

गेलेला आहे, त्या कथांमध्ये बरंचसं सत्यकथन आहे आणि काव्याच्या बुंथीआड आहेत वैश्विक भावना, आदर्श आणि श्रद्धा. मानवजातीचे शिक्षक म्हणून या पुराणकथा त्याला 'बायबल'च्या तोडीच्या वाटतात. धर्मशास्त्राएवढीच त्याला काव्याची थोरवी वाटते.

Vita di Dante या त्याच्या चरित्रात तो असं विधान करतो की आदीम मानवं आणि आपण यांच्यात एक समान गुण आहे आणि तो म्हणजे ज्ञानसंपादनाची उपजत लालसा. निसर्गावर अधिराज्य गाजवणारी व्यवस्था पाहिल्यानंतर आदीम मानवाला वाटलं, अशी एखादी शक्ती वा प्रेरणा असली पाहिजे ज्याच्यामधून ही व्यवस्था निर्माण होत असावी. याला ते 'देवता' म्हणू लागले. त्यांनी ठरवलं की या देवतेचा योग्य तो मान राखला जायला हवा, पण नित्य व्यवहारातल्या साधनांनी नव्हे. यास्तव त्यांनी पुजाऱ्यांची नियुक्ती केली, पुतळे उभारले, आणि त्यांची भक्तिभावना व्यक्त करण्यासाठी त्यांनी काव्य निर्माण केलं, दैनंदिन व्यवहारातील शब्दांहून भिन्न अशा शब्दांमधून. त्यानंतर धर्मशास्त्रामध्ये काव्यानं स्वत:चं मूळ शोधलं. पण काव्यानं सूर्य, चंद्र, गुरु वा अन्य ग्रहांचं दैवतीकरण करण्यात समाधान मानलं नाही. दाखवून दिलं की, मानवाला उपयुक्त असणारी प्रत्येक गोष्ट एक देवता आहे, ती ऐहिक का असेना! आपली बुद्धिमत्ता आणि बळ यांच्या सहाय्यानं जे इतरांपेक्षा श्रेष्ठ बनले अशा माणसांची स्तुतिस्तवनं काव्यानं गायली, आणि वीरश्रेष्ठांना माणूस नव्हे तर देव मानलं.

एवम, ज्या लढायांत आणि लक्षणीय घटनांमध्ये मानव आणि देव दोघांनीही आपापल्या भूमिका निभावल्या होत्या त्यांची काव्यानं महती वर्णन केली. धर्म आणि काव्य यांचं बुद्धिप्रामाण्यवादी स्पष्टीकरण देण्यासाठी बोकाचीओ प्रयत्न करतो आणि एका ठिकाणी तर विधान करतो की या दोहोत द्वैत नाहीच. धर्मशास्त्र म्हणजे 'परमेश्वर काव्य' आणि त्याचा उद्देश दैवी गूढासंबंधी मानवाला मार्गदर्शन करणं, जेणे करून एक दिवस ते स्वर्गाच्या साम्राज्यात पोहोचू शकतील. आपल्या पुराणकथांच्या आधारे, प्राचीन कवींनी दाखवलं कोणत्या सद्‌गुणांचा त्यांनी पाठपुरावा करावा आणि दुर्गुणांना चार हात दूर ठेवावं. पुराणकथा आणि कवींचे देव झूट असतील पण कथारूप साहित्याच्या पडद्याआडून माणसाचं विश्व ते विशद करून सांगतात. माणसाला उचित व्हावीत अशी विवक्षित मूल्यं आणि जीवनमार्ग प्राचीनांनी शोधून काढली होती याविषयी बोकाचीओच्या मनात तिळमात्र संदेह नव्हता. जीवनाची ही संकल्पना कवींच्या कृतींमधून शोधून काढायला हवी. त्यांच्या पुराणकथा गोळा करून आणि त्यांचं अर्थनिरूपण करून, बोकाचीओ ही सामग्री कवींच्या भावी पिढ्यांसाठी उपलब्ध करून देत होता आणि त्याच्या मते पुराणकथांविना काव्य संभवत नाही. पण त्याहूनही महत्त्वाचं म्हणजे, फार फार वर्षांपूर्वी मृत झालेल्यांना पुन्हा सजीव करून त्यांना उजेडात आणण्याची 'दैवी कामगिरी' त्यानं स्वीकारलेली होती. मध्ययुगानं विकृत करून टाकलेलं जग पूर्वस्थितीत प्रस्थापित करण्याचा त्याचा प्रयत्न होता.

एका नव्या जगात आपण जगत आहोत याचं भान बोकाचीओला होतं. तथापि, अशा एका संक्रमणकालात तो अद्याप होता, ज्यात नवीन मूल्यं स्वत:चं अस्तित्व जाणवून देत

होती, परंतु जुन्या मूल्यांना पूर्णपणे बाजूला सारणं त्यांना अद्याप शक्य झालेलं नव्हतं. म्हणूनच, त्यानं नवीन वाट चोखाळली असली तरी मध्ययुगीन परंपरा आणि रूढी यांची साथ त्यानं सोडलेली नव्हती. त्यापैकी एक : exemplarism, exemplum चा वापर ज्याच्या आधारे लेखक त्याचे विचार व्यक्त करतो आणि नानाविध विषय चर्चेला घेतो, अशी ही पद्धत. म्हणजे असं : अनुग्रहाचं सामर्थ्य प्रदर्शित करण्यासाठी आणि परमेश्वराची करुणा किती अमर्याद आहे हे दाखवण्यासाठी, लेखक एका माणसाचं उदाहरण घेतो, ज्यानं परमेश्वर आणि माणसं यांचे अनंत अपराध केलेले असतात, तो पश्चाताप करतो आणि नंतर परमेश्वराचा अनुग्रह झाल्यानं तो बचावतो. बोकाचीओ या पद्धतीचा अवलंब करतो, परंतु ख्रिश्चन exemplum प्रमाणं, त्याच्या कथा परमेश्वराचं प्रेम प्रदर्शित करीत नाहीत, तर निसर्गक्रिया आणि मानवी बुद्धिमत्ता: पद्धत एकच, हेतू भिन्न.

'देकामेरॉन' प्रमाणंच 'कन्सर्निंग फेमस वूमेन' मध्येही बोकाचीओ या पद्धतीचा वापर करतो. या दोन्ही कृतींची गटवार विभागणी करणं शक्य आहे ज्यात सद्‌गुण-दुर्गुणांची उदाहरणं दिलेली आहेत आणि या जगात जगण्याच्या माणसाच्या कर्तृत्वाचा गुणगौरव केलेला आहे. एवढ्यावरच या दोन्ही कृतींमधील साम्य संपत नाहीत. 'देकामेरॉन' मधील जवळ जवळ सर्व कथांच्या प्रतिकृती स्त्रियांच्या चरित कहाण्यांत सापडतात आणि चरित कहाण्यांत आढळून येणारी भाष्यं 'देकामेरॉन' मधील लेखकाची विचारसरणी अधोरेखित करतात. या संदर्भातील उत्तम उदाहरण म्हणजे आल्बर्तो आणि लिसेच्या ('देकामेरॉन') आणि पॉलिना ('कन्सर्निंग फेमस वूमेन') यांच्यावरील कथा. आल्बर्तो हा लफंगा आहे. त्याचे गुन्हे लोकांना कळून आल्यामुळं शहर सोडणं त्याला भाग पडतं. तो व्हेनिसला जातो, आपलं खरं रूप दडवून संभावितपणे वावरणं सुलभ व्हावं म्हणून तो भिक्षू बनून मठाचा आसरा घेतो. नंतर पाद्री होतो. विनम्र आणि भक्तिपरायण पाद्र्याची भूमिका तो एवढ्या प्रभावीरित्या वठवतो की, प्रवचन करतेसमयी त्याच्या डोळ्यांतून आसवांच्या धारा वाहतात. संत महात्मा म्हणून त्याची शहरात नावलौकिक होतो. अशाची सत्संगती घडावी, सुजनवाक्य कानी पडावं, नैतिकता वृद्धिंगत व्हावी म्हणून आल्बर्तोच्या चर्चमध्ये स्त्रियांची झुंबड उडते. या स्त्रियांपैकी एक लिसेत्ता. देखणी आणि मूर्खही.

एक दिवस तिचा पापांचा झाडा देऊन झाल्यानंतर आल्बर्तो तिला विचारतो, तिचे प्रियकर वगैरे आहेत का नाहीत? ती उत्तरते, तिला एक नवरा आहे आणि तोच तिचं सर्वस्व आहे. तिला समजत नाही पाद्र्यानं असा तिरपागडा प्रश्न का विचारावा? त्याला कळत नाही का, अन्य कुणीही मर्त्य तिला स्पर्श करू धजावणार नाही असं तिचं लावण्य! आल्बर्तोच्या मनात विचार येतो, संत म्हणून मिळालेल्या कीर्तीचा लाभ उठवण्याची घडी आता आलेली आहे. त्या निष्कपटी स्त्रीची तो खातरजमा करून देतो की रात्रौ गॅब्रिएल देवदूत त्याच्यापाशी आला होता आणि तो त्याला म्हणाला, लिसेत्ताला कळव की तिच्या अलौकिक सौंदर्यावर तो मोहित झाला आहे आणि एक रात्र तिच्यासंगे घालवायला त्याला आवडेल. प्रत्यक्ष देवदूताचा हा संदेश कानी पडताच तिचा आनंद गगनात मावेनासा होतो. ती

आल्बर्तोला सांगते, त्या रात्री देवदूताचं स्वागत करायला तिला खूप आवडेल, पण त्यानं वचन दिलं पाहिजे, कुमारी मेरी खातीर तो तिचा कदापीही त्याग करणार नाही. आल्बर्तो सांगतो, देवदूताला माणसासारखी कुडी नसते, म्हणून तिला भेटण्यासाठी त्याला मानवी देह धारण करायला हवा. ती संमती देते. आल्बर्तो त्यावर आजीजीनं म्हणतो, तिनं एक मेहरबानी करावी, नियोजित भेटीसाठी देवदूतानं आल्बर्तोचा देह धारण केला तर चालेल का, त्यामुळे आल्बर्तोचा आत्मा काही काळ का होईना स्वर्गात वास करील? त्यालाही ती होकार देते. आणि ती रात्र लिसेत्ता आल्बर्तोच्या देहासंगे घालवते आणि दुसऱ्या दिवशी आपल्या आत्म्यानं अनुभवलेलं स्वर्गसुख आल्बर्तो तिला कथन करतो.

पॉलिनाची कथा लिसेत्ताच्या कथेशी खूप मिळती जुळती आहे. पॉलिना ही रोमन तरुणी. आनुबिस या देवावर तिची नितांत भक्ती आहे. दर दिवशी न चुकता ती त्याच्या मंदिरात जाते. ती सुद्धा सुंदर असते. मुंडस (Mundus) नामक एक तरुण तिच्या प्रेमात पडलेला असतो. परंतु ती त्याला कटाक्षानं दूर ठेवते, निक्षून सांगते की ती तिच्या पतीशी एकनिष्ठ आहे. ती वश होत नाहीसं पाहून लांडीलबाडी करण्यावाचून त्या तरुणाला गत्यंतर नसतं. आनुबिसच्या मंदिरातील पुजाऱ्यांची मदत मिळावी म्हणून तो त्यांना भरपूर पैसे देतो. दुसऱ्या दिवशी नित्याप्रमाणे पॉलिना देवळात जाते तेव्हा तिथला अत्यंत आदरणीय वृद्ध पुजारी तिला भेटतो, सांगतो की तिच्यासाठी परमेश्वराचा एक संदेश आहे. एवढ्या दिवसांची तिची भक्ती पाहून आनुबिस खूष झाला आहे. तिचं भलं करावं असं त्याच्या मनात आहे. त्या रात्री तिनं देवळात झोपावं, आनुबिस तिच्यापाशी येईल. पॉलिना घरी जाते आणि ही गोष्ट तिच्या नवऱ्याच्या कानावर घालते. त्याला आश्चर्य वाटतं, आनंदही होतो. असा एवढा बहुमान मिळावा ! आणि तो अनुमती देतो. त्या रात्री पॉलिना देवळात झोपते. आनुबिस देवाची वस्त्रं, आभूषणं चढवून मुंडस तिच्यापाशी येतो, शय्यासोबत करतो. निरोप घेण्यापूर्वी तिला सांगतो तिच्या पोटी जन्माला येणारा पुत्र प्रत्यक्ष परमेश्वर असेल.

या दोन्ही कथांमधील संविधानक आणि निवेदन शैली यात विलक्षण साम्य आहे. या दोन्ही मूर्ख आणि भोळ्याभाबड्या स्त्रियांची कपटानं फसगत करण्यात आली आहे. समर्पणाची भावना दोघींमध्येही प्रबळ आहे. त्यापैकी एक, गॅब्रिएल देवदूताच्या प्रत्येक प्रतिमेसमोर एकेक मेणबत्ती पेटवून ठेवत असते, आणि दुसरी, भक्तिभावानं आनुबिसच्या देवळात दर दिवशी जाते. तिच्यापाशी जे काही आहे ते त्याला समर्पित करते. दोघीही सुंदर आहेत; दोघीही अतिशय घमंडी आहेत, एकीला तिच्या देखणेपणाची घमेंड तर दुसरीला तिच्या सत्‌शील चारित्र्याची. या घमंडीपोटी मर्त्य प्रियकरांना त्या झिडकारतात. सर्व स्त्रियांमधून आपल्या एकटीचीच दैवी पुरुषानं निवड करावी याचा त्या दोघींना नको इतका अभिमान आहे. देवाच्या ढोंगी मध्यस्थ्यांकरवी या दैवी प्रेमाची त्या किंमत मोजतात. हास्यास्पद बढाईची धुंदी चढल्यानं त्यांच्या प्रियकरांच्या कपटांना त्या बळी पडतात आणि नंतर एकजण तिचा देवदूत परत येण्याची आतुरतेनं वाट पाहात राहाते आणि दुसरी, नवऱ्यासंगे परमेश्वराच्या जन्माची प्रतीक्षा करीत बसते. स्त्रियांचा मूर्खपणा, त्यांना

फसवणाऱ्यांची लबाडी, आणि ज्यांना प्रत्येकजण संत समजतो त्या धर्मगुरूंची फसवेगिरी यांचं चित्रण करण्यात बोकाचीओ रंगतो. भोळसट म्हणून त्या दोघींचीही प्रत्येक जण खिल्ली उडवतो. बनावट आनुबिसची शिक्षा, आल्बर्तोला भोगाच्या लागलेल्या शिक्षेएवढी कडक नसते. आल्बर्तो आणि आनुबिसचा पुजारी परमेश्वराच्या सेवेत असल्यामुळं, त्यांना कडक शासन. दोन्ही कहाण्यांमधील मूलभूत मसाला एकच. पॉलिनची कथा 'देकामेरॉन'मध्ये सहज खपून जाऊ शकली असती.

कलात्मकदृष्ट्या 'देकामेरॉन'चा दर्जा 'कन्सर्निंग फेमस वूमेन' पेक्षा बराच वरचा आहे. 'देकामेरॉन' मधील विनोद व उपरोध, सहजसुंदर गद्य भाषा, खेळकर निवेदन शैली स्त्रियांच्या चरित कहाण्यांत आढळत नाही. तथापि, दोन्हीमध्ये एक समान सूत्र आहे. नीतिपाठवजा तात्पर्य. बोकाचीओ हा प्रामुख्यानं बोधवादी लेखक आहे. या संदर्भात मासेत्तो ('देकामेरॉन') व 'व्हिआ इलिआचं जीवन' ('कन्सर्निंग फेमस वूमेन') या कथांची तुलना केल्यास ध्यानी येईल की त्याच्या हास्याला नैतिकतेचा अंत:स्तर आहे. कलात्मकदृष्ट्या या दोन्ही कथांमध्ये कसलंच साम्य नाही. मॉसेत्तोची कथा ही 'देकामेरॉन' मधल्या उत्कृष्ट कथांपैकी एक आहे. व्हिआ हे घटनांचं केवळ रूक्ष निरूपण आहे. तथापि, दोन्ही कथांचं तात्पर्य मात्र एक आहे.

मासेत्तो हा धूर्त तरुण. अंगी तारुण्याची रग . पशूचा जोष. तो विषयलंपट आहे. आपल्या कामवासनांची येन केन प्रकारे तृप्ती करून घेणं हेच त्याच्या आयुष्याचं एकमेव उद्दिष्ट. एक दिवस, योगायोगानं, एका म्हाताऱ्याशी त्याची गाठ पडते. तो म्हातारा एका मठात माळ्यांचं काम करीत असे. तो मासेत्तोला सांगतो की त्या मठात भर ज्वानीतल्या पोरी आहेत. त्यांना काही कामधंदा नसल्यामुळे त्याची खिल्ली उडवण्यात, त्याला छेडण्यात त्या साऱ्या जणींना स्वारस्य. दिवसभरात त्यांचं काम हेच, मौजमजा हीच. मासेत्तो त्याचं बोलणं निमूट ऐकून घेतो, काही बोलत नाही. पण वेळ न दवडता त्या मठाची वाट धरतो. तिथं तो मुका बहिरा असल्याचा बहाणा करतो. त्याला नोकरीवर ठेवण्यात येतं. त्याचं तारुण्य, रूप, सुदृढ देह पाहून तिथल्या दोघी जोगिणी त्याला एकांत स्थळी नेऊन आपल्या देहाची भूक भागवून घेतात. गुपचूपपणे हा प्रकार चालू असतो. एक दिवस हे गुपित उघडकीला येतं. त्या दोघी जोगिणीत आणखीन सातजणींची भर पडते. दिवसा मठाचं काम आणि रात्रौ कामोपभोग. बिचारा दमून भागून वृक्षाच्या सावलीत निद्रिस्त झालेला असताना 'ॲबेस'ची नजर त्याच्यावर पडते. वाऱ्यानं त्याच्या अंगावरचा चोळणा दूर सारलेला. शस्त्र उघडं पडलेलं. ती हलकेच त्याला उठवते आणि तिच्या दालनात घेऊन जाते.

बागेची मशागत करायला नवा माळी बरेच दिवस आला नाही म्हणून बाकीच्या तक्रार करतात. तरीही त्यांच्या तक्रारीकडे दुर्लक्ष करून बरेच दिवस ती त्याला आपल्या दालनात ठेवून घेते, मनमुराद उपभोग घेते. अखेर एक दिवस त्याला त्याच्या मांगरात जाऊ देते. पण पुन:पुन्हा बोलवून त्याच्याशी शय्यासोबत करते. तो मुका. रात्री मूक कारभार. बिचाऱ्याचा जीव मेटाकुटीला येतो. एका रात्री, ॲबेससंगे असताना न राहवून त्याला वाचा फुटते :

"बाईसाहेब, मी असं ऐकलंय की कोंबडा अर्धा डझन कोंबड्यांना पुरून उरतो, पण अर्धा डझन पुरुष एका स्त्रीचं क्वचितच समाधान करू शकतात, आणि मला तर नऊ जणींची सेवा करावी लागते. इत:पर तगून राहाणं अशक्य. मला जाऊ द्यावं." हा मुका चक्क बोलू शकतो ! ॲबेस अचंबा करते; "मी तुला मुका समजत होते !" "बाईसाहेब, मी खरोखरीच मुका होतो," मासेत्तो उत्तर देतो. "जन्मापासून नव्हे, पण एक आपत्ती ओढवली आणि माझी वाचा गेली. इतक्या दिवसांनी, आत्ताच तुमच्यासमोर मला वाचा प्राप्त झाली, परमेश्वराचे आभार."

बाईचा त्याच्या सांगण्यावर विश्वास बसतो. पण ती त्याला पुसते नऊजणींची सेवा तो करतो म्हणजे काय? तो तिला एकूण प्रकार कथन करतो. पण मासेत्तोला हातचा गमावण्यास ती राजी नसते. ती इतरांशी संगनमत करते. हा बाहेर गेला, आणि काहीबाही बरळला तर मठाची नाचक्की होईल. त्या ठरवतात की त्याला मठात ठेवून घ्यावा. तो राहिला. जोगिणींनी केलेल्या प्रार्थना आणि ज्याच्या नावानं तो मठ स्थापन केला होता त्या महात्म्याची पुण्याई, यामुळे मुक्याला वाचा फुटल्याची वार्ता गावभर होते. मठाची ख्याती सर्वदूर पसरते. मासेत्तो त्याचं तारुण्य सत्कारणी लावतो, जोग्यांना या जगात जन्माला घालण्यात जवानी खर्च करतो. त्यांच्या संगोपनावर खर्च न करता, खस्ता न काढता.

ऱ्हिआ ही ग्रीक-रोमन पुराणातील एक देवता. तिची कहाणी सुपरिचित आहे. काही एका राजकीय उद्दिष्टासाठी तिला व्हेस्टा या देवतेला वाहिलेलं असतं. आयुष्यभर कौमार्य जपण्याची सक्ती तिच्यावर असते. परंतु नैसर्गिक प्रवृत्ती प्रबळ ठरतात. तिच्यावर घातलेल्या बंधनाचं पालन ती करू शकत नाही. रोम्युलस आणि रेमस यांना ती जन्म देते. आणि तिच्या या अपराधासाठी तिला जीवे मारण्यात येतं. ही कहाणी कलात्मक करण्याचा वा ऱ्हिआची शोकांतिका प्रभावीपणे रेखाटण्याचा बोकाचीओ काहीच प्रयत्न करताना दिसत नाही. तिच्या कथेचा एक खुंटी म्हणून तो वापर करतो, जिच्यावर त्याला द्यावयाचा नीतिपाठ तो टांगू शकतो. ज्या वयात जीवन म्हणजे काय, जीवनाकडून आपल्याला काय मिळू शकतं हे कळत नाही त्या अजाण वयात मुलींना त्यांच्या मर्जीविरुद्ध मठात ढकलण्यात येतं. आयुष्यात आपण किती गोष्टींना मुकणार आहोत याची त्यांना यत्किंचितही कल्पना नसते.

बोकाचीओ या रूढीचा जोरदार निषेध करतो. जे कोणी त्या जोगिणी व्हाव्यात म्हणून त्यांच्यावर बळजबरी करतात, ते समजून चालतात, शुचिर्भूत जीवन जगण्याचा पवित्र मार्ग त्यांनी त्यांना दाखवला आहे, पण त्यांच्या ध्यानी येत नाही की देह स्वत:ची भूक भागवण्याचा प्रयत्न करणारच. बोकाचीओला हे प्रकार हास्यास्पद आणि बिनडोकपणाचे वाटतात. ही रूढिप्रिय माणसं म्हणतात, देवाच्या चरणी त्या कुमारिका त्यांनी वाहिलेल्या आहेत. कारण त्यांच्या प्रार्थनांकरवी त्या आत्मोन्नती साधू शकतात, मृत्यूनंतर त्यांना स्वर्गप्राप्ती होऊ शकते. तद्दन मूर्खपणा. 'त्यांना ठाऊक नाही रिकामटेकडी जोगीण व्हिनस'ची सेवा करतात. आणि वेश्यांचा त्यांना आत्यंतिक हेवा वाटतो, ज्यांच्या खोल्या त्यांना स्वत:च्या कोठड्याहून पसंत असतात. धिक्कार असो त्या मातापित्यांचा आणि अन्य नातलगांचा, जर का त्यांना वाटत

असेल ज्या गोष्टी ते टाळतात आणि ज्यांचा स्वीकार त्यांना अवघड आहे त्या इतरांना सहज साध्य आहेत, सोसू शकणं जमेल त्यांना? हाच विषय मासेत्तोच्या कथेत नाहीये का? ही कथा म्हणजे निसर्गाचं सामर्थ्य आणि स्त्रियांवरील अन्याय यांचा exemplum नाहीये का? अर्थात यात बोकाचीओ उघड उघड बोध करीत नाही.

एक गमतीदार कथा म्हणून वाचक तिचा आस्वाद घेतो. तथापि, या कथेतही त्याचा जो दृष्टिकोन आहे तो वाचकांच्या ध्यानी यावा, याची चतुराईनं खबरदारी घेतलेली आहे, मूळ पिंड बोधवाद्याचा असल्यामुळं त्याला ते प्रलोभन टाळता आलेलं नाही हे या कथेच्या प्रारंभावरून ध्यानी येतं : 'रूपवान ललनांनो, अशी महामूर्ख माणसं बरीच आहेत ज्यांना वाटतं की एकदा का मुलीच्या डोक्याभोवती एक सफेत पट्टा बांधला आणि तिच्या पाठीवरून एक काळा 'काउल्' सोडला की ती स्त्री राहात नाही, स्त्रीसुलभ भावना तिच्यात उरत नाहीत ! जणू काही एक जोगीण बनल्यानं तिचं एका दगडात रूपांतर झालं आहे ! ज्यावर त्या महामूर्खांची श्रद्धा आहे असं समजतात त्याच्या विरोधात त्यांच्या काही कानी आलं तर एखादी निंद्य गोष्ट असल्यागत ते खवळतात, अनैसर्गिक पाप घडलेलं आहे. त्यांचे स्वतःचे व्यक्तिगत अनुभव दुर्लक्षित करतात.'

तरीदेखील 'देकामेरॉन' आणि 'कन्सर्निंग फेमस वूमेन' एकाच माणसानं लिहिली आहेत, यावर विश्वास ठेवणं काही समीक्षकांना जड जातं. 'देकामेरॉन'च्या लेखकामध्ये ते एक स्त्रीलंपट पाहातात आणि स्त्रियांच्या चरित्रकारांमध्ये एक बोधवादी पाहातात. या भिन्न रूपांचा अन्वय लावण्याचा प्रयत्न बऱ्याचजणांनी केलेला आहे. हॉर्टिसच्या मते, या दोन्ही साहित्य कृतींच्या लेखनकालात दहा वर्षांचं अंतर आहे. बोकाचिओ आता वृद्ध झाला आहे, आयुष्यातील मौजमजा उपभोगणं आता त्याला शक्य नाही, म्हणूनच त्या गोष्टींसाठी इतरांना शासन करणाऱ्या निष्ठूर न्यायाधिशाची भूमिका त्यानं स्वीकारलेली आहे. लांन्दो (Landau) म्हणतो, स्त्रियांवरील प्रबंध हा एक 'चांगला' ग्रंथ आहे, जो आपली कोठडी सोडून कधीच बाहेर पडलेला नाही अशा एका सात्त्विक धर्मगुरूनं तो लिहिला असण्याची शक्यता आहे. पण सत्य हे आहे की बोकाचीओनं बोधवाद्याची भूमिका कधीही सोडलेली नाही. त्याच्या एकूण एक साहित्यकृतींमधून, या जगातील माणसाची परिस्थिती, त्याचं स्वातंत्र्य, त्याचे कर्तव्य आणि कर्तव्यबुद्धी, त्याला दास्यत्वाला ठेवणारी बंधनं यावर त्यानं बराच भर दिलेला आहे. 'देकामेरॉन' व 'स्त्रीचरित्र' यामध्ये त्यानं जो भर दिलेला आहे त्यात भिन्नता आहे म्हणून त्या साहित्यकृतींचं स्वरूप भिन्न वाटतं. दोन्हींमध्ये तात्पर्य आणि exemplum असल्याचं आढळून येतं. परंतु लेखक म्हणून त्यानं जी भूमिका या दोन्हींमध्ये घेतलेली आहे ती वेगवेगळी आहे.' 'देकामेरॉन' मध्ये वाचकाचं रंजन करणं हेच त्याचं प्रमुख उद्दिष्ट, तर 'स्त्रीचरित्रामध्ये' पाठ देणं. म्हणूनच दोन्हींमध्ये तात्पर्य एकच. 'देकामेरॉन'मध्ये ते प्रच्छन्नरित्या आलेलं आहे इतकंच.

---

# लेखमाला

## प्रेमपुजारी डी. एच्. लॉरिन्स

– श्रीकृष्ण कामत

### पंधरा

सेल्तझरचा प्रकाशन व्यवसाय डबघाईला आला होता. तरी त्यानं शिकस्तीनं लॉरेन्सला ३,००० डॉलर्स दिले. पैसे स्वीकारताना लॉरेन्सलाही वाईट वाटलं पण पैशाची त्यालासुद्धा निकड होती. २१ सप्टेंबर १९२५ रोजी मध्यरात्री लॉरेन्स आणि फ्रीडा न्यूयॉर्कला एस. एस. रेझोल्यूट वर चढले आणि ३० सप्टेंबरला साउदैम्पटनला उतरले. तिथून ते लंडनला गेले, गारलॅंडचं हॉटेल 'पालमॉल' येथे राहिले. इंग्लंडमधील वातावरण उत्साहवर्धक नव्हतं. जनतेवर औदासिन्याचं सावट होतं. लाखो लोक बेकार होते. तरी हलकी काम करायलाही माणूस मिळत नव्हता.

आठवडाभर ज़री काम केलं तरी बेकाराच्या यादीतून नाव वगळलं जायचं, पण नोकरी सुटल्यानंतर पुन्हा त्या यादीत नाव समाविष्ट करून घेणं भारी जिकिरीचं होऊन बसायचं. म्हणून काम करायला कुणी तयार होत नसे. राहाणीमान न्यूयॉर्कपेक्षाही खर्चिक होतं. रांचवरील शांत वातावरण, घोडे, स्वच्छ सूर्यप्रकाश हे सारं सोडून इंग्लंडमधल्या ढगाळ आणि उदास वातावरणात राहायला आलो याचं वैषम्य लॉरेन्सला पदोपदी वाटत होतं. पण तिथं, एखाद्याला मायभूमीबद्दल आशाहीन आकर्षण वाटत असतं, तो मायभूमीपासून दूर असतो.

लॉरेन्स आणि फ्रीडा बार्बरा विकलीला भेटली. या भेटीत आपल्या नियोजित वराचा बार्बरानं लॉरेन्सांशी परिचय करून दिला. या प्रथम भेटीतच लॉरेन्सला तो पसंत पडला नाही. तरी तो त्याच्याशी अदबीनं वागला. ती दोघं निघून गेल्यानंतर लॉरेन्सनं फ्रीडाला सांगितलं की तिच्या मुलीची त्या तरुणाच्या हातून सुटका करायला हवी, तो नेभळट आहे. त्यानंतर तो नॉटिंगहॅममध्ये सर्दीनं अंथरुणाला खिळलेला असताना बार्बरा त्याला भेटायला गेली तेव्हा पडल्या पडल्या तिचं भलं कशात आहे हे जणू काही आपल्याला कळतं आणि ते सांगण्याची जबाबदारी आपली आहे अशा थाटात त्यानं बार्बराला ऐकवलं की तिचा वाग्दत्त वर दुबळा आहे, त्याच्यात रग नाही, जीवनातील आपत्तींना घाबरून त्यापासून पळून जाणाऱ्यांपैकी तो आहे. तस्मात, कुत्रा जसा अंगावरील माशा झटकतो तसं तिनं त्याला झटकून टाकावं.

ऑक्टोबरमध्ये लॉरेन्स आपल्या दोन्ही बहिणीकडे जाऊन राहिला. एमिली घुमी होत

असल्याचं त्याच्या ध्यानी आलं. तिचा नवरा युद्धावरून परतल्यानंतर त्यांच्यात बेबनाव झाला होता. त्या दोघांमध्ये सलोखा निर्माण व्हावा म्हणून लॉरेन्सनं आपल्या परीनं प्रयत्न करून पाहिला. ॲडा रिप्लेमध्ये राहात होती. डर्बीच्या थोडं बाहेर. हवा दमट होती तरी तो राहिला. बहिणींच्या घरी आता पूर्वीच्या मानानं सुबत्ता होती, 'पण मला पूर्वीचेच दिवस आवडतात, अर्थात, मला ते पुन्हा यायला नकोत.' बार्बरा मुद्दाम त्यांना भेटायला आली. तिनं पाहिलं, लॉरेन्स ॲडाचं दैवत आहे, त्याच्यावर तिची जिवापाड माया आहे आणि फ्रीडानं त्याला आपल्यापासून हिरावून नेलं म्हणून तिला माफ करण्यास अद्याप ती राजी नव्हती. तिच्या घरात आपली आई परक्या घरात असल्यासारखी अवघडून वागत असल्याचंही तिच्या नजरेतून निसटलं नाही. तिनं आपल्या तरुण मित्राबरोबरचे संबंध तोडून टाकावेत म्हणून लॉरेन्सनं यावेळीही तिला सल्ला दिला. (त्याच्या मनाजोगतं पुढे घडून आलंही) तिनं रात्रौ घरी राहावं म्हणून लॉरेन्स आणि फ्रीडा, दोघांनीही तिला आग्रह केला. ती तयार झाली पण मुक्काम करायचा म्हणजे परवानगीची आवश्यकता होती. ती वडिलांच्या मित्राकडे राहात असे. त्यांना फोन करण्यासाठी ती बाहेर गेली आणि हिरमुसल्या चेहऱ्यानं परतली. परवानगी नाकारण्यात आल्याचं तिनं सांगितलं. फ्रीडाला अजूनही अशी अपमानास्पद वागणूक दिली जाते म्हणून लॉरेन्स खवळला.

त्यानंतर दहा दिवसांनी लॉरेन्स आणि फ्रीडा लंडनला परतले. कॅथरीन कार्सवेलचा भाऊ गॉर्डन मॅकफारलेन याचं गोवर स्ट्रीटवर घर होतं. तिथं ते राहू लागले. त्यांना साहित्यिक वर्तुळामधून भेटीची आमंत्रणं येऊ लागली. कादंबरीकार मागरिट केनेडी हिच्या सत्कार समारंभालाही त्यांनी हजेरी लावली. या समारंभात त्याचा विल्यम गेरहार्डीशी (Gerhardie) परिचय झाला. या तरुण लेखकाचं 'द पॉलीग्लोटस्' नुकतंच प्रसिद्ध झालं होतं. लॉरेन्सनं त्याला आपल्या घरी भोजनाचं आमंत्रण दिलं. तो घरी गेला. त्यानं पाहिलं, सुदृढ गृहिणी आरामात बसलेली आहे आणि आजारी नवरा सगळं कामकाज करीत आहे. त्यानं स्वयंपाक केला, अतिथीला वाढलं. नंतर गप्पा सुरू झाल्या. संभाषणाच्या ओघात फ्रीडा लॉर्ड बिव्हरब्रूक बद्दल रागानं तावातावानं बोलली. लॉर्ड बिव्हरब्रूक तेव्हा गेरहार्डीचा 'पेट्रन' होता. लॉरेन्सनं फ्रीडाला अडवलं आणि सांगितलं की तिनं एवढं खवळणं बरं नाही. त्यावर फणकाऱ्यानं तिनं प्रत्युत्तर दिलं, मला खवळायचं आहे, मी खवळेन आणि "यू गो टू हेल." एवढ्या वर्षातही त्यांच्यामधील संबंधाचा 'पॅटर्न' बदललेला नव्हता.

ऑक्टोबर अखेरीस लॉरेन्स आणि मिडल्टन मरे यांची भेट घडून आली. ही भेट अखेरची ठरली. १९२४ च्या ग्रीष्मात मरेनं व्हायोलेट ला माईस्ट्रे (L e Maistre) हिच्याशी विवाह केला होता. 'अडेल्फी' मध्ये ती त्याची सहाय्यक होती. ती आजारी होती. तशात तिचं बाळंतपण जवळ आलं होतं. मरे डॉरसेटला राहात. आपल्या बायकोला अशा नाजूक अवस्थेत रात्रीचं एकटं सोडून जाणं मरेला योग्य वाटत नव्हतं. त्यानं लॉरेन्सांना आपल्या घरी येण्याचं आमंत्रण दिलं. लॉरेन्सनं नकार दिला तेव्हा मरे त्यांना भेटायला लंडनला गेला.

फ्रीडाला भेटण्याची इच्छा त्याच्या मनात असेलही, पण लॉरेन्स त्याला भेटला तेव्हा फ्रीडा त्याच्या नजरेला पडणार नाही याची कटाक्षानं खबरदारी घेण्यात आली होती. लॉरेन्स नेहमीप्रमाणेच भांडणाच्या मूडमध्ये. या माणसाचं ऐकून इथलं सारं सोडून आपण याच्याबरोबर न्यू मेक्सिकोला गेलो असतो तर आपलं काय झालं असतं हा विचार मरेच्या मनात डोकावल्यावाचून राहिला नाही. तथापि दोघांनीही समंजसपणानं एकमेकांचा निरोप घेतला. डॉरसेटला आपल्या शेजारी घर घेऊन लॉरेन्सांनी राहावं ही मरेची विनंती लॉरेन्सनं अव्हेरली पण इटालीला आपल्या शेजारी मरेनं येऊन राहाण्याचा मात्र आग्रह केला.

बादेन - बादेनला फ्रीडाच्या सासूला धावती भेट देऊन लॉरेन्स नोव्हेंबरच्या प्रारंभी इटालीला पोचले. यावेळी लॉरेंचा ब्रिटिश प्रकाशक मार्टिन सेकर याच्या शिफारशीवरून त्यांनी स्पोर्तोर्नो येथे स्थायिक होण्याचं ठरवलं. हे गाव जिनोआच्या पश्चिमेला होतं. तिथं टेकडीवरील लालसर रंगाचा व्हिला बेर्नार्दा त्यांनी भाड्यानं घेतला. व्हिला समुद्रकिनाऱ्यावर आहे. माँटे कार्लोपासून तीनेक मैलावर. (वस्तुत: त्याहून अधिक) घरकाम आम्ही स्वत:च करतो. मोलकरीण ठेवण्यास फ्रीडानं हट्टानं नकार दिला. तळमजल्यावर माळी राहातो. तो सारी कामं करतो, नेण्याआणण्याची. दर दिवशी सकाळी बाजारहाट करायला जातो, पंपानं पाणी भरतो आणि आम्हाला हवा त्यावेळी हजर असतो.

\ आमच्यापाशी तीन मजले आहेत. आम्ही जास्त करून सर्वात वरच्या मजल्यावर राहातो तिथं स्वयंपाकघर आहे आणि बेडरूम आणि दिवाणखाना. दिवाणखान्याला लागून प्रशस्त गच्ची. दुसऱ्या मजल्यावर आम्ही झोपतो. तळमजला ही सामानसुमान ठेवण्याची जागा. चांगला सूर्यप्रकाश, कोरडी हवा. आम्ही टेकडीवर फेरफटका मारतो आणि काहीबाही करीत असतो. काल रात्री आम्ही झाडांवरून संत्री काढली आणि जाम बनवला. माझ्याकडून तो थोडासा करपला. पण चांगला होता. फ्रीडांची धाकटी मुलगी बार्बरा अलास्सिओमध्ये राहाते, पंचवीस एक मैलाच्या अंतरावर. ती येते, एखाद दुसरा दिवस आमच्याबरोबर राहाते. रपेट मारायला इथं घोडे नाहीत, पाणी भरून आणायला इथं झरे नाहीत...! पण लॉरेन्सला हा थारेपालट पसंत पडला होता.

व्हिला बेर्नार्दा, सावोनामधील बेर्साग्लोएरीचा लेफ्टनंट ॲन्जेलो रावाग्ली याच्या मालकीचा होता. त्याची बायको सावोना येथील एका शाळेत इटालियन आणि फ्रेंचची शिक्षिका होती. हा व्हिला रावाग्लीनं त्यांना पहिल्यांदा दाखवायला नेलं त्या दिवशी इटालीच्या राणीचा वाढदिवस होता. म्हणून त्याच्या अंगावर झकपक पोषाख होता. झुबकेदार तुरे आणि गोंड्याचा निळा रुंद पट्टा या गणवेषात तो रुबाबदार दिसत होता. त्याला बघावं म्हणून लॉरेन्सनं फ्रीडाला मुद्दाम बाहेर घराची बोलणी करीत असताना बोलावून घेतलं होतं.

त्यानंतर रावाग्लीची लॉरेन्सांशी भेट झाली, तो स्टोव्ह दुरुस्त करायला घरी आला तेव्हा. यावेळी त्याचा पोषाख साधा होता, कामगारांच्या अंगावर असतो तसा. धुराची चिमणी बसवण्याच्या कामी लॉरेन्सला मदत करायला तो आपणहून छपरावरदेखील चढला. हा

माणूस कायओवा रांचवर फार उपयोगी पडेल हा विचार लॉरेन्सच्या मनाला स्पर्शून गेला. त्याचा हा विचार भविष्यसूचक ठरला. लॉरेन्सच्या निधनानंतर तो फ्रीडाचा नवरा व्हायचा होता आणि तिच्या मृत्यूपर्यंत तो तिच्यासंगे रांचवर राहाणार होता.

दर आठवड्याच्या अखेरीस रावाग्ली स्पोर्तोनाला येऊ लागला आणि लॉरेन्स त्याला इंग्रजीचे पाठ देऊ लागला. तेवढ्यात फ्रीडानं त्याच्याशी सूत जमवलं. तो तीन मुलांचा बाप होता, बायांच्या बाबतीत काहीसा स्वैर वर्तनाचा होता. ती त्याच्याहून काहीशी जाडजूड होती, उंचही होती, बारा वर्षांनी मोठी होती पण अजूनही तिचा जोम कायम होता, जीवन उपभोगण्याचा सोस अद्याप ओसरलेला नव्हता. ब्रेट्टला पाठवलेल्या पत्रात तिनं लिहिलं : 'आमच्याकडे बेर्साग्लीएरोचा छानसा छोटा ऑफिसर येतो. व्हिला त्याच्या मालकीचा आहे. त्याच्या झुबकेदार तुऱ्यात मी "थ्रिल" झाले आहे, आणि त्याच्या तुऱ्याएवढाच तो मस्त आहे.'

बार्बरा डिसेंबरमध्ये लॉरेन्साकडे आली. तिच्याशी लॉरेन्सचं छान जमत असे. तिला तो इटालियन भाषा शिकवत असे. या भेटीत तिच्या ध्यानी आलं की लॉरेन्स आणि फ्रीडा यांच्या नित्याच्या भांडणतंट्यांना आता उधाण आलं आहे. निमित्त अर्थातच, रावाग्ली. फक्त त्याच्या नावाचा उघड उल्लेख केला जात नसे एवढंच. या प्रकरणात बार्बरानं आपल्या आईच्या विरोधात उभं राहावं, तिची सहानुभूती आपल्याला मिळावी यासाठी लॉरेन्स प्रयत्नशील राहिला. आईबद्दलचा बार्बराचा आदर कमी व्हावा म्हणून संधी साधून लॉरेन्स फ्रीडाच्या वागणुकीवरून नाक मुरडू लागला. ती सिगारेटी खूप ओढते, वखवखल्यासारखी खात असते आणि त्याचे विचार न कळताही त्यावर अक्कलहीनासारखी काहीतरी बडबडत असते. चारचौघात बार्बरा खूष व्हावी म्हणून तिच्याकडून तिचा साधेपणा फ्रीडानं शिकावा हे ही लॉरेन्सनं सुनावलं. वर उपरोधानं म्हणाला की, आपण कुणीतरी महत्त्वाची व्यक्ती आहोत अशी स्वत:ची समजूत घालण्याची गरज तिला भासत असते.

त्यांच्या या भांडणांचा ताप बार्बरा स्वत:च्या डोक्याला करून घेत नसे. एका सकाळी लॉरेन्सांच्या बेडरूममधील जोरदार आदळ आपटीनं तिला जाग आली. ती उठली आणि त्यांच्या बेडरूमच्या दारात जाऊन उभी राहिली. फ्रीडाच्या डोळ्यांतून आसवांच्या धारा लागल्या होत्या, पांढराफटक लॉरेन्स मुखस्तंभासारखा पलंगाच्या कडेला बसून राहिला होता. फ्रीडाची तडफ तिच्या लेकीच्या अंगीही उतरली होती. लॉरेन्सचं वागणं अन्याय्य असल्याचं तिला आढळल्यास ती त्याला फैलावर घेण्यास कचरत नसे. एका संध्याकाळी ती, फ्रीडा आणि लॉरेन्स जेवायला बसली असताना तो म्हणाला की, तिच्या आईचं तिच्यावर प्रेम नाही, कुणावरही ती प्रेम करू शकत नाही. पहा तिच्या खोटारड्या मुखड्याकडे आणि रेड वाइनचा ग्लास फ्रीडाच्या दिशेनं भिरकावला. बार्बरा खवळली, गरजली, "माझ्या आईला तू शोभत नाहीस ..... डुकरापुढं मौक्तिकं फेकण्यासारखं आहे हे!"

त्यांची भांडणं विकोपाला जायला आणखीनही एक कारण होतं, ते म्हणजे लॉरेन्सचं

नपुंसकत्व. क्षयाच्या व्याधीनं त्याचा देह पोखरला होता. कामोत्सुक फ्रीडाला शरीरसुख देण्याइतपत जोम त्याच्यात उरलेला नव्हता. या उलट फ्रीडा अजूनही निकोप होती, शरीरसुखासाठी तिचा देह अजूनही तहानेला होता. आणि हीच गोष्ट लॉरेन्सला सलत होती, त्याच्या चिडचिडीला कारणीभूत ठरत होती. रिचर्ड ॲल्डिंग्टन सांगतो की १९२६ मध्ये फ्रीडानं आपल्यापाशी तक्रार केली होती की तिला शरीरसुख देण्यास लॉरेन्स शारीरिकदृष्टया दुबळा झालेला आहे. रावाग्लीबरोबरच्या शरीरसंबंधाचं समर्थन करण्यासाठी तिनं हे समर्थन केलेलं असावं हे ॲल्डिंग्टनचं अनुमान. हे अनुमान फ्रीडाविषयीच्या आकसापोटी आणि लॉरेन्सवरील आत्मीयतेपोटी त्यानं काढलं असेलही, पण फ्रीडाचं म्हणणं त्यानं प्रांमाणिकपणे नोंदवलं होतं याबाबत शंका घेण्याचं कारण नाही.

लॉरेन्सांच्या घरातील वातावरण आधीच तणावग्रस्त. तशात तो फ्ल्यूनं आजारी. तशात लॉरेन्सची बहीण ॲडा आणि ईस्टवूड मधील तिची मैत्रीण मिसेस बुश, फ्रीडाच्या मुली एल्सा आणि बार्बरा, १९२६ च्या फेब्रुवारीमध्ये एकाच वेळी लॉरेन्सांच्या घरात दाखल झाल्या. ताणतणाव अधिकच चिघळले. ॲडाची आपल्यावरील माया आणि सहानुभूती पाहून लॉरेन्स तिच्यापाशी फ्रीडाबद्दलच्या तक्रारी करू लागला. आपल्या भावजयीविषयी ॲडाच्या मनात आधीच अढी होती.

आता रावाग्लीबरोबरचं तिचं वागणं पाहून तिची अढी अधिकच दृढ झाली. एका सकाळी तिनं फ्रीडाला ऐकवलं, "मी तुझा पोटतिडकीनं तिरस्कार करते." आईच्या मायेनं लॉरेन्सचा सांभाळ करण्याची जिम्मेदारी आता तिची होती. त्याच्याबाबतीत ती 'पझेसिव्ह' बनली. त्याच्यापासून फ्रीडाला चार हात लांब ठेवणं तिला जरुरीचं वाटलं, एका रात्री फ्रीडा तिच्या खोलीत गेल्यानंतर तिच्या खोलीला ॲडानं बाहेरून कडी घातली, कुलूप लावलं आणि चावी स्वत:पाशी ठेवली. लॉरेन्सच्या सांगण्यावरूनच ॲडा असं वागण्यास धजावली अशी फ्रीडानं स्वत:ची समजूत करून घेतली. ती सांगते, लॉरेन्सचं हे एकच कृत्य, ज्यापायी ती खरोखरीच दुखावली गेली होती. तिनं आपलं काळीज घट्ट केलं, निर्णय घेतला; इत:पर लॉरेन्सला दयामाया नाही. आणि लागलीच रावाग्लीबरोबर 'अफेअर' सुरू केलं. बार्बरा आणि एल्सा यांना बरोबर घेऊन हॉटेलात जाऊन राहिली, ॲडाला रान मोकळं करून दिलं.

ॲडा पंधरा दिवसांनी इंग्लंडला निघून गेली तरी फ्रीडा लॉरेन्सला बघायला घराकडे फिरकलीही नाही. आजारी असूनही लॉरेन्स एकटाच भ्रमंतीला बाहेर पडला. निरुद्देश भटकणं. १९२३ मध्ये कॅलिफोर्निया आणि मेक्सिको या शहरांमधून तो असाच भटकला होता. फ्रीडाविना ती भ्रमंती त्याला सुनीसुनी वाटली होती. या वेळीही तशीच परिस्थिती होती. प्रथम तो मॉन्टे कार्लोला गेला. तिथून ब्रुस्टरांना भेटायला त्यानं काप्रीकडे मोर्चा वळवला. डोरोथी ब्रेट्टचं वास्तव्यही काप्रीलाच होतं. लॉरेन्स अतिशय दु:खी असल्याचं तिला जाणवलं तरी काही काळ लॉरेन्सचा सहवास लाभणार, तोही फ्रीडाच्या जळफळाटाविना, म्हणून ती सुखावली. तिची खुषी कॉम्पटन मॅकेझीची बायको फेथ हिच्या नजरेतून निसटली नाही.

ख्रिस्ताच्या रूपातील लॉरेन्सचं एक पेंटिंग ब्रेट्टनं केलं होतं, ते तिनं त्याला दाखवलं. त्याच्या कपाळाला आठ्या पडल्या. त्याचं मन कशात रमत नव्हतं. अधूनमधून तो म्हणत असे की तो आणि ब्रेट्ट हे 'दोघंच केवळ उरले... बाकीचे सारे शत्रूला सामील झाले.' परंतु ब्रेट्टचं कोडकौतुकही फ्रीडाच्या वियोगाच्या यातना सुसह्य करू शकत नव्हतं. रावेग्लोच्या आसपास ते हिंडतफिरत. लॉरेन्स झोपत असे, भरपूर विश्रांती घेत असे, पण उदासी काही ओसरत नव्हती. त्यानं आपल्याकडे निघून यावं असं अनावधानानंही फ्रीडा त्याला लिहीत नसे. तिचं एक पत्र तर, मिसेस ब्रुस्टरच्या मते, अतिशय कठोर होतं आणि त्या पत्रानं त्याला फार बेचैन केलं होतं.

आयुष्याच्या अखेरीस (तेव्हा तिनं वयाची ऐंशी पार केलेली होती) ब्रेट्टनं दावा केला होता की रावाल्लोमध्ये एका रात्री लॉरेन्स तिच्या हॉटेलमध्ये गेला आणि तिच्या अंथरुणात शिरला. यासमयी ब्रेट्ट अनावर कामासक्तीनं अतिशय पेटून गेली होती, एथवर ठीक आहे. ब्रेट्टच्या या सांगण्यात तथ्य असेलही. पण तो तिच्याशी समागम करायला आला होता या तिच्या अनुमानावर विश्वास ठेवणं कठीण आहे. तिच्याबद्दल त्याला अजिबात लैंगिक आकर्षण नव्हतं. प्रलोभनं झालेली असूनही तो फ्रीडाशी आजवर एकनिष्ठ राहिला होता. शिवाय या काळात फ्रीडाशी समागम करण्याइतपत त्राण त्याच्या देहात नव्हतं, तो नपुंसक बनला होता. शक्यता आहे, औदासिन्याच्या भरात, एकाकी जीवनाला कंटाळून, अस्वस्थचित्तानं तो असा तऱ्हेवाईकपणानं वागलाही असेल. आपण काय करीत आहोत हे त्यांचं त्यालाही कळलं नसेल. ब्रेट्ट सांगते, फारसं काही घडलं नाही हे बरं नव्हे असं म्हणत थोड्याच वेळात लॉरेन्स उठला आणि निघून गेला. ती उद्ध्वस्त झाल्यागत डोळे विस्फारून तो गेला त्या दिशेकडे बघत राहिली.

ब्रेट्टची संगतही लॉरेन्सला एव्हाना तापदायक वाटू लागली. तेवढ्यात नेपल्समधील ब्रिटिश वकिलातीलमध्ये तिनं हजर व्हावं असं फर्मान तिच्या हाती पडलं. ताओसला परत जाण्यासाठी तिला हवा असलेला अमेरिकन व्हिसा तिथून तिला न्यायचा होता. लॉरेन्सची संगत सोडून न्यू मेक्सिकोला जाण्यास ती राजी नव्हती. प्रयाण लांबणीवर टाकण्याचा निर्णय तिनं घेतला. पण लॉरेन्सनं कठोरपणे तिला निघून जाण्यास फर्मावलं. ती खट्टू झाली. छोट्या नावेतून नाइलाजानं नेपल्सला जायला निघाली. तिनं दिलेला निळा हिरवा स्कार्फ हलवत लॉरेन्सनं तिला निरोप दिला. लॉरेन्सचं हे दर्शन अखेरचं ठरलं.

दरम्यान, मार्चअखेर फ्रीडाच्या पत्राचा सूर काहीसा मवाळ बनला होता. नमतं घेण्यास ती, अर्थातच, राजी नव्हती. ती आणि तिच्या मुली पुन्हा व्हिलामध्ये जाऊन राहू लागल्या होत्या आणि त्यांचा वेळ मजेत जात होता. तिघीही जणी खूष होत्या. आणि रावाग्ली व्हिलामध्ये येत होता आणि आई आणि तिच्या लेकी यांच्याबरोबर 'फ्लर्टिंग' करीत होता.

एक दिवस मेबल लोहानचं पत्र फ्रीडाच्या हाती पडलं लॉरेन्सशी पत्रव्यवहार करायला तिला निमित्त मिळालं होतं. तिनं आत्मचरित्र लिहिलं होतं आणि त्याबाबत लॉरेन्स सल्ला

देईल का अशी विचारणा तिनं केली होती. त्यानंतर काही दिवसांनी तिच्या हस्तलिखिताचं बाडही आलं. फ्रीडानं पोच देताना तिला लिहिलं, "प्लूम्ड सर्पंट"नं त्याचा जीव जवळजवळ घेतला होता. त्यानंतर त्याला जीवदान लाभलं आणि याचा लाभ तो सध्या घेत आहे. पुढं आत्मविश्वाससानं पुस्ती जोडली : 'लॉरेन्स लौकरच परत येईल, म्हणून हस्तलिखित मी इथंच ठेवून घेत आहे.'

फ्रीडाच्या सौख्याला मध्येच एक ओरखडा निघाला. लॉरेन्सनं तिला एक रेखाचित्र पाठवून दिलं या चित्रात देवमाशानं जोनाहाला जवळजवळ गिळून टाकलेलं होतं. चित्राखाली त्यानं लिहिलं होतं : 'कोण कुणाला गिळून टाकणार आहे?'

लॉरेन्स ब्रेट्टपाशी म्हणाला होता की काय करावं त्याला समजत नाही. 'मी लौकरच फ्रीडापाशी जाईन; सध्या ती शांत दिसते, पूर्वीपेक्षा मैत्रीचा सूर अधिक. सांगता येत नाही मला. तिचं शेवटचं पत्र खूपच चांगलं होतं.' पण आपण परत येत असल्याचं लॉरेन्सनं तिला कळवताच, आपले सुखासमाधानाचे दिवस संपुष्टात येणार याचं दुःख तिला झालं.

लॉरेन्सचा ठाम समज की तो आणि फ्रीडा यांच्यामध्ये समेट व्हायला तिच्या मुली कारणीभूत आहेत. फ्रीडाच्या संगतीत काही आठवडे घालवल्यानंतर, त्यांना लॉरेन्सविषयी सहानुभूती वाटू लागली होती. आपल्या आईला कसं हाताळायचं हे एव्हाना त्यांना ठाऊक झालं होतं. लॉरेन्सचं येणं पक्क झाल्यानं फ्रीडाच्या रागाचा पारा चढला होता. पण तिच्या मुली तिला म्हणाल्या, "मिसेस लॉरेन्स आता समजूतदारपणे वाग. तू त्याच्याशी लग्न केलं आहेस, म्हणून तुला त्याच्यापाशीच राहायला हवं." लॉरेन्स येणार त्या दिवशी फ्रीडा फुरंगटून बसली होती. जुनापुराणा पोषाख चढवून ती लॉरेन्सला स्टेशनवर भेटायला निघणार होती. पण तिच्या मुलींनी तिला झकपक पोषाख करायला लावाला.

ईस्टरच्या आदल्या दिवशी लॉरेन्स मिलानहून स्पोतोर्नोला परतला. फ्रीडा, एल्सा, बार्बरा त्याला घेऊन यायला स्टेशनवर गेल्या. लॉरेन्सनं सासूबाईला हा वृत्तांत कळवून लिहिलं : 'तूर्त मी ईस्टरचं कोकरू आहे.' त्यानंतर काही आठवड्यांनी त्यानं काहीशा समाधानी वृत्तीनं नमूद केलं आहे : 'तिच्या मुली तिच्याशी कठोरपणे वागतात, आणि तिच्यावर अक्षरशः तुटून पडतात तिचा अहंपणा मिनिटभरही त्या खपवून घेत नाहीत : ती चवताळते, नंतर आम्हा साऱ्यांशी नम्रतेनं वागते. मला वाटतं, त्यांनी तिला धडा शिकवला आहे.'

या त्यांच्या पुनर्मिलनानंतर अडीच महिन्यांनी, १९२६च्या एप्रिलमध्ये लॉरेन्सनं ठरवलं, व्हिला बेर्नार्दा सोडायचा. एवीतेवी करार संपत होता. शिवाय, बिऱ्हाड हलवल्यानं रावाग्ली आपसूक फ्रीडाच्या आयुष्यातून दूर होण्याची शक्यता लॉरेन्सला वाटत होती. फ्रीडा, तिच्या दोन्ही मुली यांच्यासह तो २० एप्रिलला प्रथम फ्लॉरेन्सला गेला. तिथून फ्रीडाच्या मुली इंग्लंडला परतल्या. फ्लॉरेन्सला आर्थर विल्किन्स या लाल दाढीवाल्या समाजवाद्याशी त्याचा परिचय झाला. त्यानं लॉरेन्सला तुस्कानमधील Tuscan व्हिला मिरेंदाची जागा सुचवली. तो आणि त्याची बायको त्या व्हिलामध्ये राहात होती.

व्हिला फ्लॉरेन्सपासून सातेक मैलावर होता. व्हिला जुनापुराणा होता, प्रशस्त होता. सभोवती मोकळं आवार. त्यात सुरू, सायप्रस, ऑलिव्ह यांची झाडं. थोडीफार शेतीवाडी. तिथं वीज नव्हती. पाण्याचे नळ नव्हते. फर्निचर फारसं नव्हतं. कोळशाच्या शेगडीवर स्वयंपाक करावा लागणार होता. तरीही व्हिला लॉरेन्सला पसंत पडला. व्हिलाच्या सर्वात वरच्या मजल्यावरील अर्धा भाग– सहा खोल्या– त्यानं घेतल्या. भाडं वर्षाला तीन हजार लिरा, म्हणजे पंचवीस पौंड. ६ मेला लॉरेन्स तिथं राहायला गेले. 'जागा झकास आहे– आर्नो दरीचं विहंगम दृश्य दिसतं. अतिशय देखणं गाव, गाव जसं असावं तसं.' वर्षाच्या करारावर त्यानं जागा घेतली पण दोन वर्ष ते तिथं राहिले. एवढ्या दूर येऊनही रावाग्लीबद्दलचं फ्रीडाचं आकर्षण ओसरलं नसल्याची त्याची खातरजमा झाली.

लॉरेन्साचं राहाणीमान काटकसरीचं. वर्षाला जेमतेम तीनशे पौंडात ते भागवत. घरातलं कामकाज अर्थात्च लॉरेन्स करीत असे. वाचत असे पण लेखन बंद झालं होतं. 'द प्लुम्ड सर्पंट' पूर्ण करण्याची स्वत:वर सक्ती करून घेतल्यामुळंच आपण आजार ओढवून घेतला होता, मरणाचा दरवाजा ठोठावला होता अशी त्यानं स्वत:ची समजूत करून घेतली होती. शिवाय त्यावरील प्रतिकूल परीक्षणांनीही त्याला नाऊमेद केलं होतं. एका मित्राला त्यानं लिहिलं होतं : 'कुठल्याही प्रकारचं पुस्तक लिहायला माझं मन घेत नाही. कशाला हवीत आणखीन पुस्तकं? बरीच आहेत की, आणि त्यांनाही किती थोडी मागणी.' याच सुमारास मरे बरोबरचे त्याचे संबंध आणखीनच दुरावले गेले. याला निमित्त झालं असं : १९२६ च्या जानेवारीत मरेनं लॉरेन्सच्या 'रिफ्लेक्शन्स ऑन द डेथ ऑफ अ प्रॉक्यूपाईन' या निबंधावर त्याला झोंबेल असं मत व्यक्त केलं होतं.

पण त्यानंतर दोनतीन महिन्यांनी मात्र त्याचा 'ब्लेसेड आर द पॉवरफुल' हा निबंध 'अडेल्फी' मध्ये छापण्याची परवानगी मागितली. त्याचं मानधन मिळणार नसल्याचंही त्यानं कळवलं, लिहिलं, एका माणसानं दुसऱ्याला दिलेली ती भेट आहे असं समजूया. लॉरेन्सनं उलट टपाली कळवलं की त्याचं लिखाण मरेला फुकट देण्याची गोष्टच सोडा, पैसे दिले तरी ते देण्यास तो राजी नाही. एवढंच नव्हे तर 'अधम किडा' या शब्दात त्याची अवहेलना करून त्याल झटकून टाकला.

मे सरला. जून संपला. ग्रीष्माचा दाह लाही लाही करू लागला. तेवढ्यात फ्रीडाच्या आईच्या पंच्याहत्तरीच्या समारंभाला हजर राहाण्याचं आमंत्रण आलं. १३ जुलैला लॉरेन्स फ्रीडासह बादेन-बादेनला पोचला. फ्रीडाच्या आईचं वय, तिची गलितगात्र अवस्था, तरी जगण्याची अनिवार ओढ, त्यासाठी निसर्गोपचार केंद्रात जाऊन राहाणं– लॉरेन्सच्या नजरेनं हे टिपलं. आयुष्यावरची आपली पकड घट्ट करण्यासाठी चाललेली सासूबाईची धडपड आणि आपल्या आयुष्यावरची ढिली होत चाललेली आपली पकड ही जाणीव लॉरेन्सला खुपली. काहीशा कडवटपणानं त्यानं लिहिलं : 'दुसरा कुणी मेला तर त्यांना त्याचं काही वाटत नाही. मला कल्पना आहे, माझी सासू मनातल्या मनात म्हणत असेल, ४३ व्या वर्षी

मी मेलो तरी बेहत्तर, तिनं अठ्याहत्तरी गाठावी.'

जुलै अखेरीस लॉरेन्स इंग्लंडला पोचले, तिथं दोन महिने राहिले. लॉरेन्सची ही अखेरची इंग्लंड वारी तशी धावपळीची, फारशी उत्साहवर्धक नसलेली. बाळपणीचा परिसर, औद्योगिकीकरणानं त्याची लावलेली विल्हेवाट त्यानं पाहिली. बहिणींना, फ्रीडाच्या मुलींना भेटला आणि ऑक्टोबरच्या प्रारंभी लॉरेन्स व्हिला मिरेंदाला परतला. त्यानं मार्टिन सेकरला लिहिलं काही फुटकळ लिखाण करण्यावाचून अन्य काही करायचा त्याचा विचार नाही.

१८ ऑक्टोबरला त्यानं फ्रीडाची थोरली बहीण एल्स हिलाही कळवलं आणखीन एखादी कादंबरी त्याच्या हातून लिहून होणं दुरापास्त आहे. तथापि महिन्याभरात त्यानं 'लेडीज चॅटर्लीज लव्हर'चा पहिला खर्डा लिहून पूर्ण केला. त्यानंतरच्या दीडेक वर्षाच्या कालावधीत त्यानं आणखीन दोन खर्डे लिहिले. त्यातील पहिला खर्डा 'द फर्स्ट लेडी चॅटर्ली' या नावाने १९४४ मध्ये प्रसिद्ध झाला.

फ्रीडानं त्याला प्रास्ताविक लिहिलं होतं. हा खर्डा तिला सर्वात आवडलेला होता. यात अशिष्ट शब्दांचा वापर इतर दोन खर्ड्यांच्या तुलनेत माफक होता. परंतु शरीरसंबंधाच्या वर्णनाची भाषा मात्र कधी नव्हे एवढी धीट बनली होती. यातील पार्किन हा गेमकिपर 'माझ्या धनीणीचा झवाड्या' असं स्वत:ला म्हणवून घेतो आणि 'मर्दानी झवण्या'ला दाद द्यावी यास्तव कॉन्स्टन्स चॅटर्लीला निमंत्रित करतो. कथानक तसं साधंसरळ, वाकवळणं नसलेलं. संसारात सुखीसमाधानी नसलेल्या उच्च वर्गीय तरुण स्त्रीची ही कहाणी. ऐसपैस वाड्यात अपंग नवऱ्याच्या सहवासात ती एकाकी जीवन कंठत असते. तिच्या इस्टेटीवर काम करणाऱ्याच्या पुरुषाचं तिला आकर्षण वाटू लागतं. यांचा देहसंग घडून येतो. यावेळी,

'...... For the First time in her life, passion came to life in her. Suddenly in the deeps of her body wonderful rippling thrills broke out where before there had been nothingness; and rousing strange, like peals of bells ringing from themselves in her body, more and more rapturously, the new clamour filled her up, and she heard and did not hear her own short wild cries as the rolling of the magnificent thrills grew more and more tremendous, then suddenly, started to ebb away in a richness like the after humming of great bells.

And then she lay lapped in a new womb, a new throbbing of life all around her....'

रात्रौ तिचा नवरा तिला रासीन वाचून दाखवतो. पण तिचं लक्ष त्याच्या वाचनाकडे नसतं. समागमाचा अनुभव तिच्या मनात रुंजी घालत असतो. तिला जाणवतं, तिच्या सर्वांगात सुख ओतप्रोत भरलं आहे. शब्दात सांगता न येण्याजोगं सुख वाटतं, त्या पुरुषाचं रक्त तुफान वाऱ्यागत तिच्या नसानसातून शिरलं आहे; तिचं अवघं व्यक्तिमत्व बदलून टाकत आहे.

वसंतात नव्यानं पालवी फुटणाऱ्या वृक्षागत तिचं आयुष्य तरारून फुलू लागलं आहे. ती ठरवते, त्यांच्याबरोबरचे संबंध तुटू देता कामा नयेत. खऱ्याखुऱ्या जीवनाशी तिची सांगड घालून दिली होती ती त्यानं, आणि खरंखुरं, नैसर्गिक आयुष्य जगण्याची तिची इच्छा होती.

डिसेंबरमध्ये 'लेडी चॅटर्लींच्या दुसऱ्या खर्ड्यास लॉरेन्सनं सुरुवात केली. लेखन चालू असताना त्यानं रॉल्फ गार्डीनरला पत्र लिहून आपल्या जन्मग्रामाचे गोडवे गायले. इंग्लंडमधील आपल्या या शेतकरी शिष्याला शिफारस केली की त्यानं ईस्टरवूडला जावं, वॉकर स्ट्रीटवरील तीन क्रमांकाच्या इमारतीसमोर उभं राहून तिच्याकडे बघत राहावं (ते दृश्य त्याच्या मन:पटलावर एवढं ठसठशीतपणे ठसलेलं आहे तेवढा जगातील अन्य कुठल्याही स्थळाने ठसा उमटवलेला नाही) त्यानंतर त्यानं गावाबाहेर पडावं, शेतामधून, वनराईतून हिंडावं, छोट्या हॅग्ज फार्मवर दृष्टिक्षेप टाकावा ( 'मिरीयमचं फार्म– जिथं लिहावं म्हणून मला प्रथम प्रोत्साहन मिळालं' ) आणि टेकडीवरून विहंगम निसर्ग डोळा भरून पाहावा : 'माझ्या काळजाचा तुकडा असलेला तो प्रदेश.' 'केव्हातरी एक दिवस तुझ्यासंगे मी तिथं जाईन' असं आश्वासनही त्यानं दिलं, पण आपल्या आश्वासनाची पूर्ती आपण करू शकणार नाही याची जाणीव त्याला होती. पण कादंबरी लेखनाच्या निमित्ताने (कादंबरीचा परिसर डर्बीशायरमधील खाणीचा होता) जाग्या झालेल्या बाळपण तरुणपणच्या स्मृतींनी त्याला थोड्याफार प्रमाणात भावविवश केलं होतं.

कादंबरीलेखनाच्या जोडीनं तो चित्रंही रंगवत होता. 'एक भलं मोठं चित्र मी रंगवत आहे... या नवीन चित्राला बोकॅशिओच्या चित्राचा आधार आहे : नग्नावस्थेत झोपलेला माळी जोगिणींच्या दृष्टीला पडतो : लिंग आणि बाकीचंही एकूण गंमतच' एका पत्रात त्यानं लिहिलं होतं की त्याच्या प्रत्येक चित्रात कुठंतरी एक लिंग तो दाखवतो आणि लोकांच्या बुरसट सामाजिक नीतिमत्तेला धक्का बसणार नाही असं एकही चित्र तो रंगवत नाही. लिंग हे एक परम पवित्र प्रतीक आहे या नि:संदिग्ध श्रद्धेपोटी तो हे करतो. लिंग हे प्रतीक आहे गहनगूढ जीवनाचं, जे आपण नाकारलं होतं, अद्यापही नाकारत आहोत. स्त्रियांना त्यात 'सेक्स' दिसतं आणि सर्वांगी शहारत ते त्या नाकारतात. अब्रह्मण्यम् ! शांतम् पापम् ! प्रत्येकानं विश्वास बाळगायला हवा : लिंग आणि त्यामागील गूढ यांच्यासंगे सौंदर्य फुलतं.

त्याच्या नव्या कादंबरीतही लिंग या शब्दानं शिरकाव केला. कॉन्स्टन्स चॅटर्लीला मर्दानी संभोग म्हणजे काय याची प्रचीती आणून दिल्यानंतर गेमकिपर पार्किन तिला सांगतो :

" I'm not ashamed of what I've got between my legs." He meant his penis. She thought of the naked man, the passion and the mystery of him : the mystery of the penis ! And she knew, as every woman knows, that the penis is the column of the blood, the living fountain of fullness in life.

दुसरा खर्डा फेब्रुवारी १९२७ मध्ये पूर्ण झाला. ज्या धिटाईनं स्त्रीपुरुषामधल्या लैंगिक संबंधाचं त्यानं चित्रण केलं होतं त्याबाबत लोकांच्या प्रतिक्रिया काय होतील हे मागील

अनुभवावरून तो जाणून होता. १२ एप्रिलला मिस पीर्नला (Pearn) पाठवलेल्या पत्रात त्यानं लिहिलं होतं : 'लेडी चॅटर्लीज लव्हर' बद्दल तो संभ्रमात आहे. ही साहित्यकृती औचित्याला मूठमाती देऊन लिहिली आहे अशी जग तिची संभावना करेल. पण ती तशी नाही आहे. लैंगिक संबंध लज्जास्पद वाटण्याऐवजी ते निर्दोष आहेत, अमोलिक आहे हे जनमानसात ठसवण्याचा तो सातत्यानं प्रयत्न करीत आहे. आणि या कादंबरीत त्यानं बराच पुढचा पल्ला गाठला आहे. 'To me, it is beautiful and tender and frail as the naked self.'

हा खर्डा 'जॉन थॉमस अँड लेडी जेन' या नावानं १९७२ मध्ये प्रसिद्ध झाला. 'जॉन थॉमस' आणि 'लेडी जेन' हे शब्द ग्राम्य बोलीत अनुक्रमे पुरुष व स्त्री यांच्या जननेंद्रियासाठी वापरण्याचा प्रघात आहे.

प्रत्येक कादंबरी तीनदा लिहून काढण्याची लॉरेन्सची सवय. आधीचा खर्डा समोर ठेवून त्यात फेरफार, परिष्करण करीत तो बसत नसे. 'पहिला खर्डा पूर्ण केल्यानंतर मी तो बाजूला ठेवतो आणि दुसरा लिहितो. नंतर मी दुसरा बाजूला ठेवतो आणि तिसरा लिहितो.' 'लेडी चॅटर्ली'ही त्यानं तिसऱ्यांदा लिहायला घेतली. ६ जानेवारी १९२८ला डोरोथी ब्रेट्टला त्यानं कळवलं : तिसऱ्यांदा मी माझ्या कादंबरीचं पुनर्लेखन करीत आहे. शेवटचं प्रकरण वगळता मी ती पूर्ण केली आहे. मी तिचं नाव 'टेंडरनेस' ठेवण्याच्या विचारात आहे आणि ती इथं खाजगीरित्या प्रकाशित करण्याचा माझा मानस आहे. प्रतीला दहा डॉलर. नशिबानं हात दिला तर हजारभर पौंड मी कमवीन आणि त्यायोगे आम्हाला रांचला येणं सुलभ होईल. गेल्या वर्षाप्रमाणं दैव आणि देव यांनी यावर्षी साथ दिली, तत्पूर्वी ते सदासर्वकाळ विरोधात होते, एखाद्यानं टगं बनायला हवं, काही माणसं टगी असतात, त्यांच्याप्रमाणं.

या खर्ड्यात गेमकिपरचं नाव बदललं, मेलर्स ठेवलं. आधीच्या खर्ड्यांत तो रांगडा शेतमजूर होता, फारसा शिकला– सवरलेला नव्हता. आता तो लष्करी सेवेतून बाहेर पडलेला सैनिक होता, सुशिक्षित होता. तिन्हीत्रिकाळ 'सेक्स'वर उपदेशामृत पाजणं ही त्याची आदत. गेमकिपरच्या आधीचा लेडी चॅटर्लीचा परपुरुषाशी आलेला शरीरसंबंध दाखवण्याच्या निमित्तानं मिशेलिस 'Michaelis' हे पात्र नव्यानं अवतीर्ण झालं. (भर पावसात गेमकीपर आणि लेडी चॅटर्ली याचं नागड्यानं धावणं एकमेकांचे गुह्य भाग रानटी फुलांनी सुशोभित करणं यांच्या बरोबरीनं) वाचकाच्या कामवासना उद्दिपित करण्याइतपत कथानकामध्ये एकूण सात ठिकाणी संभोगाचं ठसठशीत चित्रण करण्यात आलं होतं. शिवाय गुदमैथून सूचकपणे चित्रित केलं गेलं होतं. गलिच्छ, अशिष्ट समजल्या जाणाऱ्या शब्दांचा सर्रास वापर करण्यात आला होता. योनी शब्दाचा वापरही बिनदिक्कतपणे त्यानं प्रथमत:च केला होता

कादंबरीच्या हस्तलिखिताची एक प्रत ५ मार्चला लॉरेन्सनं पॉलिंजर त्याचा 'लिटररी एजंट'कडे पोस्टानं पाठवून दिली. त्याच दिवशी मार्टिन सेकरला पत्र लिहून तसं कळवलं. कादंबरीचं शीर्षक 'जॉन थॉमस अँड लेडी जेन' असं बदललं असल्याचंही सांगितलं. आशा



अनुक्रमणिका

करतो तुला ते आवडेल, कारण आधीच्या पेक्षा ते अधिक समर्पक आहे. या पुस्तकावर तुझ्या कोणत्या प्रतिक्रिया होतील याची कल्पना मला करता येणार नाही, कदाचित तुला ती तिरस्करणीय वाटेल. अल्डस हक्स्ले आणि मारिया यांना ती खूप आवडली– असं ते म्हणालेत– (काहीजण) तिच्यावर भयंकर संतापलेत– नैतिक संताप! त्यानंतर कादंबरीमध्ये काटछाट करण्याच्या संदर्भात सूचना केल्या, सांगितलं, की त्यानं बरेच फेरफार केले आहेत. पण मजकूर बऱ्याच वेळा नजरेखालून गेल्यामुळं तूर्त त्याची नजर मेलेली आहे. परिणामी आणखीन गाळसाळ काय करावी हे त्याला कळेनासं झालं आहे. यास्तव उचित काय ठरेल याचा निर्णय सेकरनंच घ्यावा. परंतु 'धसका घेऊन लगोलग संपूर्ण भाग काढून टाकण्याची घाई त्यानं करू नये.' बऱ्याच प्रमाणात फेरफार करण्यापूर्वी त्यानं त्यावर सांगोपांग विचार करावा. त्यावर निळ्या पेन्सिलीनं खुणा करून ती पानं त्याच्याकडे पाठवून द्यावीत. शक्य होईल तेवढं संस्करण तो करील. इंग्लंड अमेरिकेतील वाचकांसाठी प्रकाशनयोग्य सोवळी आवृत्ती करण्याची त्याची तयारी होती.

ही कादंबरी आहे त्या स्वरूपात प्रकाशित करण्यास आपले प्रकाशक धजावणार नाहीत याची लॉरेन्सला पूर्ण जाणीव होती. ती खाजगीरित्या स्वतःच छापावी या निर्णयाप्रत तो आधीच पोचला होता. छपाईचा खर्च देण्याइतपत पैसे त्याच्या हाती होते आणि त्याच्या लेखनाविषयी आस्था असलेल्यांना प्रती विकून ९० टक्के लाभांश मिळवण्याची आशा तो बाळगून होता. फ्लॉरेन्समधील पुस्तक विक्रेता आणि प्रकाशक पिनो ओरीओली त्याच्या परिचयाचा होता. आपला बेत लॉरेन्सनं त्याच्या कानावर घातला. त्यानं पुस्तक छापून देण्याची तयारी दर्शवली. कोर्टाच्या बडग्याची फिकीर त्याला नव्हती. ८ मार्चला त्यानं जुलिएट हक्स्लेला कळवलं : 'उद्या फ्लॉरेन्सला मी माझी कादंबरी घेऊन जात आहे– जर का पाऊस पडला नाही तर.'

John Thomas and Lady Jane
Were caught lurking in the rain
Penalty ! they were torn in twain !

कादंबरीच्या मुद्रणाला सुरुवात झाली. 'मुद्रकाला इंग्रजीचा एकही शब्द येत नाही– कुणालाही एकसुद्धा शब्द अवगत नाही. इथं अज्ञानात आनंद आहे. इथे सर्व दृष्टिआड आहे!' मजकूर तपासून होईल तसं छपाई सुरू झाली. लॉरेन्सनं इटालियन 'हॅंडमेड' कागद निवडला. पुस्तक सुबक होईल इकडे त्यानं जातीनं लक्ष पुरवलं. मुखपृष्ठावर फिनिक्सचं चित्र. हजारभराची आवृत्ती. प्रतीची किंमत दहा डॉलर. आगाऊ रक्कम देऊन प्रत विकत घेणाऱ्यांची त्यानं यादी बनवली. पुस्तकाला गिऱ्हाइकं मिळवून देण्याची आपल्या स्नेह्यांना विनंती केली. एनिड हिल्टन, कोटेलिआन्स्की, रिचर्ड ॲल्डिंग्टन यांच्याकडे प्रती पोचतील अशी व्यवस्था करण्यात आली. इंग्लंडमधील ग्राहकांना गुपचूप प्रती पोचण्याची जोखीम या मित्रांनी पत्करली. इंग्लंडपेक्षा अमेरिकेत प्रती जास्त खपतील या भरवशानं त्या खंडातही विक्रीची



अनुक्रमणिका

व्यवस्था केली. विक्रीची बाजू मुरब्बी 'बिझनेसमनागत लॉरेन्सनं सांभाळली. ऑर्डर लिफलेट्स तयार केल्या.

आपला हा चोरीचा मामला उघडकीस येईल ही भीती त्याला होती त्याचबरोबर कादंबरीचं स्वागत कसं होईल, त्यातील वर्ण्यविषयाचा विपर्यास तर केला जाणार नाही ना ही धाकधूकही त्याला वाटत होती. कादंबरीवर कोणते आक्षेप घेतले जाण्याची शक्यता त्याला वाटत होती त्यांचं निराकरण तो आवर्जून मित्रांच्या पत्रांमधून करीत होता.

हॅरिएट मन्रोला त्यानं लिहिलं (१५ मार्च १९२८) : It is a nice and tender phallic novel– not sex novel in the ordinary sense of the word.... It is quite sincere, and.... I sincerely believe in restoring.... the phallic conscionsness, into our lives : because it is the source of all real beauty, and all real gentleness. And those are the two things, tenderness and beauty, which will save us from horrors. And in my novel I work for them directly, and direct from the phallic consciousness, which you understand, is not the cerebral sex- consciousness, but something really deeper, and the root of poetry, lived or sung.'

जुलैमध्ये कादंबरी प्रसिद्ध झाली ती 'लेडी चॅटर्लीज लव्हर' या नावानं. प्रतींचा बऱ्यापैकी खप झाला. वर्षअखेर त्याला १,०२४ पौंडांचा निव्वळ नफा झाला. पण एव्हाना पुस्तकातील मजकूर इंग्लंड अमेरिकेत ठाऊक झाला होता. पुस्तकानं खळबळ माजवली होती. ते आपल्या देशात आणण्यास अमेरिकेनं बंदी घातली. १९२९ च्या फेब्रुवारीमध्ये इंग्लंडमधील कस्टम आणि एक्साइज विभागानं 'लेडी चॅटर्ली'च्या प्रती जप्त करण्याचा सपाटा लावला. गृहखात्याचा सचिव विल्यम जॉयन्सन - हिक्स यानं 'कॉमन्स'मध्ये त्या कादंबरीवर टीकेची झोड उठवली. जनमतही बिथरलेलं होतं. लॉरेन्सला हे नवीन नव्हतं.

'द रेनबो'च्या वेळी उडालेली धुळवड तो विसरलेला नव्हता. त्यावेळी अश्लील साहित्याचा जनक हे बिरुद त्याला लाभलेलं होतं. आता तो 'पोर्नोग्राफर' कामोद्दीपक लेखन करणारा म्हणून ख्याती पावला. त्याला अर्थातच हे अमान्य होतं. २८ डिसेंबर १९२८ रोजा ओट्टोलिन मोरेलला पाठवलेल्या पत्रात त्यानं स्वतःची बाजू मांडताना लिहिलं होतं की अष्टौप्रहर 'सेक्स'चा विचार करणं, त्यात रममाण होणं याचा पुरस्कार तो करतो अशी समजूत तिनं कृपया करून घेऊ नये. आवडनिवड बाजूला सारून वा गौण लेखून तिन्ही त्रिकाळ घेतल्या जाणाऱ्या संभोगाची त्याला भयंकर घृणा आहे.

'लेडी चॅटर्लीज' त्यानं लिहिली ती शारीरिक पातळीवरील मूलभूत वास्तव व विवेक यांच्यात समन्वय साधणं आवश्यक आहे हे दाखवून देण्यासाठी. सर्वसामान्य माणसं सुशिक्षित माणसांपेक्षा सळसळत्या जीवनाची झळाळी बराच काळ राखू शकतात याची जी अनेक कारणं आहेत त्यातील एक कारण 'झंव' आदी शिष्टसंमत नसलेले शब्द ते न

शहारता उच्चारू शकतात. आपण काही विशेष करीत आहोत ही भावनाही त्यांच्या मनात नसते. तो सहजोद्गार असतो. तथाकथित सोवळ्या सुसंस्कृतांवर त्याला प्रहार करवयाचा आहे. स्वैर संभोगाचा तो पुरस्कर्ता आहे असं कुणी समजत असेल तर त्याचं तोंड परमेश्वरानं बंद करावं.

तरीदेखील लॉरेन्सवर टीकेचं मोहोळ उठलं. कादंबरीवर बंदी घालण्यात आली. ती बंदी अमेरिकेत १९५९ मध्ये व इंग्लंडमध्ये १९६० मध्ये उठवण्यात आली. ती एक कलाकृती आहे, ती अश्लील नाही असा अभूतपूर्व निवाडा न्यायालयानं दिला. दरम्यानच्या काळात तिच्यातील आक्षेपार्ह मजकूर काढून ती प्रकाशित करण्यात आली होती. शिवाय मूळ स्वरूपातही ती उपलब्ध होती, अर्थात छुप्या मार्गानं. आर्थिकदृष्टया ती फलदायी ठरली. पण हा लाभ फ्रीडाला लाभला.

'लेडी चॅटर्लीज लव्हर' ही साहित्यनिर्मिती होती एका संतप्त आणि कडवट बनलेल्या माणसाची. तद्वतच .सुरतसुख भोगू न शकणाऱ्या एका रुग्णाची. या माणसाच्या लैंगिक जीवनाचं प्रतिबिंब लखखपणे या साहित्यकृतीमध्ये उमटलेले आहे. ही कादंबरी म्हणजे बव्हंशी त्याचं 'सेक्शुअल' आत्मचरित्र आहे असं म्हटलं तर ते वावगं ठरू नये.

कादंबरीतील कथानकाचा काळ आहे विसाव्या शतकाच्या दुसऱ्या दशकातला.

हिल्डा आणि कॉन्स्टन्स ऊर्फ कॉन्नी या सर माल्कम रीड (Connie Reid) यांच्या मुली. हिल्डा कॉन्स्टन्सपेक्षा दोन वर्षांनी मोठी. दोघीही बहिणी अत्याधुनिक विचारसरणीच्या, खुल्या वृत्तीनं जीवन जगणाऱ्या. संगीत, कला, तत्त्वज्ञान आदी विषयांबरोबरच पुरुषांच्या सहवासातही त्यांना रस. वयाच्या पंधराव्या वर्षी ड्रेस्डेनला आल्यापासून त्यांचं जीवन तसं मुक्त. अठराव्या वर्षापासून त्यांची प्रेमप्रकरणं; त्यातून लैंगिक सुख. त्यांच्या पर्यायानं एकूण स्त्रीजातीच्या, कामजीवनाबाबत लॉरेन्स लिहितो : A woman could take a man without really giving herself away. Certainly she could take him without giving herself into his power. Rather she could use this sex thing to have power over him. for she only had to hold herself back in sexual intercourse, and let him finish and express himself without herself coming to the crisis : and then she could prolong the conncetion and achieve her orgasm and her crisis while he was merely a tool.' हा अनुभव लॉरेन्सच्या गाठी मारला होता तो. फ्रीडानं.

महायुद्ध सुरू होतं. दोघीही बहिणी मायदेशी परततात. कॉन्नी युद्धाच्या मिषानं थोडीफार समाजसेवा करीत असते. क्लिफर्ड हा सर जॉफ्री चॅटर्लीचा मुलगाही कोळशाच्या खाणीविषयीचं तांत्रिक शिक्षण अर्धवट टाकून बॉनहून इंग्लंडला परतलेला असतो. तोही फर्स्ट लेफ्टनंट या हुद्यावर सैन्यात दाखल होतो. या काळात त्याचा कॉन्नीशी परिचय होतो. पुढं तो युद्धभूमीवर जातो. १९१७ मध्ये महिन्याच्या रजेवर परत येतो. आधल्या वर्षी त्याचा





अनुक्रमणिका

भाऊ हर्बर्ट युद्धात मारला गेलेला असतो. सर जॉफ्रेला वाटतं क्लिफर्डनं विवाह करावा आणि आपल्या वंशाला वारस द्यावा. वडिलांच्या आग्रहाला मान देऊन क्लिफर्ड लग्नास तयार होतो. गुलाबी कांतीच्या, तलम, मुलायम केसाच्या कॉन्नीशी तो विवाहबद्ध होतो. नवविवाहित महिनाभर हनीमून साजरा करतात. लग्न होईस्तोवर क्लिफर्डनं समागमाचा अनुभव घेतलेला नसतो. वैवाहिक जीवनात समागमाला त्याच्या लेखी फारसं महेत्त्व नसतं. तरीदेखील दोघांमध्ये जवळीक निर्माण होते.

हनीमूननंतर क्लिफर्ड रणभूमीवर जातो. सहा महिन्यांनी जायबंदी होऊन माघारी येतो. 'कॉन्स्टन्स,(कॉन्नी) त्याची बायको, त्यावेळी तेवीस वर्षाची होती, आणि तो होता एकोणतीस वर्षाचा.' जीवनावरची त्याची पकड कौतुकास्पद होती. तो मरत नाही. अथक दोन वर्षाच्या वैद्यकीय उपचारानंतर तो बरा होतो पण कमरेखालचा भाग मात्र लुळाच राहातो. दरम्यान त्याच्या वडिलांच्या निधनानंतर तो बॅरोनेट बनतो, सर क्लिफर्ड आणि कॉन्स्टन्स, लेडी चॅटर्ली.

१९२० च्या शरदात सर क्लिफर्ड व लेडी चॅटर्ली रॅग्बी हॉलवर– त्यांच्या वडिलोपार्जित वाड्यावर राहायला येतात. आडवाटेला एकाकी असलेल्या या वास्तूत संसार थाटतात, वैवाहिक जीवनाला नव्यानं प्रारंभ करतात. आपल्याल मूल होणं शक्य नाही याची त्याला पूर्ण खात्री असते. चॅटर्लीचं नाव त्याला शक्य होईस्तोवर जितंजागतं ठेवण्यासाठी धुरकट मिडलँडमधील आपल्या या घरी तो आलेला होता.

कॉन्नी नवऱ्याची शुश्रूषा करते आणि कंटाळवाणं पुस्तक तो मोठ्यानं वाचून दाखवतो. तेव्हा निमूट ऐकत राहाते. सर क्लिफर्ड आपलं लक्ष लेखनावर केंद्रित करतो. या कामी तीही तिच्याकडून होईल तेवढी मदत करते. जणू काही त्याच्या कथांमधून तिचं अवघं व्यक्तिमत्व– तिचा आत्मा, देह आणि कामजीवन– प्रतिबिंबित व्हावं ही इच्छा ती बाळगून असते. मोठ्या इस्टेटीचा तो मालक, पैसे मिळवण्याची गरज त्याला नसते पण आपल्याला मान्यता मिळावी यासाठी तो हपापलेला असतो.

'प्रथम दर्जाचा आधुनिक लेखक म्हणून मान्यता मिळावी' ही त्याची इच्छा कॉन्नीला थोडीफार दुग्ध्यात टाकते, तरी त्याच्या या प्रकल्पात आपलाही सहभाग आहे याचा अभिमान तिला असतो. ती स्वत:शी म्हणजे : 'क्लिफर्ड आणि मी, दोघं मिळून आम्ही लिखाणामधून वर्षाकाठी बाराशे मिळवतो.... विरळ हवेतून ते पिळून काढतो' (अशी भावना फ्रीडाचीही होती.) त्याच्या कथा अत्याधुनिक मासिकांतून प्रसिद्ध होतात आणि त्यांची स्तुती होते वा त्यांच्यावर टीका होते. टीकेनं क्लिफर्डला यातना होतात. सुऱ्यांनी त्याला टोचल्यागत. जणू काही त्याचं अवघं व्यक्तिमत्त्व त्याच्या कथांमध्ये होतं !

कालचक्र पुढं सरकतं. दोन वर्ष उलटली जातात. कॉन्नी आणि क्लिफर्ड त्यांच्या कल्पनांमध्ये, विचारांमध्ये आणि त्याच्या पुस्तकांमध्ये जगत असतात. आपल्या नवऱ्याच्या कथांवर स्तुतिसुमनं उधळणाऱ्या पाहुण्याचं ती स्वागत करते, त्यांची सरबराई करते. पण

आपल्यात अस्वस्थता वाढत आहे याचं भान तिला विसरता येत नाही. बेचैनी, तगमग क्लिफर्डला सोडून द्यावं. घरापासून, प्रत्येकापासून दूर व्हावं. वनराईत धाव घ्यावी. तिथं आसरा लाभेल. तिला अस्पष्टसं जाणवतं की ती शतश: विदीर्ण होत चालली आहे. भोवतालच्या जगाशी तिचा संबंध उरलेला नाही. फक्त क्लिफर्ड आणि त्याची पुस्तकं. दगडावर स्वत:चं डोकं आपटून घेण्यागत हे जिणं !

आणि शिशिरामधल्या एका दिवशी मिशिलिसचं (Michaelis) चॅटर्लीच्या वाड्यात आगमन होतं. या तरुण आयरिश नाटककारानं अमेरिकेत आपल्या नाटकावर बरीच कमाई केलेली असते– पन्नास हजार डॉलर्स. त्याच्याशी तिचं 'अफेअर' जुळून येतं. क्लिफर्डच्या वाड्यात त्याच्या परोक्ष त्यांचा समागम घडून येतो. पण ही सुरतक्रीडा रंगत नाही. कारण तिच्या शारीरिक वासनांची तृप्ती करण्यास तो उणा पडतो. अल्पावधीतच त्याचं वीर्यस्खलन झाल्यानं रसभंग होतो. आणि नंतर आक्रसून तिच्या वक्षस्थळावरील त्याचं पडून राहाणं. आणि ती असमाधानी,

'But then she soon learnt to hold him, to keep him there inside her when his crisis was over. And there he was generous and curiously potent; he stayed firm inside her, given to her, while she was active.... wildly, passionately active, caming to her own crisis....'

मिशिलिस तीन दिवस चॅटर्लीचा पाहुणचार घेऊन निघून जातो. त्यानंतर त्याची कॉन्नीला पत्रं येतात. क्वचित लंडनमध्ये त्यांच्या भेटीगाठी होतात. त्यासमयी शारीरिक सुखाचं आदानप्रदान होतं. कॉन्नीचे दिवस तसे समाधानाचे असतात. तिची प्रसन्नवृत्ती रॅग्बीचं वातावरणही प्रसन्न करते की जेणेकरून क्लिफर्डच्या हातून उत्कृष्ट लिखाण होतं. पण तिच्या प्रसन्नवृत्तीमागील कारण मात्र त्याला अज्ञातच राहातं. त्याला प्रसिद्धी मिळते. (कॉन्नीच्या भाषेत 'Bitch - goddess of success') धनप्राप्तीही होते, बऱ्याच ठिकाणी त्याचे फोटो छापून येतात, त्याचे पोर्ट्रेट्स गॅलरीत झळकतात, आधुनिकांमधला अत्याधुनिक म्हणून त्याची वाखाणणी होते.

एक दिवस क्लिफर्ड कॉन्नीला सुचवतो की परपुरुषापासून तिनं गर्भधारणा करून घ्यावी. इस्टेटीला वारस मिळेल, वाड्यात लहान मूल दुडुदुडू धावेल. मुलाचं संगोपन वाड्यात होईल, तो आपला होईल आणि या वास्तूचाही. जर्मनीमध्ये ती होती तेव्हा तिचा प्रियकर होताच. असल्या गोष्टी कालांतरानं विस्मृतीतही जातात. क्षणिक लैंगिक संबंधाचा बाऊ का करायचा? माणसं या गोष्टीला अवास्तव महत्त्व देतात. पक्षी समागम करतात, अलग होतात. महत्वाची असते ती दीर्घकालीन मैत्री, एखाददुसऱ्या वेळेला केलेली शय्यासोबत नव्हे.

त्याच्या या बोलण्यानं ती विस्मयचकित होते. तरीही विचारते की कोणत्या पुरुषापासून तिला मूल व्हावं याबाबत त्याचा आग्रह नाही? त्यावर तो उत्तरतो की तिच्या चोखंदळ निवडीबाबत त्याची खात्री आहे. चुकीच्या माणसानं तिला स्पर्श करता कामा नये.



अनुक्रमणिका

त्याच्या चुकीच्या माणसाची व्याख्या मिशिलिसला पूर्णपणे लागू होते याची कल्पना तिला असते. त्याचबरोबर तिला आतून कुठूनतरी जाणवतं की मिशिलस बरोबरचं 'अफेअर' निरर्थक आहे, कधीतरी त्याचा शेवट कडू होणार आहे. आणि ही जाणीव तिला उदास करते. अवघं आयुष्य अर्थशून्य भासू लागतं.

आणि ग्रीष्मात मिशिलीस चॅटर्लीच्या वाड्यात प्रवेश करतो. या भेटीत मिशिलस कॉन्नीला सुचवतो की तिनं क्लिफर्डशी घटस्फोट घ्यावा व त्याच्याशी लग्न करावं. ती सांगते की ती क्लिफर्डला सोडू शकत नाही. तो विचारतो : "का नाही? पण का नाही? सहा महिन्यांनी त्याच्या लक्षातही रहाणार नाही की तू निघून गेली आहेस. तो वगळता अन्य कुणी अस्तित्वात आहे हे तो कधी विचारात घेतही नाही. मी जे पाहिलं आहे त्यावरून तू त्याच्या खिजगणतीतही नाहीस, तो स्वत:तच मग्न असतो."

त्याच्या या उद्गारातील सत्यता कॉन्नीला जाणवते पण विचार करायला हवा असं म्हणून तो विषय संपवते आणि रात्रौ तिच्या खोलीत येण्याचं त्याला आमंत्रण देते. त्या रात्री आधीच्या समागमाचीच पुनरावृत्ती होते. सुरू होण्याआधीच पुरुष गळून जातात याची पुन्हा तिला प्रचिती येते. तरीही त्याचं वीर्यस्खलन झाल्यानंतरही नित्याप्रमाणं स्वत:ची तृप्ती होईपर्यंत आपल्या देहावर ती त्याला घट्ट कवटाळून धरते.

तिच्या देहावरून दूर झाल्यानंतर कडवटपणानं तो तिला विचारतो की पुरुषाचं वीर्यस्खलन होतं त्याचवेळी स्त्रियांची कामतृप्ती होत नाही. ती होईपर्यंत त्यांना खेळ पुढं चालू ठेवावा लागतो. (स्वत:च्या जीवाला लागलेला घोर लॉरेन्सनं मिचिलीसच्या मुखावटे बदवला होता. समागमाचा अत्युच्च क्षण स्त्रीपुरुष एकाच वेळी गाठत नाहीत. फ्रीडा बरोबरचा स्वानुभव लक्षात घेऊन अशा प्रकारचे उद्गार त्यानं आपल्यापाशी काढल्याचं कॉम्पटन मेकेंझीनं नमूद केलेलं आहे) त्यावर (फ्रीडाप्रमाणंच) कॉन्नी अचंबित होते : स्वत:ची तृप्ती तिनं करून घ्यावी असं तिच्या प्रियकराला वाटू नये? आयुष्यात तिनं आजवर अनेक आघात सहन केले पण त्याच्या नाराज उद्गारानं तिला दिलेला धक्का जीवघेणा असतो. त्याच्या बद्दलच्या, किंबहुना अन्य कुठल्याही पुरुषाबद्दलच्या, तिच्या अवघ्या लैंगिक भावना त्या रात्री कोळपून जातात. जीवनातील अर्थशून्यता तिला चहू बाजूंनी वेढून टाकते.

पुढं त्या दोघांची भेट होते. स्वत:ची तब्येत डॉक्टरला दाखवण्यासाठी कॉन्नी हिल्डाबरोबर लंडनला आलेली असते. तिची खालावलेली प्रकृती पाहून त्याला धक्का बसतो. तो सांगतो की तिचं आयुष्य ती वाया का घालवते? त्याच्याबरोबर तिनं यावं ! आफ्रिकेला! सर क्लिफर्डला जाऊ दे खड्यात ! सोडून दे त्याला आणि आपल्याबरोबर बाहेर पड. त्यानं घटस्फोट देताक्षणीच आपण तिच्याशी लग्न करू. बाहेर पड आणि आयुष्य नव्यानं जग. रॅग्बी कुणाचाही जीव घेईल. अमंगल वास्तू ! कुणाचाही जीव घेईल ! तिला हवा आहे मोकळा सूर्यप्रकाश आणि सर्वजण जगतात तसं आयुष्य !

पण क्लिफर्डला सोडून जाण्यास ती ठाम नकार देते.

कॉन्नीची प्रकृती खालावल्यामुळं सर क्लिफर्डची सेवा शुश्रूषा करणं तिला आता जमणार

नाही म्हणून मिसेस बोल्टन या पन्नाशीकडे झुकलेल्या विधवेची नर्स म्हणून चॅटर्लींच्या वाड्यावर नेमणूक होते. आणि क्लिफर्डमध्ये परिवर्तन घडून येतं. लेखक म्हणून प्रसिद्ध मिळवण्याचा आजवरचा अट्टाहास, हव्यास याकडे तो पाठ फिरवतो व उद्योजक म्हणून कीर्ती व पैसा मिळवण्यावर लक्ष केंद्रित करतो, खाणीच्या उत्पादनात वाढ व्हावी यास्तव प्रयत्नशील होतो. ही किमया घडून आली मिसेस बोल्टननं त्याच्यावर टाकलेल्या प्रभावामुळं. तिनं त्याच्यामधला पुरुष जागवला, पुरुषाला साजेशी धडाडी निर्माण केली. ती त्याची अर्धीमुर्धी मिस्ट्रेस होती, अर्धीमुर्धी दाई होती. ही दुहेरी भूमिका ती समर्थपणे पेलते. नवऱ्याची देखभाल करण्याच्या जबाबदारीमधून सहाएक वर्षांनी कॉन्नीला मोकळीक मिळते.

आणि कॉन्नीला जाणवतं, दुसऱ्या जगात तिला नेऊन सोडण्यात आलं आहे, तिला जाणवतं, मोकळेपणानं ती श्वास घेऊ शकते. पण तरीही तिच्या मनात भीती असते. कितीतरी प्रकारे ती अद्याप क्लिफर्डशी जखडलेली आहे. असं असूनही ती मोकळेपणानं, मुक्तपणे श्वास घेऊ लागते, तिच्या आयुष्यात एका नव्या टप्प्याचा प्रारंभ व्हायचा असतो.

या टप्प्यावर तिला भेटतो ऑलिव्हर मेलर्स. ग्रीष्मातल्या पावसाच्या सरीगत तो येतो. त्याच्या संगतीत कोमल, हळुवार स्त्री पुरुष संबंधाचा साक्षात्कार तिला होतो. सर्वांगानं ती फुलून येते.

परपुरुषापासून कॉन्नीनं गर्भधारणा करवून घेऊन चॅटर्ली वंशाला वारस द्यावा याबाबतचं संभाषण झाल्यानंतर काही वेळानं मेलर्स कॉन्नीच्या नजरेसमोर येतो. का कुणास ठाऊक, तिला त्याची धास्ती वाटते. ध्यानीमनी नसताना एखादं संकट अचानक सामोरं ठाकावं तसा तिला तो भास भासतो. क्लिफर्डकडून त्याच्याविषयी तिला माहिती मिळते ती अशी :

नवीन गेमकिपर. मेलर्स. खाण कामगाराचा मुलगा. युद्ध सुरु होण्याआधी दोन वर्ष तो इथं रखवालदार होता. . . . लष्करात भरती होण्यापूर्वी. माझ्या वडीलांचं त्याच्याविषयी नेहमीच चांगलं मत होतं. तो माघारी परतला आणि लोहारकाम करू लागला. मी त्याला रखवालदार म्हणून पुन्हा बोलावून घेतलं. तो मिळाला यावर मी खरंच फार खूष आहे. इथं रखवाली करणारा, चांगला माणूस मिळणं महा मुष्किल. . . . याचं लग्न झालं होतं. पण त्याची बायको बऱ्याच पुरुषांबरोबर राहून सध्या स्टॅक्स गेट येथे एका खाणकामगाराबरोबर घरोबा करून आहे . . . हा माणूस तसा एकटाच आहे. त्याची आई त्याच्या मुलीला घेऊन गावात राहाते.

त्यानंतर ती त्याला पाहाते, ती कुळागारात जाते तेव्हा त्याची आंघोळ चालू असताना, त्याला पाठमोरा, अर्धनग्नावस्थेत पाहून ती माघारी वळते. त्याच्या कॉटेजमध्ये जाऊन बसते. गेमकिपर कपडे करून येतो आणि तिला पाहून चकित होतो. ती निरोप सांगते. नकळत सर्व काही जोखणाऱ्या त्याच्या निळ्याभोर डोळ्यांत पाहाते. आणि त्याच्या नजरेत जाणवतो जिव्हाळा आणि माया, खास करून स्त्री विषयाची.

एकमेकांचा निरोप घेतल्यानंतर तो स्वत:शी म्हणतो; "गोड आहे ती, अस्सल आहे ! तिला कल्पना आहे त्याहूनही ती गोड आहे."

त्याच्याविषयी तिला अतिशय आश्चर्य वाटत असतं; तो गेम किपरसारखा वाटत नाही, तसा कामगार वर्गातलाही नाही वाटत, स्थानिक लोकांसारखा तो काहीसा वाटत असला तरीही घरी पोचल्यावर क्लिफर्डला ती म्हणते देखील की गेमकिपर मेलर्स म्हणजे अजब व्यक्ती आहे. घरंदाज म्हणून सहज खपून जाईल.

त्या रात्री तिच्या बेडरुममध्ये गेली कित्येक वर्षं तिनं केली नव्हती ती गोष्ट ती करते : तिच्या अंगावरील सर्व वस्त्रं ती उतरवते, आणि मोठ्याल्या आरशात स्वत:चं नग्न रूप पाहाते. तिला ठाउक नसतं ती कशाकडे पाहात आहे आणि कशासाठी, तरीदेखील ती सर्वांगावर प्रकाशझोत टाकते. तिची चौकस नजर तिचा प्रत्येक अवयव निरखते. वयाच्या सत्ताविसाव्या वर्षीच आपला देह कुचकामी, निशुष्क झाला असल्याचं तिच्या ध्यानी येतं.

मिसेस बोल्टन कामाला राहिल्यापासून कॉन्नीला फारसं काम राहिलं नव्हतं. ती शेकोटीपाशी बसून राहायची, निश्चल, वाचत असल्याचा वा वीणकामात गढून गेली असल्याचा बहाणा करीत. मिसेस बोल्टननं सुचवलं की कुळागारामधून तिनं फेरफटका मारावा, गेमकिपरच्या कॉटेजमागे फुलून आलेले डॅफोडिल्स पाहावी. तेवढं सुंदर दृश्य तिनं कधी पाहिलेलं नसेल. त्यातली काही स्वत:च्या खोलीत तिला ठेवता येतील, रानटी डॅफोडिल्स नेहमी उत्साह वाढवणारी असतात.

कॉन्नीलाही या जगाला, सांगाड्यागत माणसांना विसरायचं असतं. "पुन्हा तुला जन्म घ्यायलाच हवा ! देहाच्या पुनरुज्जीवनावर माझा विश्वास आहे !, गव्हाचा एक दाणा भुईवर पडून नष्ट झाल्याशिवाय त्यापासून कणसं तरारून येतील कशी, "जेव्हा वसंत समयी फुलून येणारं क्रोकस उगवून येईल तेव्हा मी देखिल अवतीर्ण होईन आणि सूर्य पाहीन !" अशा अनंत उक्ती मार्चच्या वाऱ्यात कुळागाराकडे पावलं उचलत असता तिच्या मनात कुजबुजून जात असतात. वृक्षराजीतून चालताना ती उमेदीत येते, रंग तिच्या गालावर चढतो, आणि तिच्या डोळ्यांत निळाई प्रज्वलीत करतो. ती रमतगमत जाते. बहरलेल्या निसर्गामधून, दगडी कॉटेजमागील डॅफोडिल्स पाहाते. सर्व प्रकाशात पिवळी धमक होत असताना. फुलांचा मंद सुवासही तिच्या नाकात शिरतो. तिथं ती बसलेली निश्चल आणि एकाकी. तिच्या स्वत:च्या प्रारब्धाच्या प्रवाहात सापडल्यागत. दोरखंडानं आजवर तिला बांधून टाकण्यात आलेलं होतं, आता बंधन तुटलं होतं, ती मुक्त होती. तिच्या जीवनाचं तारू प्रवाहातून पुढं सरकत होतं.

भावी घटनांची चाहूल तिला लागली होती !

उसंत लाभेल तशी ती कुळागारात जात होती, हिंडत होती. अशाच एका भ्रमंतीत निवांत जागी तिला एक झोपडी आढळते. त्या झोपडीची दुसरी चावी हाती पडल्यानंतर ती क्लिफर्डला विचारते की तिला मूल झालेलं त्याला खरोखरीच आवडेल? तो उत्तरतो की त्यांच्या प्रेमात त्यानं बाधा येणार नसेल तर त्याची हरकत नाही.

आणि त्यानंतर काही दिवसातच तिचा मेलर्सशी देहसंग घडून येतो. स्त्रियांचा सहवास

कटाक्षानं टाळणारा, हेतुपुरस्सर एकांतवास पत्करणारा उद्धट मेलर्स हळूवार बनतो.

नित्याप्रमाणं कॉन्नी झोपडीत गेलेली असते. कुतुहलानं कोंबडीचं एक पिल्लू तळहातावर घेते. कौतुकानं त्या छोट्या जीवाकडे पाहात असते. गेमकिपरही तिच्या शेजारी उकिडवा बसून तिला डोळा भरून पहात असतो. अचानक तिच्या डोळ्यांतून अश्रू ओघळून तिच्या मनगटावर पडलेला त्याच्या जनरेला पडतो.

तो उठून उभा राहातो, दूर जातो. त्याच्या मांडधात जुनी आग जिभल्या चाटत पेटून उठते. तो तिला काबूत ठेवण्याची शिकस्त करतो. तिच्याकडे पाठ फिरवतो. तरीदेखील ती आग शमत नाही. पुन्हा तो तिला पाहायला वळतो, पाहातो. गुडघे टेकून तिचे दोन्ही हात ती सावकाश पुढे करीत होती, जेणेकरून पिल्लू पुन्हा आईकडे जाऊ शकेल. या तिच्या कृतीमध्ये असं काहीतरी होतं : शब्दातीत आणि निराश्रित. तिच्याबद्दल त्याला कणव येते. नकळत तो घाईघाईनं तिच्याकडे जातो, पुन्हा तिच्या शेजारी उकिडवा बसतो, तिच्या हातातून पिल्लू घेतो, कारण तिला कोंबडी अंगावर येईल याची धास्ती असते. तो पिल्लू मूळ जागेवर सोडून देतो. अचानक ती आग पुन्हा भडकून उठते.

ती मान वळवून रडू लागते. अचानक भावनावेगानं त्याचं हृदय द्रवतं, हळुवारपणे तो तिला सांगतो, "रडायचं नाही तुम्ही." आणि तिच्या संमतीनं तो तिला उचलून झोपडीत घेऊन जातो. जमिनीवर सोजिराचं ब्लँकेट पसरतो. ती निश्चल उभी, त्याच्या चेहऱ्याकडे पाहात. त्याचा चेहरा नियतीपुढं अखेर गुडघे टेकणाऱ्या पुरुषागत फिकुटला होता आणि त्यावर कुठलाही भाव नव्हता. तो हळुवारपणे तिला ब्लँकेटवर पडायला सांगतो, दरवाजा बंद करतो. खोलीत कभिन्न काळोख.

'With a queer obedience, she lay down on the blanket. Then she felt the soft, groping helplessly desirous hand touching her body, feeling for her face. The hand stooked her face softly, softly, with infinite soothing and assurance, and at last there was the soft touch of a kiss on her cheek.'

'She lay quite still, in a sort of sleep, in a sort of dream. Then she quivered as she felt his hand groping softly, yet with queer thwarted clumsiness among her clothing. yet the hand knew, too, how to unclothe her where it wanted. He drew down the thin silk sheath, slowly, carefully right down and over her feet. Then with a quiver of exquisite pleasure he touched the warm soft body, and touched her navel for a moment in a kiss. And he had to come in to her at once, to enter the peace on earth of her soft, quiescent body. It was the moment of pure peace for him, the entry into the body of the woman.'

She lay still, in a kind of sleep, always in a kind of sleep. The activity, the orgasm was his, all his; she could strive for herself no more, Even the tightness of his arms around her, even the intense movement of his body, and the springing of his seed in her, was a kind of sleep, from which she did not begin to rouse till he had finished and lay softly panting against her breast.

त्या रात्री तिला जाणवतं, तिच्यामधल्या स्त्रीची त्यानं मायेनं कदर राखली होती, आजवर एकही पुरुष तिच्याशी तसा वागला नव्हता. व्यक्ती म्हणून पुरुष तिच्याशी मायेनं वागेल, पण तिच्यातील स्त्रीशी त्यांचं वर्तन मात्र कठोर होतं, ते तिच्याशी वागले, तिला तुच्छ लेखून वा तिच्याकडे पूर्णपणे दुर्लक्ष करून. कॉन्स्टन्स रीड वा लेडी चॅटर्ली यांच्याशी त्यांचं वागणं ममत्वाचं होतं, पण ती कॉन्टन्स आहे की लेडी चॅटर्ली याची फिकीर न करता, त्यानं तिचा कटिप्रदेश, तिची वक्षस्थळं हळुवारपणे थोपटली होती.

आणि या समागमाची भरजरी याद त्या रात्री सदतीस अडतीस वर्षांच्या त्या गेमकिपरच्या कामवासना प्रज्वलीत करीत होती, त्याला अस्वस्थ करीत होती. एखाद्या जिवंत पक्ष्यागत त्याचं लिंग चुळबुळत होतं. गेली चारेक वर्ष तसा तो एकाकी होता, पुरुषाचा वा स्त्रीचा संगही त्यानं टाळला होता, स्वत:च्या मस्तीत जगत होता. त्या रात्री कुळागारामधून तो संथपणे हिंडतो. त्याला अंधार आवडतो. अंधार लपेटून तो हिंडतो. त्याला वाटतं, औद्योगिककरणानं यांत्रिक बनवलेल्या भोवतालच्या जगात जीवनाचा हळुवारपणा, स्त्रियांचा हळुवारपणा आणि वासनेची नैसर्गिक श्रीमंती यांचं जतन करायचं, आपल्यापरीनं.

त्यानंतरच्या तीनएक महिन्यातील त्यांच्या गाठीभेटीत दोघंही नग्नपणाचं स्पर्शसुख अनुभवतात, मनमुराद संभोगसुख उपभोगतात, अगदी उघड्यावरही भोग घेतात, भर पावसातही देहसंगाची मजा लुटतात.

स्त्रीपुरुषामधल्या लैंगिक संबंधाबाबत आपले विचार तो तिला ऐकवतो. स्त्री कसं बनावं याचे पाठ देतो. कारण कॉन्नीचं भलं कशात आहे हे तो जाणतो. सोवळ्या उच्चवर्गीय संस्कृतीत वाढलेल्या तिच्या सुप्तावस्थेतील नैसर्गिक प्रवृत्तींना मोकळं करतो. आपल्या रांगड्या बोलीभाषेत आजपावेतो तिला उपरिचित असलेलं ज्ञान खुलं करतो.

तो सांगतो,

"Thart good cunt, though, are'nt ter? Best bit O' cunt less on earth. When ter likes ! When tha'rt willin' !"

"What is cunt?" she said.

"An' doesn't ter know? Cunt ! It's thee down theer; an' what I get when I'm i'side thee, and what tha gets when I'm i'side thee, it's a' as it is, all on't."

"All on't, she teased." Cunt ! It's like fuck then."

"Nay, nay ! Fuck's only what you do. Animals fuck. But cunt's a lot more than that. It's thee, dost see : an' tha'rt a lot besides an animal, aren't ter?' — even ter fuck? Cunt ! Eh, that's the beauty O' thee, lass?"

एका प्रसंगी balls म्हणजे काय हे तिला समजावून सांगतो."Ball ! A man's ball's !" तर एक दिवस आपल्या ताठरलेल्या लिंगास उद्देशून म्हणतो, ". . . . john Thomas ! Dost want her? Dost want my Lady Jane?. . . Ax'er then ! Ax Lady Jane ! - Say : Lift up your heads O' ye gates, that the king of glory may come in. Ay, th' cheek on thee ! Cunt, that's what tha'rt after. Tell Lady Jane tha wants cunt. John Thomas, an' th' cunt of Lady Jane ! –"

शिष्ट संमत नसलेली भाषा तिला तो ऐकवतो त्याचं सहजतेनं तो त्याच्या 'जॉन थॉमस'चा तिच्या गुदद्वारात शिरकांव करण्याचा शिष्ट संमत नसलेला मार्गही चोखाळतो :

'It was a night of sensual passion, in which she was little startled and almost unwilling : yet pierced again with piercing thrills of sensuality, different, sharper, more terrible than the thrills of tenderness, but, at the moment, more desirable. Though a little frightened, she let him have his way, and the reckless, shameless sensnality shook her foundations, stripped her to very last, and made a different woman of her. It was really love. It was not voluptuousness. It was sensuality sharp and searing as fire, burning the soul to tinder.

. 'Burning out the shames, the deepest, oldest shames, in the most secret places. It cost her an effort to let him have his way and his will of her. She had to be a passive, conosenting thing, like a slave, a physical slave. yet the passion licked round her, consuming, and when the sensual flame of it pressed through her bowels and breast, she really thought she was dying : yet a poignant, marvellous death.

She had often wondered what Abelard meant, when he said in their year of love he and Heloise had passed through all stages and refinements of passion.. . . . . The refinements of passion, the extravagances of sensuality And necessary, forever necessary, to burn out false shames and smelt out the heaviest ore of the body into purity. With the fire of sheer senility.

In the short summer night she lear'nt so much. She would have

thought a woman would have died of shame. Instead of which, the shame died . . . . . she felt, now, she had come to the real bed-Rock of her nature, and was essentially shameless. She was her sensual self, naked and unashamed. She felt a triumph, almost a vainglory. So ! That was how it was ! That was life ! That was how one self really was ! There was nothing left to disguise or be ashamed of. She shared her ultimate nakedness with a man, another being.

आपल्या पोटी गर्भ राहिल्याचं कॉन्नीला जूनमध्ये कळून चुकतं. उदरी वाढणाऱ्या जीवाचा जन्मदाता गेमकिपर आहे ही गोष्ट सर क्लिफर्डच्या सहनशक्तीपलीकडची आहे याची तिला पूर्ण खात्री असते. गेमकिपर खालच्या जातीचा. रईस आणि बुद्धिमान इसमाकडून आपल्या बायकोला झालेली गर्भधारणा क्लिफर्डनं मान्य केली असती. यातून बाहेर कसं पडायचं?

ती एक बेत आखते : हिल्डाबरोबर व्हेनीसला जायचं. सतरा जूनला निघायचं, वीस जुलैपर्यंत परतायचं. व्हेनिस मुक्कामी एका बड्या खानदानी इसमाशी शरीरसंबंध जुळून आला व पोटी गर्भ राहिला ही थाप क्लिफर्डपाशी पचू शकेल अशा तऱ्हेनं वागायचं. अशा संबंधाला तो हरकत घेणार नाही. दरम्यान मॅलर्सनं बायकोपासून घटस्फोट घ्यावा. ती परतून आल्यानंतर त्या दोघांनी दूर कुठंतरी निघून जायचं, संसार थाटायचा.

ठरविल्याप्रमाणं कॉन्नी हिल्डाबरोबर व्हेनीसला येते. मिसेस बोल्टनच्या पत्रावरून तिला रॅग्बीच्या परिसरातील घडामोडी कळतात. मेलर्सच्या बायकोनं कुळागारात जाऊन थयथाट करते. त्याला घटस्फोट देण्यास ती नकार देते. त्यानंतर तिच्या नवऱ्याचं पत्र येतं : गेमकिपर थोरामोठ्यांच्या बायकांबरोबर कॉटेजमध्ये शय्यासोबत करीत असल्याचं त्याच्या कानावर आलं आहे. ही 'स्कँडल' गावात चर्चेचा विषय झालेली आहे. गेमकिपरला नोकरीवरून काढून टाकण्याचा त्याचा इरादा आहे.

मेलर्सच्या पत्रावरून अधिक खुलासा होतो. त्याची बायको कॉटेजमध्ये येऊन गेली. झोपडीत ज्यूडिथ या नटीचं आत्मचरित्र तिच्या हाती लागतं. त्यानंतर त्याचं इष्कांच पाखरू लेडी चूटर्ली असल्याचं ती गावभर डांगोर पिटते. सर क्लिफर्ड त्याला बोलावून घेतो आणि गावात पसरलेल्या 'स्कँडल' मध्ये आपल्या बायकोचंही नाव गोवलं असल्याबाबत जाब विचारतो. तो उत्तर देतो की अफवा तो ऐकत नाही आणि सर क्लिफर्डच्या तोंडून ऐकलेल्या बातमीनं त्याला आश्चर्य वाटतं. त्याच्यासारख्या दुर्लौकिक असलेल्या इसमाला कामावर ठेवणं सर क्लिफर्डला प्रशस्त वाटत नाही. शनिवारपर्यंत तो कॉटेज सोडेल आणि लंडनमध्ये १७ कॉबर्ग स्क्वेअर येथे जुन्या घरमालकिणीकडे राहायला जाईल.

कॉन्नी झटपट निर्णय घेते. शनिवारी व्हेनिस सोडायचं. सोमवारी ती लंडनला पोचेल. तिथं मेलर्सची भेट घ्यायची. ती त्याला लंडनच्या पत्त्यावर पत्र लिहिते. 'हार्टलंड हॉटेल' च्या पत्त्यावर त्यानं तिला पत्र लिहावं, व सोमवारी संध्याकाळी सात वाजता तिला भेटायला यावं.

लंडनला पोचल्यावर तिला मेलर्सचं पत्र मिळतं : 'तुझ्या हॉटेलवर मी येत नाही, त्या ऐवजी ॲडम स्ट्रीटवरील 'गोल्डन कॉक'च्या बाहेर मी तुझी वाट पाहीन.'

संकेतस्थळी दोघं भेटतात. आपल्याला मूल होणार असल्याचं ती सांगते. पण त्यावरील त्याच्या प्रतिक्रिया थंड्या असतात. भावी काळाविषयी तो संचित असल्याचं तिला कळून येतं.

"पण कुठल्याही प्रकारच्या जबाबदारीची चिंता तुला नको. क्लिफर्ड स्वत:चा म्हणून तो स्वीकारील, आवडेल त्याला." ती सांगते.

तो निमूट राहातो.

"क्लिफर्डकडे मी परतून जाऊ आणि छोटा बॅरोनेट रॅग्बीच्या हवाली करू?" ती विचारते.

"बाप कोण हे तू त्यांना सांगायची गरज नाही."

आपण सांगितलं तर तो स्वीकार करायला नकार देणार नाही असं ती सांगते. तो हुंकारतो.

"क्लिफर्डकडे मी परत जावं असं वाटतं तुला?" ती विचारते.

"तुला स्वत:ला काय वाटतं?"

"मला तुझ्यावरोबर राहायचं आहे."

त्यांच्या बोलण्यामधून निर्णायक असं काही निष्पन्न होत नाही. अखरेरीस ती विचारते की त्याला भीती कसली वाटते? तो सांगतो, त्याच्यापाशी पैसे नाहीत, सामाजिक प्रतिष्ठा नाही. त्यांच्यामध्ये निर्माण झालेलं हळुवार नातंही नष्ट पावेल.

"तुझ्या बाहूत मला तू धरावंस असं मला वाटतं." ती सांगते.

"आपल्याला मूल होणार आहे याचा आनंद झाला आहे असं तुझ्या तोंडून मला ऐकायचं आहे."

"मला वाटतं माझ्या खोलीवर आपण जावं," तो सांगतो .

"पुन्हा स्कँडल."

दोघं त्याच्या खोलीवर जातात. ती आपल्या अंगावरची वस्त्रं उरतवते, त्याच्या अंगावरची त्याला उतरायला लावते. प्रारंभीच्या गर्भारपणाची सौम्य छटा तिच्या देहावर पसरलेली असते.

तो सांगतो, "तुझ्या वाटेला मला जाता कामा नये."

"नाही !" ती सांगते. "समागम कर माझ्याशी ! समागम कर माझ्याशी, आणि सांग मला तू सोडणार नाहीस. सांग, मला तू सोडणार नाहीस ! अन्य कुणाकडे मला तू जायला लावणार नाहीस."

ती त्याच्या सडसडीत, कणखर नग्न देहाला घट्ट कवटाळते. तो तिचा एकमेव आसरा तिला ठाऊक असलेला.

"ठिक आहे, नाही सोडत मी तुला," तो सांगतो. "तुझी तशी इच्छा आहे तर नाही सोडणार मी तुला."



अनुक्रमणिका

तो तिला घट्ट मिठी मारतो.

"आणि सांग मूल होणार याचा तुला आनंद आहे." ती पुन्हा म्हणते. 'चुंबन घे त्याचं ! माझ्या पोटाचं चुंबन घे आणि सांग ते तिथं आहे याचा तुला आनंद आहे."

पण हे महाकठीण होतं.

"जगात मुलांना आणणं यांची धास्ती वाटते मला," तो सांगतो. "त्यांच्या भवितव्याची विलक्षण धास्ती वाटते."

"पण तू माझ्या पोटी त्याला घातला आहेस. त्याच्यावर हळूवारपणे माया कर, आणि ते त्याचं भवितव्य ठरेल. चुंबन घे त्याचं."

तो शहारतो कारण तिच्या म्हणण्यात तथ्य असतं. त्या क्षणी त्या स्त्रीबद्दल त्याला मनस्वी प्रेम वाटू लागतं. तो तिच्या पोटाचं, योनीचं चुंबन घेतो.

"ओह, माझ्यावर प्रेम आहे तुझं ! माझ्यावर प्रेम आहे तुझं !" ती आनंदतिशयानं उद्‌गारते.

"And he went in her softly, feeling the streem of tenderness flowing in release from his bowels to hers, the bowels of Compassion kindled between them.

तिला कळून येतं यापुढं तो आणि ती कधीच एकमेकांपासून दूर होणार नाहीत. फक्त पुढील मार्ग ठरवावा लागेल.

तो सुचवतो : त्याच्या बायकोपासून घटस्फोट मिळेपर्यंत आपण दोघांनी सावधगिरी बाळगली पाहिजे. आपल्याला एकत्र कुणी पाहाता कामा नये. तो आणि ती यांच्यामध्ये त्याच्या बायकोचा अडथळा आलेला त्याला कदापीही सहन होणार नाही.

कॉन्नी विचारात पडते, विचारते, "तर मग आपण एकत्र राहू शकणार नाही?"

"सहाएक महिने तरी नाही. मला वाटतं माझ्या घटस्फोटाची केस सप्टेंबरमध्ये उभी राहिल, मार्चमध्ये संपेल."

"पण फेब्रवारी अखेरपर्यंत मी बाळंत होईन."

तोवर धीर सोडता कामा नये, कळ सोसायला हवी.

कॉन्नी सत्य परिस्थिती आपल्या वडिलांच्या कानावर घालते. एका य:कश्चित गेमकिपरबरोबर आपल्या लेकीचं लफडं ऐकून त्यांना धक्का बसतो. पण त्याहीपेक्षा ते धास्तावतात ते 'स्कँडल'ला. घराण्याच्या नावलौकिकाचा प्रश्न !

ती एक मार्ग सुचवते : मुलाचा बाप म्हणून मेलर्सचं नाव न घेता डंकन फॉर्बसचं घ्यायचं. ती लहान असल्यापासूनचा तो तिचा मित्र. चित्रकार म्हणून त्याचं नावही बऱ्यापैकी झालेलं. तिचा त्याला लळा आहे. तिला खात्री आहे की या गोष्टीला तो तयार होईल.

यावर कॉन्नी, तिचे वडील, हिल्डा मेलर्स हो ना करीत शिक्कामोर्तब करतात. डंकनही तयार होतो. पण एका अटीवर. मॉडेल म्हणून तिनं त्याला पोझ द्यायची. कित्येक वर्षं तो तिच्या मागं होता पण प्रत्येक वेळेला तिचा ठाम नकार ठरलेला असायचा.

त्याची अट मान्य करणं मेलर्सला जड जातं पण कॉन्नी त्याची समजूत काढते. नंतर क्लिफर्डला पत्र लिहिते : जे घडणार म्हणून तुझी बऱ्याच दिवसापासूनची अटकळ होती ते घडून आलं आहे. माझं खरोखरीच दुसऱ्या एका पुरुषावर प्रेम बसलं आहे आणि आशा करते तू मला घटस्फोट देशील. मी सध्या डंकनबरोबर त्याच्या फ्लॅटमध्ये राहात आहे. मी म्हणाले होते तुला आमच्याबरोबर तो व्हेनीसला होता. तुझ्याबद्दल मला भयंकर दु:ख होत आहे, पण हे शांतचित्तानं स्वीकारण्याचा प्रयत्न कर. तुला आता माझी खरोखरीच गरज उरलेली नाही रॅग्बीला परत येणं मला जमणारं नाही. मला अतिशय वाईट वाटत आहे. मला विसरून जाण्याचा प्रयत्न कर आणि मला घटस्फोट दे आणि कुणीतरी दुसरी एखादी चांगली उतावळी आणि आपमतलबी आहे असं मला वाटतं.... माझ्याबद्दल तुला व्यक्तिगत काडीचीही कदर नाही. तस्मात मला विसरून जा आणि माझ्या तापातून मुक्त हो.'

ही चिठ्ठी वाचून क्लिफर्डला बिलकुल आश्चर्य वाटलं नाही. ती आपल्याला सोडून जाणार हे बऱ्याच दिवसापासून तो जाणून होता. पण वरकरणी मात्र त्यानं असा देखावा केला की त्या चिठ्ठीनं त्याला हादरा दिला आहे. त्याच्या डोळ्यांतून आसवं ओघळू लागतात. त्याला रडताना पाहून मिसेस बोल्टन त्याचं सांत्वन करते. आपल्या छोट्या हातरूमालानं त्याचे अश्रू पुसते. त्याच्या दिशेनं झुकते. 'चिंता करू नका ! चिंता करू नका' असं पुन:पुन्हा विनवते. विनवणी चालू असतानाच ती त्याच्या खांद्याभोवती आपले हात लपेटते. तिच्या वक्ष:स्थळावर माथा टेकून तो हुंदके देतो आणि ती त्याचे केस थोपटते. तोही तिच्याभोवती हात लपेटून एखाद्या बाळागत तिला चिकटतो, अश्रूंनी तिचा ॲप्रन भिजवतो. ती त्याचं चुंबन घेते आणि आपल्या छातीवर त्याला आंदोळते. बाळागत तो झोपी जातो.

ती खोलीत गेल्यावर हसते त्याचबरोबर रडतेही. किती विचित्र वागणं ! शरमिंद करणारं! पण त्यानंतर क्लिफर्ड बाळागत तिच्याशी वागतो. तिचा हात पकडून तिच्या छातीवर माथा टेकतो. तिनं ओझरतं चुंबन घेताच सांगतो : 'माझे मुके घे ! मुके घे माझे ! त्याचा देह स्पंज करतेसमयीही तो तिला सांगतो : 'मुके घे माझे' आणि ती त्याच्या देहाचे मुके घेते. मिसेस बोल्टनला ते आवडतं आणि त्याचा तिरस्कारही वाटतो. ती रोमांचित होते आणि शरमिंदीही होते. तरीही त्याला धुडकावून देत नाही व त्याची खरडपट्टीही काढत नाही. त्यांच्यात शारीरिक जवळीक निर्माण होते, विकृत वाटावी अशी.

क्लिफर्ड उलट टपाली कळवता : तुझ्या पत्रानं माझ्यावर काय परिणाम झाला असेल हे मी तुला सांगण्याची गरज नाही. अर्थात माझ्याखातीर तुझी कल्पनाशक्ती वापरण्याचे परिश्रम तू घेतलेस तर. मी काही करण्याआधी, इथं रॅग्बीमध्ये मला तुझी व्यक्तिगत भेट घ्यायला हवी. रॅग्बीला परत येण्याचं तू वचन दिलं होतंस, आणि ते तू पाळावंस असं मला वाटतं. मला तुला सांगायची आवश्यकता नाही की इथं कुणाला कसलाही संशय आलेला नाही, म्हणून

तुझं माघारी अगदी नित्याप्रमाणंच असेल. नंतर तुला जर वाटतं, आपलं बोलणं झाल्यानंतर, की तुझा विचार बदललेला नाही, आपण नि:संशय तडजोड करू.

हो ना करीत कॉन्नी हिल्डाबरोबर रेग्बीला जाते. ज्या वास्तुविषयीची घृणा तिच्या रोमरोमी भिनलेली होती. तिथं ती पाऊल टाकते. तिथल्या प्रत्येक मिनिटाचा ती तिरस्कार करते. ती प्रचंड वास्तू तिला एक 'इव्हील' वाटते.

भोजनसमयी ती क्लिफर्डला सामोरी येते. टेबलभोवती ती, क्लिफर्ड आणि हिल्डा. भोजनानंतर कॉफी. त्यानंतर हिल्डा निघून जाते. मागं उरतात सर क्लिफर्ड आणि लेडी चॅटर्ली. दोघंही मुकाट, अखेर त्याच्या ओठातून शब्द फुटतात : 'दिलेला शब्द तू पाळला नाहीस त्याबद्दल तुला काहीच वाटत नाही असं मला वाटतं.'

"त्याला माझा इलाज नाही", ती पुटपुटते.

"कुणाचा आहे?"

"कुणाचाही नाही."

तो रागानं तिच्याकडे पाहातो.

"आणि सर्व काही विसरून सोडून जाण्याचं कारण काय?" तो विचारतो, आग्रहपूर्वक.

"प्रेम ! " ती म्हणते.

"प्रेम, डंकन फॉर्बसचं? तू मला भेटलीस तेव्हा तुला त्या प्रेमाची तेवढी लायकी असल्याचं आढळून नव्हतं आलं. तुला असं म्हणायचं आहे की आता आयुष्यात त्यावर आहे तेवढं प्रेम अन्य कुणावरही नाही?"

"एखादा बदलतो", ती सांगते.

"शक्यता आहे ! शक्यता आहे तुझ्या काही लहरी असतील. पण बदलाचं महत्त्व मला तू पटवून द्यायला हवंस. डंकन फॉर्बसवरील तुझ्या प्रेमावर माझा बिलकुल विश्वास नाही."

"तू विश्वास ठेवावास असं कुठं आहे? तुला फक्त मला घटस्फोट द्यायचा आहे, माझ्या भावनावर विश्वास तू ठेवावा असं नाही."

"मी घटस्फोट कशाला द्यायचा तुला ?"

"कारण इत:पर मला इथं राहायची इच्छा नाही. आणि तुला माझी खरोखरीच गरज नाही."

"माफ कर ! मी बदलत नाही. माझी तू पत्नी असल्याकारणानं माझ्या छत्राखाली तू राहावंस आब राखून स्वस्थपणे हे मी पसंत करीन, व्यक्तिगत भावना बाजूला ठेवू, आणि माझ्या बाबतीत मी बरचसं बाजूला सारलेलं आहे. याबाबत मी तुला खात्रीपूर्वक सांगतो, इथं रेग्बीमध्ये, हा आयुष्यक्रम मोडला जावा हे माझ्या लेखी मरणाएवढंच कटू आहे, केवळ तुझ्या काही लहरी खातीर."

काही क्षण शांतता. त्यानंतर ती सांगते, "त्याला माझा नाईलाज आहे. मला जायलाच हवं. मला मूल होणार आहे."



अनुक्रमणिका

"आणि त्या मुलाखातीर तुला जायलाच हवं?" तो विचारतो.

ती मानेनं होकार देते.

"आणि का? डंकन फॉर्बस त्याच्या बीजाबाबत एवढा उत्सुक आहे?"

"तू असणार नाहीस त्याहून अधिक."

"खरचं? मला माझी बायको हवी आहे आणि तिला जाऊ देण्यात मला काही प्रयोजन वाटत नाही. माझ्या छत्राखाली मूल वाढवण्याची तिची इच्छा असल्यास, तिचं स्वागतच होईल आणि मुलाचंही, जर का इभ्रत आणि जीवनपद्धती कायम राखली तरच, तुला मला सांगायचं आहे की डंकन फॉर्बसचा तुझ्यावर एवढी हुकूमत आहे? माझा विश्वास नाही त्यावर."

त्यानंतर विराम.

"पण तुझ्या ध्यानी येत नाही का? मला तुझ्यापासून दूर जायलाच हवं आणि माझं ज्याच्यावर प्रेम आहे त्या पुरुषाबरोबर मला राहायलाच हवं."

"तुझ्या प्रेमाला आणि तुझं प्रेम आहे त्या पुरुषाला मी दमडीचीही किंमत देत नाही. तसल्या प्रकारच्या बडबडीवर माझा विश्वास नाही."

"पण हे बघ, माझा आहे."

तिला कळून चुकतं आता गप्प राहाण्यात अर्थ नाही.

"कारण ज्याच्यावर माझं प्रेम आहे तो डंकन नाही," त्याच्याकडे पाहात ती सांगते, "तो डंकन असं आम्ही म्हटलं ते केवळ तुझ्या भावनांची कदर करण्यासाठी."

"माझ्या भावनांची कदर करण्यासाठी?"

"होय ! ज्याच्यावर मी खरोखरीच प्रेम करते आणि ज्यासाठी माझा तू तिरस्कार करू लागशील, तो आहे मिस्टर मेलर्स, जो इथं तुझा गेमकिपर होता."

त्याच्या चाकाच्या खुर्चीमधून तो उठू शकला असता तर त्यानं तिच्यावर झेप घेतली असती. तो पुन्हा स्थिरस्थावर होतो.

"तू मला सत्य सांगत आहेस?" तो विचारतो. भेसूर चेहरा.

"हो ! तुला ठाऊक आहे मी सत्य सांगत आहे."

"हे सुरू केव्हा झालं?"

"वसंतात."

सापळ्यातील पशूगत तो निमूट.

"तर मग ती तू होतीस, कॉटेजमधल्या बेडरूमात?"

म्हणजे त्यानं सर्व काही यापूर्वीच जाणलेलं होतं.

"हो !"

"माय गॉड, धरतीवर तुझी नावनिशाणीही शिल्लक ठेवता कामा नये."

"का?"

"तो हलक्या जातीचा ! तो घमंडी पागल ! तो कर्मदरिद्री हरामखोर ! त्याच्याही संबंध चालू, तू इथं असताना आणि तो माझा एक नोकर असताना ! माय गॉड, माय गॉड, स्त्रियांच्या पशुतुल्य अधोगतीला अंत नाही !"

रागानं तो आता त्याचा राहिला नव्हता.

"आणि त्याच्यासारख्या हरामखोराकडून तुला मूल हवं आहे असं म्हणतेस तू?"

"हो ! मला होणार आहे."

"तुला होणार आहे ! खात्री आहे तुला ! केव्हा खातरजमा झाली?"

"जूनमध्ये"

तो अवाक.

"असले जीव जन्माला कशाला घालायचे?"

"कसले जीव?" ती विचारते.

तो उत्तर देत नाही. त्याच्या स्वत:च्या आयुष्याशी मेलर्सचं अस्तित्व कुठल्याही प्रकारे जोडलेलं आहे ही वस्तुस्थिती मान्य करणं त्याला शक्य नव्हतं. उच्चार न करता येण्याजोगा, वांझोटा तिरस्कार.

"त्याच्याशी तुला लग्न करायचं आहे?– त्याचं घाणेरडं नाव लावायचं आहे?"

"हो, माझी तीच इच्छा आहे."

तो पुन्हा वाचा हरवल्यागत निमूट.

"म्हणजे आजवर तुझ्यासंबंधी मी जे समजून होतो ते अचूक होतं : तू नॉर्मल नाहीस, तुझं डोकं ठिकाणावर नाही. अर्धवट पागल, विकृत अशा स्त्रियांपैकी तू एक आहेस."

"म्हणूनच तुला वाटत नाही का मला तू घटस्फोट द्यावास आणि मोकळं व्हावंस."

"नाही ! तुला पाहिजे तिथं तू जाऊ शकतेस, पण तुला मी घटस्फोट देणार नाही."

"का?"

तो ताठरपणे निमूट.

"मूल कायदेशीररित्या तुझं होईल, तुझा वारस, हे चालेल तुला?"

"मुलाची मला अजिबात फिकीर नाही."

"पण तो जर मुलगा असला तर तो कायदेशीररित्या तुझा मुलगा ठरेल आणि तुझी किताबत त्याला लाभेल आणि रॅग्बी मिळेल."

"मला त्याची फिकीर नाही."

"पण तू करायला हवीस ! मला शक्य असल्यास मूल कायदेशीररित्या तुझं मी होऊ देणार नाही. ते माझं मूल मेलर्सचंच आहे तोवर अनौरस ठरलं तरी बेहत्तर !"

"त्यासंबंधी तुला काय हवं ते तू कर."

"म्हणजे मला घटस्फोट देणार नाहीस तू? डंकनचं नाव पुढं करू शकतोस तू? खरं नाव घेण्याची गरज नाही. डंकनला हे मान्य आहे."

"मी कदापीही तुला घटस्फोट देणार नाही."

"पण का?" "कारण तो तू द्यायला हवा अशी माझी इच्छा आहे म्हणून?"

"कारण माझा मानसिक कल मी अनुसरतो, आणि त्यानुसार माझी तयारी नाही."

यापुढं बोलणंच निरर्थक. ती उठून खोलीत निघून जाते तेव्हा मध्यरात्र झालेली असते. दुसऱ्या दिवशी सकाळी ती हिल्डाबरोबर आपलं सामानसुमान घेऊन निघते. मिसेस बोल्टनचा निरोप घेतेसमयी तिला सांगते की एकूण प्रकाराविषयी तिनं कुठं वाच्यता करू नये. मेलर्सशी तिला लग्न करायचं आहे. एखाद दिवशी सर क्लिफर्डला मला घटस्फोट देण्याची इच्छा झाली तर तिनं कळवावं.

कॉन्री तिथून स्कॉटलंडनला जाते. मेलर्स गावात जातो आणि शेतावर कामाला लागतो. कॉन्रीला घटस्फोट मिळो वा न मिळो, त्यानं घटस्फोट मिळवायचा. सहा महिने त्याने शेतावर काम करायचं, जेणेकरून कॉन्री आणि तो दोघांची एक छोटसं शेत मालकीचं होईल. त्या शेतात तो राबेल. तिच्या भांडवलावर त्यानं प्रारंभ केला तरी त्याला स्वतःचीही कमाई करायची होती.

२९ सप्टेंबरचं मेलर्सचं पत्र कॉन्रीच्या हाती पडतं. त्यात त्यानं लिहिलेलं असतं : तो आणि कॉन्री दोघं मिळून नवं आयुष्य उभं करतील. त्यांचं बाळ जन्माला येईल. कॉन्रीला वर्षाकाळी मिळणाऱ्या पाऊंडावर दोघं मिळून शेती करतील. ते दोघं सांप्रत एकमेकांपासून दूर असले तरी मनानं एकत्र आहेत. या खडतर मार्गामधून आपण वाट काढू. पुढल्या वर्षी आपण एकत्र येऊ. जॉन थॉमसचा लेडी जेनला शुभ रजनी, थोडंफार गळून गेल्यागत पण आशावादी काळजानं.

स्त्री पुरुष संबंध, सेक्स, प्रेम याविषयीचे आपले परिपक्व विचार लॉरेन्सनं मेलर्सच्या मुखावाटे वदवलेले आहेत. मेलर्सचं आयुष्य, त्याचे लैंगिक अनुभव बऱ्याच प्रमाणात लॉरेन्सनं स्वतःच्या आयुष्यावर, अनुभवावर बेतलेले आहेत. ही गोष्ट मेलर्स स्वतःच्या गतायुष्यासंबंधी बोलतो तेव्हा स्पष्ट होते.

'. . . The first girl I had, I began with when I was sixteen . . . we were the most literary - cultured couple . . . And she adored me. The serpent in the grass was sex. She somehow didn't have any; at least, not where it's supposed to be . . . Then I said we'd got to be lovers. I talked her into it, as usual. So she let me. I was excited, and she never wanted it . . . She adored me, she loved me to talk to her and kiss her : in that way she had a passion for me. But the other, she just didn't want . . . . So there we split. I was cruel, and left her. Then I took on with another girl, a teacher,

who had made a scandle by carrying on with a married man and driving him nearly out of his mind. . . (She) was older than me . . . She loved everything about love, except the sex . . . . So I was balked again . . . I wanted a woman who wanted me and wanted *it*

Then came Bertha Coutls . . . I married her . . . a woman who wanted me to fuck her so I fucked her like a good one. And I think she despised me a bit, for being so pleased about it, and bringing her breakfast in bed sometimes. She sort of let things go, didn't get me a proper dinner when I came home from work, and if I said anything, flew out at me. And I flew back, hammer and tongs. She fllung a cup at me and I took her by the scruff of her neck and squeezed the life out of her . . . . She would never have me when I wanted her : never . . . . (When) I didn't want her, she'd come all lovey-dovey, and get me. And I always went. But when. I had her, she'd never come-off when I did. Never she'd just wait. If I kept back for half an hour, she'd keep back longer. And when I'd come and really finished, then she'd start on her own account, and I had to stop inside her till she brought herself aff, wriggling and shouting, she'd clutch clutch with herself down othere, an' then she'd-come off, fair in ecstasy. . . .

वरील पहिल्या परिच्छेदामधल्या जेसी चेंबर्स, हेलन कॉर्क ओळखू येतात आणि दुसऱ्या परिच्छेदामध्ये लॉरेन्स आणि फ्रीडाच्या वैवाहिक जीवनाचे पडसाद ऐकू येतात. कॉन्नी चॅटर्लीही लॉरेन्सबरोबरच्या प्रारंभीच्या दिवसातील फ्रीडाचं स्मरण करून देते, फ्रीडा प्रमाणं नग्नावस्थेतील कॉन्नीचं वर्णनही तो 'Gloire de Dijon rose' या शब्दात केलेलं आहे. मेलर्सला स्त्रियांच्या ओठांचं चुंबन घेण्याचा (लॉरेन्सप्रमाणंच) तिटकारा असल्याचंही नमूद करण्यात आलेलं आहे.

एम्मा ओअरी आणि ॲना कॅरेनिन यांची अखेर त्यांच्या मृत्यूत केली म्हणून लॉरेन्स फ्लॉबेर व टॉलस्टॉय यांच्यावर टीका करीत असे. या दोघींनी पुरुषनिर्मित नीतीमूल्यांचं केवळ उल्लंघन केलं होतं. एवढंच : निसर्गाच्या आव्हानांशी, शक्तींशी मुकाबला करताना मोडून पडलेल्या श्रेष्ठ शोकांतिकेतील स्त्री पुरुषाप्रमाणं त्या 'ट्रॅजिक' व्यक्ती नाहीत. लॉरेन्सनं आपली नायिका कॉन्स्टन्स चॅटर्लीला जीवनाच्या मार्गावर नेऊन सोडलं. कादंबरीची सुरुवात करतानाच तो सांगतो 'आपलं युग प्रामुख्यानं शोकात्म आहे' आणि शेवट करतो 'आशावादी काळजानं.'



अनुक्रमणिका



**फ्रांझ काफ्का**
(१८८३-१९२४)

**जागतिक वाङ्मयात स्वतःचे घराणे निर्माण करणारा जर्मन कथा-कादंबरीकार.**

**विसाव्या शतकातील या महान साहित्यिकाचा परिचय करून देणारा मराठीमधील पहिला ग्रंथ**

# थोडाबहुत काफ्का

**शकु नी. कनयाळकर**

**१८८३-१९१८ या कालखंडातील काफ्काचा जीवनवृत्तांत. 'द ट्रायल' या कादंबरीचा संक्षिप्त अनुवाद.**

चरित्रपट, वाङ्मयसूची इ. आर्टपेपरवरील ५२ छायाचित्रे
एकूण पृष्ठे २६० + ४ + १६

**मूळ किंमत रु. २००**
**'तपशील' च्या वर्गणीदारांना सवलतीची किंमत रु. १२०**

त्वरित संपर्क साधा

**नाना जोशी**

४ अ, सोमणनगर, क्रांतीवीर भाई बालमुकुंद मार्ग, मुंबई ४०००१२

अनुक्रमणिका